Dedicated with respects to E. A. Macnee, Esqr., M.A., I.E.S., offg. Director of Public Instruction, C. P. and Berar, Nagpur.

Editor

# महाराष्ट्र वाङ्मय-प्रवेशिका

## भाग २ रा

( ८ व्या वर्गाकरितां मराठी वाचनपुस्तक )

संपादक

गंगाधर गोविंद कानेटकर, एम्. ए.,

प्रोफेसर, स्पेन्स ट्रेनिंग कॉलेज, जबलपूर

मॅक्मिलन् आणि कंपनी लिमिटेड

मुंबई

 १९२९ [ किंमत रु. १-०-०

# प्रस्तावना



## दोन्ही भागांची

पुढील वाङ्मयात्मक पाठ सातव्या व आठव्या (अथवा इंग्रजी ३ ऱ्या व ४ थ्या) वर्गांकरितां मराठी वाचनपुस्तकें म्हणून उपयोगीं पडावे या हेतूनें संग्रहीत केले आहेत. ट्रेनिंग स्कूलस् अथवा नार्मल स्कूल्स् यांच्या पहिल्या व दुसऱ्या वर्गांकरितां देखील हीं पुस्तकें उपयुक्त होतील असें वाटतें.

मध्यप्रांतांत ६ व्या वर्गापर्यंत व मुंबई इलाख्यांत ७ व्या वर्गापर्यंत विद्याखात्यामार्फत प्रसिद्ध झालेलीं क्रमिक वाचनपुस्तकें भाषाविषयाच्या अध्ययनास उपयोगीं पडतात. पुढें त्या त्या वर्गांकरितां मंजूर झालेल्या गद्यात्मक अथवा पद्यात्मक अशा पुस्तकांतून एखादें निवडून तें ७ व्या व ८ व्या वर्गाकडून वाचून घेण्याचा प्रघात हल्लीं चालू आहे. या पद्धतींत थोडी गैरसोय होते. एक तर ज्या वर्गाकरितां हीं पुस्तकें निवडावयाचीं त्याच वर्गास अनुलक्षून तीं लिहिलेलीं नसतात. अदमासानें त्यांची निवड करावी लागते; व अनुभवांतीं तीं कधीं अधिक कठिण, कधीं फाजील सोपीं अशीं ठरतात. दुसरें, गद्य व पद्य यांच्या संग्रहाचीं पुस्तकें भिन्न भिन्न असल्यानें दोहोंची मिळून किंमत अधिक पडते; व ती देऊनही चित्रें, आकृति, नकाशे वगैरेंनीं सजविलेलीं पुस्तकें प्रायः दुर्मिळच असतात.

ही अडचण दूर व्हावी, व माध्यमिक शाळांच्या वरच्या दोन वर्गांना उपयुक्त अशीं वाचनपुस्तकें मिळावीं या हेतूनें हीं पुस्तकें रचण्यांत आलीं आहेत.

या पुस्तकांत आणखीही कांहीं विशेष दिसून येतील.

( १ ) मुलांना वाचनाची खरी गोडी लागावी, चांगलीं पुस्तकें कोणतीं हें त्यांना समजावें व स्वतःच्या प्रयत्नानें चांगलें वाङ्मय वाचावें अशी त्यांमध्यें हौस उत्पन्न व्हावी, हा हे पाठ निवडणाराचा मुख्य उद्देश आहे. म्हणून, पुस्तकांतील दोन तीन पाठ वगळले तर बाकीचे सर्व, मराठींत ज्यांनीं चिरस्मरणीय नांव मिळविलें आहे अशाच कवींच्या व ग्रंथकारांच्या ग्रंथांतून या पुस्तकांत घेतले आहेत. पण वाङ्मयदृष्ट्या जें उत्कृष्ट असेल तें मुलांच्या आटोक्यांत येण्यासारखें असेलच असा नियम नाहीं. म्हणून पाठांतील विषयांची निवड करतांना मुलांच्या गरजा व त्यांची आकलनशक्ति यांकडे सारखी दृष्टि ठेविली आहे. इंग्रजी भाषेंतील High Roads of Literature, Black's Literary Readers, Macmillan's Progress to Literature वगैरे उंची दर्जाच्या वाङ्मयप्रवेशिकांचें अवलोकन करून त्यांच्या धर्तीवर ही प्रवेशिकांची जोडी रचण्याचा यत्न केला आहे.

( २ ) वाङ्मयामधील सर्व महत्त्वाचे प्रकार या पुस्तकद्वयांत प्रतिबिंबित व्हावे असें धोरण ठेवण्यांत आलें आहें. विनोदात्मक वाङ्मयाचा त्यांतल्या त्यांत नवीन परंतु उपयुक्त प्रकार यांत काळजीपूर्वक समाविष्ट करण्यांत आला आहे. उत्कृष्ट विनोद व कोटि यांचें मर्म समजणें हें उदार शिक्षणाचें एक लक्षण समजतात तें योग्य आहे, अशी प्रस्तुत संपादकाची समजूत आहे.

( ३ ) स्फूर्तिदायक, देशाभिमान जागृत करणारें, व स्वातंत्र्य, समता व बंधुता यांचा उच्च आदर्श समोर ठेवणारें असें–गद्य व पद्य

या दोन्ही प्रकारचें—शक्य तितकें वाङ्मय यांत घालण्याचा प्रयत्न केला आहे.

( ४ ) आजपर्यंत उपयोगांत असलेल्या पुस्तकांत बहुधा नीतिपर उपदेश ज्यांत असेल असेच पाठ निवडावयाचे असें धोरण सामान्यत: दिसतें. या धोरणास प्रस्तुत संपादकानें अजीबात फांटा दिला आहे. नीत्युपदेश हवा खरा, पण तो नेहमीं विधिवाक्यद्वाराच आला तर कंटाळवाणा होतो. प्रत्यक्ष नीतिपर व्याख्यानापेक्षां नकळत नीतितत्त्वें पटविणाऱ्या व उच्च मनोवृत्ति जागृत करणाऱ्या गोष्टी, नाटकें, इतिहास, पुराणें वगैरेंचाच परिणाम वाचकांवर अधिक होतो. मुलांस तर ही गोष्ट विशेष लागू आहे. "कांतासंमिततयोपदेशयुजे" या सूत्रमय वाक्यांत मम्मटाचार्यांनीं जो मार्ग दाखविला आहे, त्याच मार्गाचें या पुस्तकांत अवलंबन केलें आहे.

( ५ ) प्रत्येक पाठाचे शेवटीं कांहीं निवडक प्रश्न दिले आहेत. त्यांचा उपयोग दोन तीन प्रकारें होईल.

( अ ) पाठाचा सारांश मुलांकडून काढून घेण्यास.

( आ ) त्यांच्या विचारशक्तीस चालना देण्यास.

( इ ) निबंधरचना शिकविण्यास.

यापैकीं शेवटचा उपयोग महत्त्वाचा आहे. पाठांतील मुख्य मुख्य मुद्दे स्वत:च्या भाषेंत मुलांनीं सांगण्याचा अगर लिहिण्याचा यत्न केल्यास त्यांच्या भाषारचनेस खात्रीनें चांगलें वळण लागेल.

वरील उद्देशांपैकीं कोणते किती सिद्धीस गेले आहेत हें तज्ज्ञांनींच ठरवावयाचें आहे. अभिजात वाङ्मय—विशेषेंकरून काव्य—हें ललित-कलेचें एक अंग आहे; व कला म्हटली कीं तेथें रुचिभेदास अवकाश

मिळालाच. एकास जें रुचलें तें दुसऱ्याच्या पसंतीस उतरेलच अशी खात्री देववत नाहीं. तथापि प्रयत्न कसून केला आहे, व तज्ज्ञांच्या सूचनेप्रमाणें फिरूनही ( तसा प्रसंग आल्यास ) प्रयत्न करण्याची संपादकाची तयारी आहे. सहानुभूतिपूर्वक सूचना मात्र आल्या पाहिजेत.

**गं. गो. कानेटकर**

---

# प्रकाशकांचे दोन शब्द

ज्या ज्या लेखकांनीं व प्रकाशकांनीं आपल्या बहुमूल्य ग्रंथांतून उतारे घेण्याची आम्हांस परवानगी दिली त्यांचे आम्ही स्वत:च्या व संपादकाच्या वतीनें मन:पूर्वक आभार मानतों.

**प्रकाशक**

# महाराष्ट्र वाङ्मय-प्रवेशिका

## भाग २ रा

### अनुक्रमणिका

---

## परिशिष्टें

( गद्यविभाग )

१

# झांशी येथील रणसंग्राम



[ पुढील उतारा सुप्रसिद्ध इतिहासकार व मार्मिक लेखक रा. ब. चिंतामणराव वैद्य यांच्या "माझा प्रवास" नामक ग्रंथांतून घेतला आहे. ग्रंथ कादंबरीवजाच असून त्यास आत्मचरित्राचें स्वरूप दिलेलें आहे; व त्यांत सन १८५७ सालच्या बंडाचें मोठें बहारीचें वर्णन आलें आहे. विष्णुभट गोडसे या नांवाचा एक विद्वान् ब्राह्मण कोंकणांत वरसई गांवीं राहात असे. वाढता प्रपंच व उत्पन्नाची टंचाई यामुळें कर्जवाम बरेंच झालें, व तें गांवीं राहून फिटण्याची आशा दिसेना. इतक्यांत ग्वालेर संस्थानच्या राणीसाहेब श्रीमंत बायजाबाई शिंदे मथुराक्षेत्रीं यज्ञ करणार असून तेथें मोठाच दानधर्म होणार आहे, अशी वार्ता या भिक्षुकाच्या कानीं आली. तेव्हां तिकडे गेल्यास दक्षिणेची प्राप्ति बरी होऊन कर्ज फिटेल, व शिवाय तीर्थयात्राही होऊन जाईल अशा कल्पनेनें विष्णुभट व त्याचा एक चुलता असे दोघे उत्तर हिंदुस्थानच्या प्रवासार्थ निघाले, व त्याच सुमारास बंडाची वावटळ उठल्यानें ठिकठिकाणीं तिच्यांत सापडले. त्या संकटांतून सुटून स्वदेशीं परत आल्यावर आपल्या यात्रेचें वर्णन विष्णुभटानें लिहून काढलें. बंडाच्या वेळचे अनेक रोमहर्षण प्रसंग लेखकानें यांत खुबीनें वर्णन केले आहेत. पुढील उताऱ्यांत प्रख्यात रणशूर राणी लक्ष्मीबाई झांशीवाली इनें झांशी कशी लढविली याचें वर्णन आहे ]

चैत्र महिना सरून वैशाख लागला, तों एके दिवशीं शहरचे दक्षिण अंगास मैदानांत तंबू दिसूं लागले, व जिकडे तिकडे बारीक आगट्या पेटल्या. तेव्हां आम्ही सायंकाळीं किल्ल्याचे उंच बुरुजावरून

पाहूं लागलों तों शहरचे चारी अंगांस ठिकठिकाणीं तंबू मारून पलटणी उतरल्या आहेत, आगटी पेटल्या आहेत व जिकडे तिकडे चळवळ सुरू आहे, असें दृष्टीस पडलें. परंतु देखाव्याप्रमाणें मनुष्य कमी आहे असा आम्हीं तर्क बांधला. रात्रौ बातमीदार आला त्यानेंही सांगितलें कीं मनुष्य सरंजाम दिसतो त्यापेक्षां कमी आहे. सुमार लढवाई साठ हजार आहेत. बाकी बाजारबुणगें पुष्कळ आहेत. वेढा येऊन पडला असें समजतांच रात्रौ बाईसाहेबांनीं किल्ल्याचे तटावर व शहरचे तटावर फिरून बंदोबस्त केला. सर्व बुरुजावर मोरचे[1] बांधून तोफा रोखून ठेविल्या व गोलंदाज[2] नेमून दिले. शहरचे तटावर जंग्यां[3] जंग्यांतून कर्डोमिनी[4] घेऊन शिपाई लोक उभे केले. ठिक-ठिकाणीं दरवाज्याजवळ शिपाई लोकांच्या टोळ्या ठेवून वर विश्वासू व दक्ष सरदार नेमून दिले.

झांशी शहरचे बाहेर चोहींकडे मोठमोठीं मैदानें आहेत म्हणून सांगितलेंच आहे. दुसरे दिवशीं सकाळीं शहराचा तट आटोक्यांत येई असा मोरचा बांधण्याकरितां इंग्रजाचे स्वार पांच पंचवीस दवडत दवडत जवळ आले, ते किल्ल्याचे पश्चिमेस येऊन माऱ्यांत आले असें पाहून गोलंदाजानें नेम धरून तोफेस बत्ती दिली. त्या योगानें पांच सहा स्वार मरून उधळून गेले. याप्रमाणें पहिले दिवशीं इंग्रजी फौज शहरास चोहों बाजूनें मोरचे बांधण्याचा प्रयत्न करीत होती. परंतु तटावरून व बुरुजावरून दक्ष व हुशार गोलंदाज असल्यामुळें माऱ्यांत माणसें पुढें आलीं कीं, बत्ती देऊन फडशा उडवून टाकीत.

---

१ तोफा ठेवण्यासाठीं बांधलेले उंचवटे. २ तोफा डागणारा. ३ खिडकी. ४ कडाबीन, रुंद तोंडाची आखूड बंदूक.

याप्रमाणें दुसरे दिवशींही मोरचा बांधण्याकरितां इंग्रज झटत होता परंतु मोरचा लागू होईना. शहरांत जुने म्हातारे लोक होते त्यांस शहरास व किल्ल्यास कोठें मोरचा बांधून लागू होतो हें माहीत होतें परंतु ही माहिती फार थोड्यांस होती. आंतील फितुराचे योगानें म्हणा किंवा बाहेरील कोणी माहितगार इंग्रजांस मिळाला म्हणा, तिसरे दिवशीं ही माहिती त्यांस मिळाली. मग रात्र पडल्यावर तीं तीं ठिकाणें साधून मोरचे बांधून अवशीं चार घटका रात्रीस किल्ल्याचे पश्चिम बाजूवर दक्षिणेकडील अंगानें गरनाळी[१] तोफ चालू झाली. इकडून वायव्य बाजूनेंही तोफ गोळा टाकूं लागली. शहरावर चार तोफा लागू झाल्या. अशा तोफा चालू झालेल्या पाहून बाईसाहेबांस अति दुःख झालें व निराशेची पहिली पायरी त्यांस लागली. परंतु न डगमगतां लोक जास्ती ठिकठिकाणीं ठेऊन आपण स्वतां अन्न-पाण्याची काळजी न करितां किल्ल्यावर व शहरचे तटावर खपूं लागल्या.

शहरावर तोफांचे गोळे सुरू झाल्यापासून रयतेस अति त्रास होऊं लागला. एकादा गोळा रस्त्यांत पडला म्हणजे तो फुटून पांच पंचवीस मनुष्यें जखमी होत व दहा पांच मरत. याशिवाय घरावर गोळा पडला म्हणजे लहान घरें धक्क्यानें कोसळून जात, कांहीं घरें जळून जात असत. मग त्यांत जिवाचा व वित्ताचा अनर्थ होण्याचा संभव असे. परंतु बाईसाहेबांनीं शहरांत बंब तयार करून ठेविले होते. आग लागली कीं ती, बंबांनीं विझवीत असत. शहरचे व्यापार अगदीं बंद झाले. मनुष्यास इकडे तिकडे फिरकावयाची धास्ती वाटूं लागली. याप्रमाणें शहरांतील लोकांसच काय, पण किल्ल्यावरही अति

१ एक प्रकारची रुंद तोंडाची तोफ.

त्रास होऊं लागला. किल्ल्यांत वाड्याचे गच्चीवर गोळा पडला म्हणजे तेथें तो फुटून मोठा आवाज होऊन त्याच्या सात आठ कपच्या उडत व त्या जवळचे माणसांस जखमी करीत. नंतर तोच गोळा गच्ची फोडून खालचे मजल्यावर पुन्हां आवाज होऊन फुटे, व पुन्हां कपच्या उडोन शेजारचे माणसांचा प्राणघात करी. नंतर पुन्हां तक्तपोशी फोडून त्याचे खालचे मजल्यावर फुटून नासाडी करीत असे. शेवटीं मोठा आवाज होऊन आंतून खिळे कातरी व लाल झालेले छरे वगैरे उडून फार मनुष्यें जाया होत.

रात्रीचे प्रहरीं शहरावर व किल्ल्यावर गोळे पडत त्याची फार भयंकर शोभा दिसे. पन्नास साठ शेर वजनाचा जरी गोळा असे तरी गरनाळी तोफेंतून उडाल्यावर लहान चेंडूसारखा व खदिरांगारासारखा लाल दिसे. दिवसास सूर्याचे तेजामुळें गोळे साफ दिसत नसत. परंतु रात्रीच्या काळोखांत ते लाल भडक गोळे चेंडूफळीसारखे इकडून तिकडे उडतांना दिसत. मनुष्यास असें वाटावें कीं हा गोळा आतां मजवर येऊन पडेल; परंतु तो गोळा सात आठशें कदम पुढें जाऊन पडत असे. पांचवे साहवे दिवशीं याप्रमाणेंच युद्ध झालें. प्रहर दीड प्रहरपर्यंत बाईसाहेबांचा जय होऊन इंग्रजांचा फार नाश होत असे; व त्यांच्या तोफाही कांहीं वेळ बंद पडत. नंतर कांहीं वेळानें इंग्रजांचा जय व्हावा. पलटणी लोक हवालदील होऊन बाईसाहेबांच्या तोफा बंद पडाव्या. सातवे दिवशीं सूर्यास्तापासून पश्चिम बाजूची तोफ बंद झाली. तेथें मनुष्य ठरेना व शत्रूच्या तोफेनें मोरचाही पाडून टाकला. नंतर रात्रीं हुशार गवंडी लोक आणून युक्तीनें घोंगडी पांघरून हळूहळू बुरुजावर चढविले. व

विटा वगैरे सामान खालपासून मनुष्याची माळ लावून त्यांस जमिनीवर निजवून त्यांकडून पोंचविलें. नंतर त्या गंवड्यांनीं निजून निजून मोरचा बांधला. याप्रमाणें इंग्रजांस कळूं न देतां मोरचा बांधल्यावर तोफ मोरच्यावर ठेवून चालू केली. तेव्हां इंग्रजांकडील लोक गाफिल होते. त्यांचें फार नुकसान होऊन त्यांच्या दोन तोफा प्रहरपर्यंत बंद झाल्या.

उजाडते आठवे दिवशीं इंग्रज फौजेनें शंकर किल्ल्यावर मारा सुरू केला. इंग्रज सरकारापाशीं किल्ले दुर्ग याचे वेढ्यांत उपयोगी पडणाऱ्या अति मौल्यवान् दुर्बिणी होत्या, त्या इतक्या चांगल्या असत कीं, अति दूरचा देखावा अगदीं जवळ व स्पष्ट दिसत असे, व कोणचें मनुष्य कोठें काय काम करीत आहे हें दिसे. अशा दुर्बिणी लावून किल्ल्यांत पाण्याची जागा होती ती रोखून त्याजवर तोफेचा भडिमार चालू केला. त्यांत प्रथम रांगडे ब्राह्मण सहासात कावडी घेऊन पाण्यास गेले होते. त्यापैकीं चार असामींस देहांत प्रायश्चित्त मिळून बाकीचे कावडी टाकून पळून गेले. याप्रमाणें प्रहरभर पाणी न मिळाल्यामुळें स्नानादि कर्में अडकून राहिलीं. किल्ल्यांत पाण्याचा मोठा हांकाटा झाला. तेव्हां पश्चिम व दक्षिण बुरुजावरचे गोलंदाजांनीं ज्या तोफा शंकर किल्ल्यावर चालू होत्या त्यांजवर एकदम भडिमार करून त्या बंद पाडल्या. मग हौदावर पाणी भरण्याची मोकळीक होऊन स्नान-भोजनाची व्यवस्था लागली. नंतर जेवण होऊन कांहीं वेळ गेला नाहीं तों एकदम मोठा आवाज होऊन जिकडे तिकडे धूर व धूळ उसळली. त्यामुळें दशदिशा धुंद होऊन कोणास दिसेनासें झालें. सर्वांचे पोटांत धस्स् होऊन काय झालें याची धास्ती पडून

गेली. मग दोन घटकेनें धूर नाहींसा होऊन चौकशी करूं लागलों तों वाड्याचे समोरचे मैदानांत दारूचे कारखान्यांत तीस पुरुष व आठ बायका मरण पावलेल्या दृष्टीस पडल्या व चाळीस पंचेचाळीस माणसें भाजून जखमी होऊन पडलीं होतीं. चिंचेचे मैदानांत दारूचा कारखाना सुरू होता. दोन मण दारू झाली म्हणजे बुरुजाखालीं तळघरांत नेऊन ठेवावी. त्या कारखान्यांत गोळा पडतांच तेथें दारू होती ती पेटली व तसेंच दारूचे बारीक बारीक कण सर्व धूळभर पसरले होते ते पेटून त्याजबरोबर धूळ उधळली.

अष्टम दिवशीं फार कहर झाला. युद्ध फार तुंबळ झालें. वीर मोठमोठ्यानें आरोळ्या देत होते. बंदुका कडामिनींचे व तोफांचे आवाज अगणित होत होते. शिंगें, कर्णे, बिगुल जिकडे तिकडे वाजत होते. धुळीनें, धुरानें व नाना प्रकारच्या ध्वनीनें सर्व दिशा भरून राहिल्या होत्या. इंग्रज फौजेनें फार शिकस्त केली. रात्रौ आकाशांतून तोफेचे लाल गोळ्यांची शहरावर एकसारखी वृष्टि चालली होती. शहरांत हजारों माणसें मरण पावलीं. बाकीचीं जिवाचे आशेनें कोठें वळचणीला, कोठें घरांत पिछाडीस दडून राहिलीं. तटावरचे शिपाई गोलंदाज पुष्कळ मेले, व त्यांचे जाग्यावर दुसरे उभे केले. बाईसाहेबांस फार मेहनत पडत होती. चोहींकडे नजर ठेवून जी जी उणीव पडेल ती स्वतां पुरविण्याचा हुकूम करीत होत्या.

---

## भाग २ रा

इकडे तात्या टोपी काल्पीहून पंधरा हजार फौज घेऊन निघाला, तो मजलदरमजल डबल कूच करून झांशीजवळ येऊन पोंचला. व रातोरात मोरचे बांधून तोफेस बत्ती दिली. इकडून कपतानसाहेबही इंग्रजी फौज घेऊन त्याजपाशीं लढावयास वेढ्याचा बंदोबस्त करून आला. तो दिवस दहावा होता. झांशींतील सर्व लोक, त्या लढाईवर झांशीचा परिणाम अवलंबून असल्यामुळें मोठ्या भीतीनें लढाईचा परिणाम काय होतो हें पाहण्यास तटावर जमले होते. दोन्ही पक्षांचे शिपाई जिवापाड मेहनत करीत होते. कोणास भान राहिलें नव्हतें. समोरासमोर लढाईचे प्रसंगांत पायदळाबरोबर पायदळ, स्वाराबरोबर स्वार लढत होते व सर्व रणांत बिगूल शिंगें बंदुका तोफा इत्यादिकांचा आवाज धुंद भरून राहिला होता. झांशीवाली बाई व तिचे सरदार तटावरून दुर्बिणी लावून पहात होते. परंतु झांशीच्या दुर्दैवानें म्हणा अगर तात्या टोपीचे कमी कसबानें म्हणा, किंवा हिंदु शिपाई लोक नादान व नाशूर असल्यामुळें म्हणा, तात्या टोपीची फौज फुटूं लागून शिपाई पळ काढूं लागले. इंग्रज फौजेनें तोफा मोरच्यांतून काढून पाठलाग करण्यास आरंभ केला. रिसाल्याच्या स्वारांनीं एकदम हल्ला केला. तात्या टोपी स्वतां मोठमोठ्या तोफा टाकून रण सोडून पळून गेला. इंग्रजी फौजेचा जयजयकार होऊन त्यांची हिंमत दुप्पट झाली व लढाईचें सामान मिळालें. पेशव्यांचे फौजेचा मोड होऊन तिनें पळ, अपयश, व दुःख यांचा स्वीकार केला. व झांशीवाल्याच्या फौजेंत हाहाकार होऊन सर्वांचीं मनें होरपळून जाऊन दुःख, भीति, निराशा यांचा अंमल बसला.

परंतु निराशेची शक्ति कांहीं विलक्षण आहे. आतां बहुतकरून झांशी इंग्रजांचे हातीं पडेल, व ते आमची दया करणार नाहींत ही कल्पना मनांत येऊन शिपाई लोकांस उलट अधिक वीरश्री चढली. बाईसाहेबांनीं सरदार लोक जमवून ठरविलें कीं, आजपर्यंत झांशी लढली ती पेशव्यांचे बळावर लढली नाहीं, व आतां पुढेंही तिला त्यांच्या मदतीची जरूर नाहीं. असा निश्चय करून सरदार लोक व बाईसाहेब स्वतां तटाच्या बंदोबस्ताकरितां पुन्हां तटावर मेहनत करूं लागल्या. त्या रात्रीं इंग्रज गोलंदाजांनीं शिकस्त केली. शहरावर व किल्ल्यावर तांबडे लाल गोळ्यांचा वर्षाऋतूंतील पर्जन्याप्रमाणें वर्षाव केला. किल्ल्यांतील सर्व लोक रात्रभर जागरण करीत बसले होते.

उजाडतां दिवस अकरावा युद्धास येऊन पोंचला. बाईसाहेबांनीं स्वतां तरवार बांधून गोलंदाज लोकांस बक्षिसें देऊन ज्या तोफा बंद झाल्या होत्या त्या सर्व सुरू केल्या. इंग्रज फौजेनें सर्व गरनाळी तोफा किल्ल्यावर सुरू केल्या तेव्हां वाड्यांत आकांत होऊन गेला. इतक्यांत एक मोठा व सुस्वर ध्वनी ऐकूं आला. पाहतात तों दुसरे मजल्यावर गणपतीचें मखर भाद्रपद मासीं व नवरात्रांत उत्सवांत कथा कीर्तन वगैरे करण्याकरितां पूर्वापार केलेलें होतें, तेथें सर्व ऐने महालच होता. सर्व जाग्यास आरसे लखनौचे लाविले होते, व छतासही आरसे होते, व काचेचीं झाडें व हांड्या ग्लासें[1] वालेछतें[2] लावून जागा भरली होती. त्या जाग्यावर तीन मजले होते तेथें गरनाळी तोफेचा गोळा पडून आवाज फार मोठा झाला, आणि तोच

१ ग्लास=कांचसामान. २ वालशेड या इंग्रजी शब्दाचा अपभ्रंश; भिंतीला लावण्याचा कांचेचा दिवा.

गोळा खालील मजल्यावर पडतांच मोठा आवाज होऊन त्यांतील खिळे छरे वगैरे उडाले. तेणेंकरून तेथें चार माणसें मरण पावलीं व नऊ मनुष्यें जखमी झालीं; आणि आवाजाबरोबर खालील कांचांचा सुस्वर आवाजानें खळखळ चूर होऊन राशी पडल्या. हांडी, गलास किंवा ऐना एकही राहिला नाहीं !

त्या दिवशीं शेंकडों तोफेचे गोळे वाड्यावर पडत होते, परंतु वाड्यास इजा झाली नाहीं. गोळा गच्चीवर हापटून तो गोळा तीन छतें तोडून खालीं येऊन पडून शांत होत असे परंतु जुना बादशाही चुना कमाविलेला असल्यानें गोळ्यापुरतें मात्र भोंक पडून गोळा खालील मजल्यावर पडे; परंतु भोंकापेक्षां जास्त काम तडावलें नाहीं व फुटलेंही नाहीं. व मजल्यास गोळ्यामुळें चाळणीस जशीं भोंकें असतात अशीं भोंकें दरोबस्त ठिकठिकाणीं पडलीं. वाड्याचे दरएक दालनास गोळे अति पडूं लागले, तेव्हां सर्व मनुष्यें घाबरून मध्येंच एक खोली होती त्या खोलीस निर्भय मानून त्या खोलींत शिरलीं. कारण कीं, त्या खोलीवर पांच मजले होते. त्या खोलींत मनुष्यें जमतां जमतां चौसष्ट माणसें जमलीं आणि खोलींत गर्दी झाली. त्यांत आम्हीही शिरलों होतों. दासी बायकाही त्यांतच होत्या. सर्व माणसें उभींच होतीं. उन्हाळीचे उष्णतेमुळें व गर्दीमुळें व जिवाचे भीतीमुळें अंगास घाम फार सुटला होता. श्वास सोडण्यास देखील जागा नव्हती. आम्ही अगदीं घाबरून गेलों होतों. त्या खोलींत एकंदर चार घटका होतों. मृत्युभयाहून दुसरें भय नाहीं. सर्वांचे जीव कासावीस झाले. इतक्यांत बाईसाहेबांकडील गोलंदाजांनीं गर्दी उडवून इंग्रजांच्या तोफेवर गोलंदाज वगैरे मनुष्यें ठरूं दिलीं नाहींत. तेणेंकरून वाड्यावर

गोळे पडण्याचे नाहींसें झालें. मग त्या खोलींतून सर्व लोक बाहेर निघाले.

यាप्रमाणें प्रहर दोन प्रहर अति संकट येऊन पडे. तेच दिवशीं रात्रीं एकांतांत अंथरुणावर पडलों असतां माझे मनांत अनेक विचार येऊं लागले. मी येथून जिवंत सुटतों कसा व मला घरचीं माणसें भेटतात कशीं ? इतक्यांत हरीपंताची[1] व त्यांच्या शपथेची आठवण झाली. असे अनेक विचार येऊं लागले, तेव्हां या संकटांतून वैजनाथेश्वराशिवाय दुसरा कोणीही पार पाडणारा समर्थ नाहीं असा पक्का भरंवसा ठेऊन त्याचा मनोमय धांवा करीत स्वस्थ पडलों.

याप्रमाणें अकरा दिवस लढाई एकसारखी चालली होती. तरी बाईसाहेबांचे मेहनतींत व हिंमतींत यत्किंचित्ही फरक पडला नाहीं. शाबास त्या बायकोची ! त्या रात्रीं नेहमींप्रमाणें बाईसाहेब स्वतां शहरचे तटावर व किल्ल्यावर फिरून बंदोबस्त ठेवीत होत्या. इतक्यांत बातमीदारानें असें कळविलें कीं, इंग्रज सरकारानें झांशीवर दोन अडीच लक्ष रुपयांची दारू खर्च केली. तरी परिणामीं जय येईल असें दिसत नाहीं. व दारूगोळाही संपला आहे. सबब उदईक प्रहर दिवस लढाई करून लष्कर उठून जाईल. ही बातमी ऐकून बाईसाहेबांस किती आनंद झाला असेल याची कल्पना एक त्यांचे मनास ठाऊक. त्यांचे तोंडावर जास्ती टवटवी येऊन त्यांची शक्ति व हिंमत दुणावली. त्या रात्रीं दोहोंच्या सुमारास त्यांस गाढ झोंप आली. पण बाईसाहेबांचें दैवघटित चांगलें नव्हतें. पहाटेच्या सुमारास एकाएकीं

---

१ धाकटा भाऊ. यानें तुम्ही एक वर्षाचे आंत उत्तर हिंदुस्थानांतून परत आलां नाहीं तर मी घरदार सोडून बैरागी होऊन निघून जाईन, अशी शपथ घेतली होती.

शहरच्या दक्षिण बाजूच्या तटावरील तोफ बंद पडली होती, तेथून एक बातमीदार येऊन त्यानें बाईसाहेबांस जागें केलें. त्याची हकीकत ऐकून सर्वांच्या पोटांत धस्स् झालें; व आमचे प्राण आंतले आंत विरघळून गेले. हरहर ! अठ्ठायशीं प्रहर मोठ्या शूरत्वानें लढून सरतेशेवटीं शहर इंग्रजानें सर केलें. आम्हीं साहावे मजल्यावर जाऊन पाहूं लागलों; ते वेळेस सकाळचें अंधुक अंधुक दिसूं लागलें होतें. हजारों मजूर लोक डोक्यावर गवताचे भारे घेऊन शहरच्या तटाकडे येत आहेत व त्या भाऱ्यांच्या आश्रयानें मागील बाजूनें गोरे शिपाई चालत आहेत, असें दृष्टीस पडलें. पाहतां पाहतां गवताचे भारेवाले तटापर्यंत येऊन पोंचले. भारेवाल्यांनीं तटापानीं येऊन भराभर डोकीवरचे भारे एकावर एक टाकून तटाशीं जिन्यासारखी वाट रचली त्याजवरून झराझर गोरे शिपाई तटावर चढले. तटावर बाईसाहेबांनीं जे शिपाई ठेविले होते त्यांपैकीं कांहींनीं पळ काढला, कांहीं शूर होते त्यांनीं गोरे शिपायांस हरकत केली, परंतु ते थोडे असल्यामुळें कापले गेले आणि दहा बारा मिनिटांच्या आंत हजारों गोरे लोक शहरच्या दक्षिण तटावर दिसूं लागले.

प्रथम बाईसाहेबांस हकीगत समजली त्या वेळेस त्यांस सहस्र विंचू चावल्याप्रमाणें एकदम दुःख झालें. त्यांच्या तोंडावरचें पाणी पळालें. अक्कल गुंग झाली. आतां झोंप घेण्यापूर्वीं बातमी ऐकिली काय, आणि ह्या बातमीचा अर्थ काय, अशा भीति, दुःख व आश्चर्य यांच्या घोटाळ्यांत पडून, पुढें काय करावें याचा विचार न सुचतां शून्य दृष्टीनें बाहेर येऊन दक्षिण बाजूकडे पाहतात तों हजारों गोरे शिपाई तटावर दृष्टीस पडले. बाईसाहेब आम्हां भटभिक्षुकांसारख्या

नादान नव्हत्या. अक्कल गुंग व भीति यांचा क्षणभर पगडा पडला होता तो दूर होऊन बाईसाहेबांस शूरत्वाचा आवेश चढला. व विलायती म्हणजे मुसलमान आरबांसारखे बहुत दिवसांचे नोकर सुमारें दीड हजार तरवारबंद होते ते बरोबर घेऊन स्वतः ताबडतोब हत्यारबंद होऊन किल्ल्याचे खालीं उतरल्या. व मोठ्या दरवाज्यांतून बाहेर पडून दक्षिण बाजूकडे वळल्या. शहरचे दक्षिण तटावरून आंत उतरून हजारों गोरे आले त्यांच्याही तरवारी म्यानांतून बाहेर पडल्या होत्या. बाईसाहेब सर्वांचे मागें चालत असतां आवेशानें हातांत नागवी तरवार घेऊन सर्वांचे मध्यभागीं गेल्या. गोरे लोकांची व विलायती लोकांची गांठ पडतांच एकदम तरवारींचा चकचकाट होऊन लोक एकमेकांत मिसळून गेले. ते वेळेचे युद्धास भारती युद्धाचीच उपमा साजेल. उभयतांची पांच पन्नास अंक मोजण्यासही उशीर लागेल इतके अवकाशांत तरवार चालली व शेंकडों गोरा कापून काढला गेला. बाकी राहिले ते शहराकडे पळून जाऊन झाडाच्या व घराच्या आडून बंदुकेचे बार काढूं लागले. मागूनही दुसरे गोरे लोक येतच होते, तेही तरवार न चालवितां दुरून बंदुकीच्या गोळ्या घालूं लागले. ते वेळेस बाईसाहेबांचे पदरचा पाऊणशें वर्षांचा जुना सरदार होता तो पुढें होऊन बाईसाहेबांचा हात धरून बोलूं लागला, " महाराज, या समयीं आपण पुढें जाऊन बंदुकीचे गोळीनें मरणें आणि रांड मरणें बरोबर आहे. गोरे लोक इमारतीचे आड होऊन गोळी घालीत आहेत. शिवाय शेंकडों गोरा शहरांत शिरला असेल. शहरचे सर्व दरवाजे खुले झाले असतील. तरी येथें लढण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्यापेक्षां आपण किल्ल्यांत जाऊन दरवाजा बंद करून पुढें ईश्वर युक्ति

सुचवील तसें करूं, ही वेळ परतण्याची आहे." असें म्हणून त्यानें बाईसाहेबांस धरून परतविली. व आरोळी देऊन विलायती लोकांसही मागें फिरविलें. बाईसाहेब विलायती लोकांसह किल्ल्यांत येऊन दरवाजा बंद करून अडसर ओढून स्वस्थ राहिल्या.

इकडे गोरे लोक चोहों दरवाज्यांतून आंत शिरले ते बिर्जन करीत चालले. जितका ५ वर्षांवर व ८० वर्षांचे आंत पुरुष दिसत चालला तितका गोळीनें अगर तरवारीनें मारीत चालले, व एकीकडून शहरास आग लावून दिली. ती प्रथम हलवाईपुऱ्यास लाविली. ते वेळेस शहरांत दुःखाचा जो कल्लोळ उसळून गेला त्यास पारावार नाहीं. मेंढरांच्या कळपांत लांडग्यांनीं उडी घालतांच जशी त्या प्राण्यांची स्थिति होते, त्याप्रमाणें लोक भयानें आतुर होऊन जिकडे तिकडे सैरावैरा पळूं लागले. कांहीं पळतां पळतां मुडदे होऊन खालीं गळूं लागले. कोणी या गल्लींत शीर, कोणी घरांत अडचणींत लप, कोणी दाढी मिशा उतरून स्त्रीचा वेष धारण करून बस, कोणी शेतखान्यांत जाऊन लप, याप्रमाणें जशी ज्यास जीव बचाविण्याची युक्ति सुचली तसें तो करूं लागला. गोरे लोक शहरांत शिरून बिजन करूं लागले, असें समजतांच शहराचे मध्यभागीं भिड्यांचा बाग होता, त्यांत हजारों लोक चोहोंकडून शिरले. तेथें गोरे येतांच सर्व लोक दीन होऊन जमिनीवर साष्टांग नमस्कार घालून करुण स्वरानें बोलूं लागले कीं, साहेब, आम्ही निरपराधी रयत आहों. आम्ही लढवई नाहीं. आम्हांस दयाळू होऊन प्राणदान द्यावें, आम्हांस मारूं नये. अशी त्यांची करुणा भाक ऐकतांच त्या सर्वत्रांचे नशीबानें गोऱ्यावरील

---

१ कत्तल.

मुख्य आफिसरास दया आली. त्यानें त्या प्रणतांस अभय वचन देऊन व लागलीच बागाभोंवतीं पहारा ठेवून दरवाज्यास कुलुपें मारिलीं, व हुकूम केला कीं बाहेरील लोक आंत येऊं देऊं नये, व आंतले बाहेर सोडूं नये. याप्रमाणें तीं माणसें बायका पोरें मिळून वीस हजार त्या बागेंत वांचलीं गेलीं.

---

## भाग ३ रा

इकडे बाईसाहेब किल्ल्यांत आल्यावर अति शोकविव्हल होऊन निश्चलपणें दिवाणखान्यांत बसल्या. त्या तेजस्वी स्त्रियेची ते वेळची स्थिति पाहून व तिच्या अमानुष पराक्रमाचा हा अत्यंत दु:खकारक परिणाम मनांत आणून आश्रित मंडळीस अति दु:ख झालें; व मंडळी जिकडे तिकडे चिंताक्रांत होऊन आतां पुढें बाईसाहेबांनीं काय करावें याजविषयीं आपसांत हळूहळू विचार करूं लागली. परंतु बाईसाहेबां-जवळ कोणी जाईना. एक प्रहरानंतर बाईसाहेब शहरची काय हवाल-दील आहे हें पाहण्याकरितां गच्चीवर आल्या. तेव्हां त्या दीन शहराचें जें दु:ख त्यांचे दृष्टीस पडलें त्यानें त्यांच्या अंत:करणास कळवळा येऊन खळखळा डोळ्यांत पाणी आलें. हलवाईपुरा मोठा व संपन्न असा शहराचा भाग होता. तो पेटून मोठा आकांत झाला होता. भर उन्हाळीचे दिवसांत मध्यान्ह समय असल्यामुळें त्या गगना-पर्यंत जाणाऱ्या ज्वालांची आग अति दु:सह झाली होती. जिकडे तिकडे रडारड, ओरडाओरड, पळापळ चालली होती. बंदुकांचे शतावधि आवाज एका मागून एक फटाफट् होत होते, व तितके निरपराधी लोकांचे जीव फटाफट जात होते. हजारों श्वापदें मरण-

समयींचा दु:खकारक शब्द काढून ओरडत होतीं. कांहीं सुटलीं होतीं तीं अन्नपाण्याकरितां सैरावैरा पळत होतीं. व कुत्रे, बैल, घोडे, खेचरें, उंट, गाढवें यांच्या करुणस्वराचा एकच कल्लोळ होऊन गेला होता. त्या भयंकर स्थितीची आठवण झाली म्हणजे अंगावर कांटा उभा राहतो. आपल्याकरितां या निरपराध प्राण्यांचे असे भयंकर हाल होत आहेत असें वाटून बाईसाहेबांस दे माय धरणी ठाय झालें. स्त्रियांचें हृदय फार कोमल असतें. त्यांस दुसऱ्यांची दया फार लवकर येते. पुरुषांसारखीं त्यांचीं मनें कठोर नसतात. बाईसाहेबांच्या हृदयांत दु:ख व करुणा इतकी ओतप्रोत भरली कीं, त्यांस आपण महापातकी आहों असें वाटूं लागलें; व त्यांचे मनाचा निश्चय कायम झाला. पदरचे सर्व लोकांस बोलावून आणून असें कळविलें कीं, "मीं वाड्यांत दारूगोळा घालून पेटवून मरून जाणार; ज्यास येथें मरणें असेल त्यानें राहावें, बाकीच्यांनीं रात्र होतांच किल्ला सोडून शहरांत जाऊन जीव बचावण्याची सोय पाहावी." ते वेळेस ज्या वृद्ध सरदारानें बाईसाहेबांस मागें फिरविलें होतें, त्यानें पुढें येऊन बाईसाहेबांचा हात धरून त्यांस दिवाणखान्यांत नेऊन बसविलें, व बोलूं लागला कीं, "महाराज, आपण किंचित् शांत व्हा. ईश्वरानेंच हें दु:ख या शहरावर आणलें आहे, त्यास आपला कांहीं इलाज नाहीं. कारण सर्व गोष्टी पूर्वसंचित कर्माप्रमाणें होतात. आत्महत्या करणें हें मोठें भयंकर पातक आहे. पूर्वपातकांचीं या जन्मीं आपण फळें भोगतों, त्यांत आणखी महान् पातकाची भर या जन्मांत घालूं नये. जीं दु:खें येतील तीं आपण निमूट सोसलीं पाहिजेत, म्हणजे पुढें आपल्यास त्यांचा उपसर्ग लागणार नाहीं. शिवाय आपण शूर आहांत,

आपण आत्महत्येचा विचार बिलकुल मनांत आणूं नये. रात्रीं तयारी करून शहराबाहेर निघून जाऊन शत्रूशीं प्रसंग पडल्यास युद्ध करून शत्रूचा घेर फोडून पेशव्यास जाऊन मिळूं. मध्यंतरीं मृत्यु आला तर फारच चांगलें होईल. येथें आत्महत्या करून पातकाचा संचय करण्यापेक्षां धारातीर्थीं स्नान करून स्वर्ग जिंकणें हें फारच चांगलें आहे. त्यापेक्षां आपण आतां किमपिही दुःख करूं नये, स्वस्थपणें स्नान-भोजन करून रात्रीं शत्रूचा परिघ फोडून जाण्याचे तयारीस लागावें." हे शब्द ऐकतांच बाईसाहेबांस किंचित् समाधान वाटून त्यांस पुन्हां शूरत्वाचा आवेश चढला. व त्यांनीं दोन वेळ पित्याप्रमाणें सुमार्ग दाखविल्याबद्दल त्या वृद्धाचें पादवंदन केलें. नंतर सर्वांनीं त्या वृद्धाचे बोलण्यास मान देऊन समाधानवृत्तीनें स्नानभोजनादि नित्यकर्मे आटोपलीं. दिवे लागण्याच्या सुमारास आम्हांसारखी भिक्षुक मंडळी होती त्यांस योग्य बक्षिसें देऊन मोठ्या प्रेमानें बाईसाहेबांनीं निरोप दिला, व शहरांत जाऊन आपला जीव जसा रस्ता सुचेल तसा वांचवावा म्हणून किल्ल्याचा दरवाजा उघडून बाहेर काढून दिलें. नंतर जे लढवई लोक नव्हते त्यांस व दास दासी वगैरे सर्व नोकरांस तमाम जाण्याची परवानगी दिली. याप्रमाणें सर्व लोक किल्ल्यांतून निघून शहरांत आले. त्यांत आम्हीही मांडवगणे यांजकडे आलों.

इकडे बाईसाहेब अवशीचे बारा घटकांचे सुमारास सर्व तयारी करून किल्ल्याचे बाहेर निघाल्या. मोरोपंत तांबे[1] वगैरे जी आप्त मंडळी

---

1 लक्ष्मीबाईंचे वडील.

होती ती सर्व हत्यारबंद होऊन घोड्यावर बसून तयार झाली, व प्रत्येकाजवळ कमरेशीं बांधण्यास मोहोरा पुतळ्या दिल्या. संस्थानांत जो अर्थ[1] होता तो सर्व हत्तीवर खलित्यांत[2] भरून घेतला व तो हत्ती मध्यभागीं घेतला. बरोबर सुमारें दोनशें निवडक स्वारांनिशीं जुने जिवास जीव देणारे सरदार होते तेही घेतले. शिवाय सकाळीं इंग्रजा-बरोबर जी चकमक झाली त्यांतून सुमारें १२०० विलायती लोक जिवंत राहिले होते ते घेतले. स्वत: बाईसाहेब अडीच हजार रुपये किंमतीचा पांढरा खंदा राजरत्नासारखा घोडा होता त्याजवर आरूढ झाल्या. पायजमा स्टाकीन बूट वगैरे सर्व पुरुषवेष धारण केला. अंगांत तारेचें चिलखत घातलें. कंबरेस जंब्या वगैरे हत्यारें बांधून काखेंत तरवारही लाविली. व जवळ कांहींएक अर्थ घेतला नाहीं. फक्त एक रुप्याचा जांब म्हणजे पेला पदराशीं बांधून घेतला. नंतर रेशीमकांठी धोतरानें पाठीशीं बारा वर्षांचे वयाचा दत्तक मुलगा बांधून घेतला. शाबास त्या बायकोची.

याप्रमाणें सर्व तयारी झाल्यावर " जय शंकर " असा शब्द करून सर्व मंडळी किल्ल्याखालीं उतरली, व भर शहरांतून उत्तर दरवाज्यांतून बाहेर पडली. शेंकडो लोक बाईसाहेबांचा शेवटचा निरोप घेण्याकरितां रस्त्याचे बाजूनें उभे होते. ते वेळेस त्या शूर लोकांचें अवसान पाहून मृत्यूचे दाढेंत हात घालणारे हे वीर पुरुष शत्रूची फळी फोडून जातील असा पाहणारास पूर्ण भरंवसा आला. बाईसाहेब शहराबाहेर पडल्या नाहींत, तोंच शहरांत इंग्रजाचे लोक बंदोबस्ताकरितां होते त्यांनीं हाक ठोकून गलबला केला, व बाईसाहेबांचे लोकांचे अंगावर धांवले.

---

१ पैसा. २ थैली.

बाहेर शत्रूचे लोकही सावध होऊन त्यांनींही हल्ला केला व तोफा सुरू केल्या. बाईसाहेबांजवळ बंदूक होती, तिचा उपयोग करीत करीत त्यांनीं भरधांव घोडा फेंकला. त्या हल्ल्यांत पुष्कळ लोक मरण पावले व बाकीचे लोक राहिले ते अंधारांत वाट चुकून ज्यास जिकडे वाट फुटली तिकडे पळूं लागले. चोहींकडे स्वार पळूं लागले त्यांत बाई-साहेबांचा घोडा कोणता हें इंग्रज शिपायांस उमगलें नाहीं. त्यांचा घोडा जो निघाला तो एका क्षणांत इंग्रज फौजेचा गराडा फोडून त्यास मागें टाकून पुढें चालला. बरोबर एक घोड्यावर पुरी बसणारी दासी होती ती व एक बारगीर असे दोघांचे घोडे पळत होते. गोठ फोडून बाहेर जे निघाले ते तिघे काल्पीच्या रस्त्यानें चालले. ते समयीं त्यांचा पाठलाग एक कोशपर्यंत कांहीं इंग्रजाचे स्वार करीत होते. परंतु बाईसाहेबांचे घोडे फार चपळ असल्या कारणानें, त्या स्वारांस थोडक्या अवकाशांत दिसतनासे झाले. व रात्रींचा विषय असल्यामुळें घोडे कोठें गेले याचा पत्ता लागेना, सबब ते निराश होऊन मागें फिरले. बाईसाहेब कोठें गेल्या व त्यांचे सरदार कोठें गेले किंवा ते आपल्याच गोठांत गर्क होऊन गेले आहेत, याचा पत्ता इंग्रज शिपायांस लागेना. याजमुळें पुष्कळ वेळ पर्यंत तोफा व बंदुका सुरू ठेविल्या होत्या. उजाडल्यावर शोध करितां बाईसाहेबांचे पदरचे लोकांचीं अनेक प्रेतें सांपडलीं, परंतु मुख्य मंडळी कोठेंही सांपडली नाहीं.

इकडे बाईसाहेब उजेडतां उजेडतां झांशीचे मुलुखाचे हद्दीवर एक गांव आहे तेथें जाऊन पोंचल्या. तेथें दत्तक पुत्रास पाठीचा सोडून महालकरी याचे घरीं त्यास फराळास घातलें, व महालकरी यास झालेलें सर्व वृत्त निवेदन केलें. नंतर आपण कांहीं एक आहार

न करितां पुन्हां मुलास पाठीस बांधून काल्पीचा रस्ता धरला. एकसारखा सर्व दिवसभर भरधांव घोडा टाकीत रात्रीं बारा घटकांचे सुमारास बाई काल्पीस जाऊन पोंचली. अन्नपाण्याशिवाय चोवीस तास, पाठीशीं ओझें बांधून भरधांव घोड्यावर काढले, तेव्हां त्या बाईचे शक्तीची, हिंमतीची व बारगीरपणाची कमाल समजली पाहिजे. असो. गांवाबाहेरील एका गुदामांत पोंचल्यावर रात्र फार झाल्यामुळें बाईसाहेबांनीं श्रीमंतांस कळविलें नाहीं. हें वर्तमान रावसाहेबांस* कळलें तेव्हां तात्या टोपीस बाईसाहेबांचा योग्य बंदोबस्त करण्यास पाठविलें. नंतर तात्यांनीं बाजारांतून किंमतवान् लुगडीं व मुकटा आणवून पंधरा पात्रांचीं स्वयंपाकाचीं भांडीं, रुप्याचीं भांडीं, आचारी, पाणके, तंबू, कनाथी, बिछाईत, शिबंदीचे शिपाई वगैरे सर्व व्यवस्था लावून दिली. नंतर तात्या टोपी व रावसाहेब प्रत्यक्ष बाईसाहेबांस येऊन भेटल्यावर परस्परें सर्व हकीगती समजल्या. बाईसाहेबांचे घोड्यानें फार उत्तम नोकरी बजावली खरी, परंतु तो अगदीं थकून जाऊन गुदामांत पोंचतांच खालीं पडला. त्याजवर बाईसाहेबांचें अत्यंत प्रेम होतें. मग दुसरे दिवशीं सात आठ मजूरदार घोड्याच्या शिरा मळण्याकरितां दोन प्रहरपर्यंत लाविले होते. त्याजमुळें त्या घोड्यास पूर्ववत् हुशारी आली.

---

### प्रश्न

( १ ) झांशीस युद्धप्रसंग होण्याचें कारण काय झालें ? हें युद्ध किती दिवस चाललें, व शेवटीं झांशीचा किल्ला कां पडला ?

( २ ) राणी लक्ष्मीबाई इच्या अंगच्या कोणत्या गुणांची परीक्षा या युद्धप्रसंगानें झाली ?

( ३ ) वेढ्याच्या मुदतींत लेखकावर ( विष्णुभटावर ) कोणते प्रसंग गुदरले, याचें थोडक्यांत वर्णन द्या.

---

* दुसरे बाजीरावसाहेब पेशवे यांचे चिरंजीव नानासाहेब पेशवे. यांनांच बंडवाल्यांनीं आपले पुढारी केलें होतें.

## २

# डिस्पेप्शिया ( अग्निमांद्य )



[ पुढील छोटेखानी गोष्ट कै. हरिभाऊ आपटे यांच्या स्फुट गोष्टींमधून घेतली आहे. यांत हरिभाऊंच्या मनुष्यस्वभावाच्या मार्मिक ज्ञानाचा व त्यांच्या विनोदी लेखनाचा एक चांगला नमुना वाचकांस पाहावयास सांपडेल ]

"दामोदर, अरे दामोदर, पत्रें बित्रें कांहीं आलीं आहेत कीं नाहींत ?" 'नाहीं !' असें उत्तर मिळतांच सकाळीं फेरफटका करून आलेले कृष्णराव वकील आपल्या आफीसमधील एका आरामखुर्चीवर बसले. अलीकडे कृष्णराव अगदीं उदास दिसत असत. त्यांना असें वाटत असे कीं आपण अगदीं खंगलों आहों व अशक्त झालों आहों.....आल्याबरोबर ते बराच वेळ तसेच पडून राहिले होते. थोडा वेळ गेल्यानंतर ते आपल्याशींच म्हणाले, " हें पाहा, आहे का माझा आतां कांहीं उपयोग ! काय केलें मी ! एवढा शिकलों, हाडांचीं काडें केलीं; अभ्यास करून करून परीक्षांवर परीक्षा पास झालों; पण त्यापासून फायदा काय झाला ? छे, छे: ! मी फार वाईट केलें ! नसता येवढा फाजील अभ्यास केला तर काय झालें असतें ? शरीराची हानि मात्र करून घेतली, व नसता रोग मात्र लावून घेतला, दुसरें कांहीं नाहीं ! आणि ह्या माझ्या मूर्खपणाचीं व अविचाराचीं फळें आतां माझ्या लाडकीला भोगावीं लागणार ना ? त्यापेक्षां माझें लग्नच झालें नसतें तर काय वाईट होतें ? काय हें ? पंचवीसावें वर्ष संपतें न संपतें तोंच क्षयाची भावना ! अहो, हा डिस्पेप्शिया

म्हणजे क्षयाचा पायाच नाहीं तर काय ? एक घांसभर जेवण अधिक झालें, कीं लागली अस्वस्थता व्हावयाला ! अमळ एखाद दुसरें भजें किंवा थालीपिठाचा तुकडा खाल्ला, कीं उशाशीं दिवा पाहिजेच रात्रीं बेरात्रीं धावायला ! काय ही आमची प्रकृति, व काय आमचें जिणें ! आतां आमच्या हातून देशाचें हित तें काय होणार, व आम्ही आमच्या समाजाची सुधारणा ती काय करणार ? .... आमचा अवतार बहुतेक तिशीच्या आंतच संपावयाचा; मग आमच्या नांवानें आमच्या आईबापांनीं, बायकापोरांनीं व सर्व "—

इतक्यांत दामोदर सात आठ पत्रें घेऊन धांवत धांवत आला. अर्थात् कृष्णरावांना आपले आत्मगत विचार ( परंतु आसपास असलेल्या मनुष्यास सहज ऐकूं जाण्यासारखे ) तसेच थांबवावे लागले. दामोदरानें दिलेल्या पत्रांतून एक ओळखीचें पत्र कृष्णरावांनीं हातीं घेतलें. तें घेतल्याबरोबर त्यांना कसेंसेंच वाटलें; परंतु त्यांनीं तें एकदम फोडलें. पत्र इंग्रजींत होतें. त्याचा सारांश असा होता:—

" कळविण्यास फारच वाईट वाटतें कीं, ज्या रोगानें आपणास ग्रासलें आहे, असा तुम्हांला आजवर निवळ संशय होता, तो रोग खरोखरीच तुम्हांस त्रास देत आहे. एवढे दिवसपर्यंत तुम्ही उगीच हयगय केलीत. आतां आपला रोग बराच अनावर झाला आहे. कोणीही डॉक्टरानें इतक्या स्पष्टपणें रोग्यास स्वत:स कधीं लिहूं नये. परंतु ' जें काय खरें असेल तें सांगा. यत्किंचित् सुद्धां भीड धरूं नका. मला त्याप्रमाणें विचार करून पुढील तरतूद करणें भाग आहे;' असें आपण निक्षून सांगितलें, म्हणूनच मी इतक्या स्पष्टणें आपणांस लिहीत आहें. तथापि अगदींच निराश व्हावयास नको; यांतूनही

आपणास नीट करण्यास मी आपणाकडून होईल तितकें करीनच, कधींही माघार घेणार नाहीं."

"काय ?" कृष्णराव आपल्याशींच म्हणाले, "खरोखरीच माझा अवतार संपला ? गणपतरावाची सुद्धां खातरी झाली ! आतां आणखी काय पाहिजे ? पण माझी बायको ! माझा बाळ्या ! हाय हाय ! काय, सर्वांना मी चांडाळ अगदीं पोरकें करून जाणार ?"

कृष्णराव वरील वाक्य इतकें मोठ्यानें बोलले कीं तें घरांत राधाबाईंसही ऐकूं गेलें. त्या घाईघाईनें कृष्णरावांकडे आल्या; परंतु त्यांच्या पावलाचा आवाज ऐकल्याबरोबर कृष्णरावांनीं तें पत्र चटकन चुरगळून आपल्या खिशांत घातलें. राधाबाईंनीं तें आत्मगत भाषण ऐकिलेंच होतें. तेव्हां त्यांनीं एकदम विचारलें, "काय ? आतां काय बोलणं चाललं होतं ? कोणाला पोरकं करून जाणार ? हें आहे तरी काय आतांशा आपल्या डोक्यानं घेतलेलं ? ज्या त्या गोष्टीचा नाद ! अभ्यासाच्या दिवसांत अभ्यासाचा नाद; शरीराकडे पाहिलं नाहीं, हाडाचीं काडं केलीं, परीक्षा झाल्या. आतां दोन पैसे मिळूं लागले, तर आतां हा 'कांहीं तरी होतं आहे' 'कांहीं तरी होतं आहे'—असाच नाद लागला आहे ! याला म्हणावं तरी काय, नि करावं काय ? बरं, गणपतराव भावजींकडे जाऊन, नाहीं तर त्यांना इथं एकदा बोलावून आणून, त्यांच्याकडून तपासून घेऊन कांहीं औषध तरी घ्यावं, म्हणून आज किती दिवस म्हणतें आहें; पण तें कांहीं होईना. आधीं खरं म्हटलं तर होत नाहीं कांहींच; नुसती मनाची कल्पना बाधते आहे. बरं, त्यांतून कांहीं होतंयसं वाटतं, तर उपाय नको का करायला ? कां आपलं असंच बसायचं ? गणपतराव भावजी जिवापाड मेहनत

करून नाहीं का औषध देणार ? जावं एकदा त्यांच्याकडे. नाहीं तर असं कशाला ? मी स्वत:च आतां जातें आणि घेऊन येतें त्यांना बोलावून." असें म्हणून राधाबाईनीं पदर घेतला.

त्याबरोबर कृष्णराव उसासा टाकून म्हणतात:—" झालं; गणपतराव भावजींचं झालं आणि सगळ्यांचं झालं. अग, नुसती कल्पनाच उगीच कशी होईल? तुझ्या या ' कल्पना आहेत, कल्पना आहेत, कसला आला आहे डिस्पेप्शिया ! कसलं आलं आहे अजीर्ण !' अशा म्हणण्यानेंच तर आजपर्यंत हयगय होऊन या थरावर गोष्टी आल्या. असो. झालं ! आतां काय त्याचं ! गणपतराव मोठा स्नेही झाला, आणखी त्यानं अतिशय काळजी घेतली, म्हणून आमच्या नशीबीं काय आहे तें का चुकतें आहे कोणाला ? आतां थोडे दिवसांचा तुमचा आमचा संबंध राहिला इतकंच !" असें म्हणून पुन: त्यानें दोन उसासे टाकले. आपणाला कांहीं तरी झालें असून तें अगदीं अनावर झालें आहे, व आपण त्याच्या तडाक्यांतून सुटत नाहीं अशी कृष्णरावांची कुरकुर आज बरेच दिवस चालली होती. आज काय पोटांतच खुटखुटतें, उद्यां काय आमांशच झाला; परवां काय छातींत जळजळतें, तेरवां पोट फुगलें, असें रोज कांहीं ना कांहीं आपणास होतें असें त्यास वाटे. आणि तें नुसतें वाटतेंच आहे, त्यांत तथ्यांश कांहीं नाहीं, असें राधाबाईस वाटून त्या त्याप्रमाणें बोलत. गणपतराव डॉक्टराजवळ तो आपला फार स्नेही म्हणून मोठ्या विश्वासानें कृष्णराव जेव्हां आपल्या आजाराची गोष्ट काढी तेव्हां गणपतराव त्याची निवळ थट्टा उडवून, तुला हें एक वेडच लागलें आहे असें म्हणे. शेवटीं एकदा गणपत-

रावास एकटाच गांठून गंभीरपणें त्यास विचारावें, आणि त्याही वेळीं नीट पाहून त्यानें उत्तर दिलें नाहीं, तर त्याचा नाद सोडून दुसऱ्या एखाद्या डॉक्टराकडे जाऊन आपल्या रोगाची परीक्षा करून घ्यावी, असा त्यानें निश्चय केला. व आदलेच दिवशीं संध्याकाळीं जाऊन त्यानें गणपतरावास अतिशय गंभीरपणानें आपली हकीकत सांगितली. त्या वेळीं काय झालें तें आतांच सांगण्यांत स्वारस्य नाहीं. सबब तें आतांच न सांगतां पुढील हकीकतीकडे वळूं.

इतक्या निराशेचे उद्गार ऐकिल्यावर त्या बायकोला काय वाटलें असेल याची कल्पनाच करावी. आपण खरोखरच नवऱ्याच्या या स्थितीला कारण झालों काय? असें मनांत येऊन तिला धसका बसला व ती एकदम रडूं लागली. पण ती धीराची होती, व खरो-खरच आपल्या नवऱ्याची प्रकृति इतक्या थराला गेली असेल असें तिला वाटेना. ती पुन: म्हणते—"गणपतराव भावजी झाले आणि सगळे झाले, म्हणजे काय? त्यांच्याकडे जाऊन त्यांना नीट सगळें सांगून तपासून घेतलें ना? कां आपलं आपल्याशींच कांहीं तरी मनाला लावून घेऊन बसायचं?"

कृष्णराव त्रासून म्हणतो:—"काय त्रास आहे बुवा? मी आतांच तुला सांगितलें ना, कीं गणपतरावांना विचारलंन् सगळं झालं म्हणून? पहिल्या प्रथम माझ्या मनांत शंका आल्यापासून मी त्याला सांगतों आहें, कीं धंद्यावारी घालवूं नको बरें! पण छे:! त्यानें इथें यावें, तुझ्या देखत थट्टा करावी, तूं हंसावंस, मी आणखी कांहीं बोललों कीं टर करावी. क्लबांत मंडळींत गेलों कीं 'ओ लो, मिस्तर डिस्पेप्शिया! कसं काय आहे तुमचं पोट? कसा आहे तुमचा मॅनिआ

(वेड) ?' असें म्हणून मंडळीस हंसवावें म्हणजे झालें. आणि मला तिऱ्हाइतासारखं आतां लिहितो कीं 'तुमचं दुखणं आतां अनावर झालं आहे; पहिल्यापासून तुम्ही काळजी घेतली नाहींत !' पुनः गुलामाचं तोंड सुद्धां पाहूं नये असं वाटतं. कसले हे स्नेही न् कसले काय ? मला वाटतं कीं फी मिळावयाची नाहीं, व औषधाचे पैसे येणार नाहींत या भयानेंच त्यानें आजपर्यंत सगळा प्रकार थट्टेवारी घालविला. तें कांहीं नाहीं. आतां त्याचा नाद सोडून देऊन आपलं दुसऱ्या एखाद्या डाक्टराच्या कच्छपीं लागलं पाहिजे. स्नेही बरं हे ! हे स्नेही ! वाचा, वाचा हें पत्र !" असें म्हणून त्यानें तें चुरगळून खिशांत घातलेलें पत्र तिच्या अंगावर टाकलें, पण तिनें तें उचलून घेतलें व कोणाकडून तरी वाचून घेऊं असें मनांत आणून आपल्याजवळ ठेवलें. कृष्णरावाचा चेहरा अगदीं उदास झाला; व नवऱ्याचें दुखणें खरोखरच अनावर झालें असेल तर त्याचा दोष आपल्या माथीं येतो; आपण खरोखरीच विनाकारण थट्टा करून त्यास औषधें करूं दिलीं नाहींत याबद्दल राधाबाईसही फार वाईट वाटलें. तिनें तीनतीनदां अश्रुपूर्ण नेत्रांनीं आपल्या नवऱ्याकडे पाहिलें. हेतु हा, दुखण्याच्या अनावरपणाचें कांहीं चिन्ह दिसतें का हें पाहावें. पण तसें तर कांहीं दिसेना. तेव्हां ती मोठ्या बुचकळ्यांत पडली. नवरा म्हणतो त्या-प्रमाणें खरोखरच असल्यास गणपतरावांनीं तरी असें लिहावें कीं काय ? त्याला इकडला स्वभाव ठाऊक, कीं दुखणें एकपट असलें तर शंभर-पट वाटून रिकामी मनाला हाय घेऊन बसायचें, आणि त्यानें असें लिहिलें कसें ? याचा खुलासा स्वत: करून घ्यावा असा तिनें आपल्या मनांत विचार केला. आणि नवऱ्याच्या मनास कांहीं समाधान

यावें या हेतूनें ती त्यास म्हणते, " कांहीं तरी थट्टेनें लिहिलं असेल गणपतराव भावजींनीं बरं ! आपण नीट वाचलं नसेल. "

" पुरे पुरे ! मला कीं नाहीं असल्या बोलण्याचा फार संताप येतो. आतां उगीच माझे थोडे दिवस राहिले आहेत. त्यांत संतापवूं नको. आपले सुखासमाधानानें उरलेले दिवस काढूं दे. ....मला चमत्कार वाटतो तो, त्यानें मी आजपर्यंत हयगय केल्याचा दोष माझ्या माथीं मारला आहे ! "

इतकें म्हणून त्यानें पुनः उसासा टाकला. कांहीं तरी दुसरा विषय काढून यांचें चित्त दुसरीकडे नेलें पाहिजे, असें मनांत येऊन तिनें म्हटलें " बरं, पण वन्संनीं बोलावलं आहे तिकडे चार दिवस हवा बदलायला तरी जाऊं, म्हणजे बरं वाटेल. तिकडची हवा कायशी चांगलीही आहे. "

" चांगली न् वाईट, आतां सगळीकडे सारखीच हवा आहे आम्हांला. आतां एकदाच हवा बदलेल म्हणजे झालं ! "

" हें काय असलं बोलावं ? मी अगदीं खचित सांगतें कीं, कांहीं तरी चूक झाली आहे, नाहीं तर गैरसमज झाला आहे. गणपतराव भावजी कांहीं असें लिहायचे नाहींत. नाहीं तर त्यांनीं थट्टा केली असेल. "

" तर तर ! थट्टा केली असेल ! " कृष्णराव अंगावर येऊन म्हणतो. " आमच्या सगळ्या जन्माची थट्टा झाली आहे. आम्ही मरून लाकूड होऊन पडलों तरी सुद्धा तुम्हांला वाटणार हा थट्टेनेंच मेला ! तेव्हां देखील सारी मंडळी जमून माझ्या मढ्याची थट्टा करून हंसा म्हणजे झालं ! "

कृष्णराव हे शब्द इतक्या संतापानें बोलला कीं, कोणीकडून आपण तोंडांतून शब्द काढले असें वाटून राधाबाई अतोनात पस्तावली. आणि तिला अनावर झालेला हुंदका आतां बाहेर पडेल, या भयानें ती तेथून चालती झाली. थोड्या वेळानें तिनें तें पत्र कृष्णरावाच्या कारकुनाकडून वाचून घेतलें. त्यांतील मजकूर नवऱ्यानें सांगितल्या-प्रमाणेंच होता. तथापि तिला तो बरोबर वाटेना. खरें असलें तरी गणपतराव असें निक्षून कधीं सुद्धां लिहिणार नाहींत. आणि लिहिण्याचें प्रयोजन काय, दिवसांतून एखाद दुसरी तरी खेप व्हावयाची, निदान दोन दिवसांनीं तरी खास, असें असून त्यानें आधीं पत्र लिहिण्याचें कारण काय ? हेंच तिला समजेना. नवऱ्याजवळ या आपल्या शंका उच्चारून दाखविण्याची सोयच नाहीं. तो आतां इतका हातपाय गाळून बसला कीं कांहीं बोलायची सोय नाहीं. सगळ्या रात्रींत एक क्षणभर त्याला झोंप नाहीं. आंथरुणावर पडे, पुनः उठे, येरझारा घाली....पंचवीसदा तो बहिर्दिशेस गेला असेल; सत्तावीसदा आपल्याला ताप आला आहे कीं काय हें पाहाण्यासाठीं त्यानें ज्वरमापक लावून पाहिलें असेल. आपल्याला श्वास लागला आहे असें तर कित्येक वेळां त्यास वाटलें. त्या बिचाऱ्या बायकोस असें झालें कीं ही रात्र उलटून एखाद्या चांगल्या डॉक्टराकडून परीक्षा होते कशी ! " माझं अंग पहा बरं ताप कितपत आहे तो ! " असें म्हणून त्यानें कितीदा अंगाला हात लावून लावून पाहाण्यास सांगितलें, आणि पाहून तिनें ' कांहीं नाहीं अगदीं गार आहे, ' म्हटलें म्हणजे तिच्या अंगावर येऊन, " तुझं असंच; चांगला माझ्या हाताला लागतो आहे न् तुझ्या हाताला लागत नाहीं ! " असें म्हणून ज्वरमापक

लावावें. दहाबारा मिनिटें लावावें. ज्वर नाहीं असें त्यानें दाखविलें म्हणजे ‘ तेंच वाईट आहे, जुनें झालें आहे ’ असें तरी म्हणावें, किंवा ‘ मला वाटतें माझें अंग गार पडत चाललें आहे ’ असाच नाद घेऊन बाटल्यांनीं शेकण्यापर्यंत पाळी आणावी ! राधाबाईस बिचारीस ती रात्र सरतां सरेना. शेवटीं एकदाची सरली व सकाळ झाली. त्याबरोबर मी आतां स्वतः गणपतराव भावजीकडून जाऊन येतें म्हणून ती उठली. पण हा गृहस्थ तिला जाऊं देईना. ‘ माझ्या-जवळून हलूं नको, ’ म्हणे. कोण्या वेळीं काय होईल कोण जाणे ! शिवाय गणपतरावाला न आणतां दुसऱ्या कोणाला तरी आणावा असा त्याचा विचार होता. अंतकाळ समीप आला म्हणजे माणूस जशी निरवानिरव करूं लागतो तसें या स्वारीनें आरंभिलें. राधाबाईस तर तसें कारण कांहींच दिसेना. गृहस्थाला सडकून भूक लागली, तेव्हां कसेंसेंच होऊं लागलें, पण ती भूक हें त्याच्या लक्षांत येईना. ‘ भूक लागली असेल, कांहीं सांजा बिंजा आणूं कां ? ’ असें विचारलें असतां “ कसचा बोडक्याचा सांजा करतेस ? आतां सांजा कसचा आला आहे ! बरं आण, शेवटचा एकदा तुझ्या हातचा खाऊं दे, ” असें म्हणाला. इतक्या त्या एकंदर स्थितींत सुद्धां खरोखर त्या बिचा-रीला हंसूं येण्याजोगें तो बोले. वरून तर त्याच्या स्थितींत कांहीं सुद्धां कमी जास्ती तिला दिसलें नाहीं.

अशी एकंदर व्यवस्था चालली असतां डाक्टर आले. त्यांनीं खिडक्या बिडक्या उघडून नाडी पाहिली, जीभ पाहिली, पण त्यांस आजाराचें चिन्ह कांहीं दिसेना. थर्मामीटर लावून पाहिलें, ताप नाहीं. तेव्हां शेवटीं ‘ होतें काय, ’ म्हणून विचारतां त्यांनीं आपल्याकडून

आपल्या डिस्पेप्शियाचें वर्णन दिलें, आणि क्षयाची भावना झाल्या-चेंही सुचविलें. डॉक्टरांनीं छाती, पाठ, पोट तपासून पाहिलीं. लिव्हर, फुप्फुस किंवा दुसऱ्या कांहींही ठिकाणीं दर्द सांपडेना; डोळे पाहिले, पुनः नाडी पाहिली, आणि बराच वेळ आपलें डोकें खाजवून त्यांनीं शेवटीं म्हटलें, " तुम्हांला कांहीं विशेष झाल्याचें आपल्यास तर आढळत नाहीं; तुम्हांला कांहीं झालंच नाहीं. डिस्पेप्शिया म्हणतां, पण त्याचें एकही लक्षण दिसत नाहीं. जीभ थोडी खराब दिसते. पण अशी जागरणानें किंचित् अजीर्ण होऊनही दिसते. कांहीं नाहीं; तुम्ही जरा दिवसांतून दोन तीन वेळां पौष्टिक पदार्थ खाऊन सकाळीं संध्याकाळीं चार दोन मैलांची रपेट करून येत जा. भूक लागत नाहीं म्हणतां, तर चारपांच दिवस घेण्यापुरतें औषध लिहून देतों तें घ्या म्हणजे प्रकृति साफ होईल. " असें म्हणून एका कागदावर भराभरा कांहीं खरडून तो देऊन ते आपली फी घेऊन चालते झाले.

त्यांची गाडी वाजली असेल नसेल तोंच कृष्णराव राधाबाईस म्हणतात, " या डाक्टरांना कांहीं सुद्धां समजत नाहीं ! हे आमच्या गांवांतले मोठे धन्वंतरी. आणखी यांनीं इतक्या निष्काळजीपणानें तपासून कांहीं नाहीं म्हणून सांगायचें. कांहीं अर्थ नाहीं त्यांच्यांत झालें. " पण राधाबाईला त्या डॉक्टरांच्या बोलण्यानें किती तरी धीर आला. ती लागलीच त्यास म्हणते, " उगीच आतां नादिष्ट-पणानं दुखणं दुखणं म्हणून काय करीत बसायचं ? " ही बोलाचाली होते आहे इतक्यांत गणपतराव डॉक्टराकडून कोणी माणूस चिठ्ठी घेऊन आला. ती चिठ्ठी आंत कृष्णरावांच्या हातांत येतांच " अशा प्रसंगीं आपण स्वतः येण्याचं टाकून चिठ्ठ्या पाठवितो आहे, आतां

याला काय म्हणावं ! कसला स्नेही दगडाचा. सगळा पैसा. लेका, फी घे, नको कोणी म्हणतं आहे का काय ? "—असें म्हणत ती त्यानें फोडली. तों आंतून एकांत एक दोन चिठ्या निघाल्या. पहिली अशी होती:—

" प्रिय मित्रा, माझ्या हातून काल एक गाढवासारखी चूक झाली ! तुला पाठविण्यासाठीं चिठ्ठी लिहिलेली दुसऱ्याच एका रोग्याच्या पाकी-टांत जाऊन त्याच्यासाठीं लिहिलेली तुजकडे आली. आज रोजीं सकाळीं मी त्यास पाहण्यासाठीं म्हणून गेलों तेव्हां त्यानें ती मला दाखविली. तेव्हां माझी चूक माझ्या नजरेस आली. ती चिठ्ठी सोबत पाठविली आहे. मी ही चिठ्ठी त्याच रोग्याच्या घरीं लिहीत आहें. येथलें काम आटोपण्यास बराच अवकाश लागेल; नाहीं तर मी आतांच तुझ्याकडे येऊन क्षमा मागितली असती. दुपारीं तूं घरीं नसशीलच. तेव्हां संध्याकाळीं तुझ्या शिव्या खाण्याकरितां, आणि डिस्पेप्शियाचीं काल्पनिक रडगाणीं ऐकण्यासाठीं येतों. जेवायला राहण्याच्याच बेतानें येईन. "

धांदलींत असलेला मित्र,

**गणपति.**

दुसरी चिठ्ठी अशी होती—" प्रिय मित्रा कृष्णा, तूं भलतेंच कांहीं डोक्यांत घेऊन बसला आहेस, याला म्हणावं तरी काय ? काळीज, फुप्फुस, लिव्हर (यकृत्) व किडनी (मूत्राशय) यांपैकीं एका देखील भागाला कांहीं एक झालेलें नाहीं. रिकामें वेड काय आपल्याला लावून घेऊन नसतें दुखणें उत्पन्न करीत आहेस ? चांगला दोन चार वेळ सांजाबिंजा खाऊन (मला पंक्तीला घेतल्याशिवाय नव्हे हो पण !)

रोज दोन चार मैल रपेट करून येत जा, म्हणजे असल्या कल्पना सुद्धां तुझ्या मनांत येणार नाहींत. शंकेशंकेनें तूं मूर्खपणा करून आपल्याला व घरांतल्या मंडळीस नसता त्रास उत्पन्न करशील. माझी सगळी डिस्पेन्सरी (दवाखाना) पिऊं इच्छिणाऱ्या वेड्या पिरा,—डिस्पेप्शियाराज, हा नादिष्टपणा आपण लौकरच सोडा. नाहीं तर आपल्याला कुलाब्याकडचें एक विशेष लोकांकरितां बांधलेलें घर दाखवावें लागेल."

हीं दोन्ही पत्रें वाचतांच स्वारीच्या मनाची जरा चलबिचल झाली. तें आदले दिवसाचें पत्र आणून पुनः एकदा वाचून पाहिलें. तों खरोखरीच तें अत्यंत प्रिय मित्रानें प्रिय मित्रास लिहिल्याप्रमाणें नसून तिऱ्हाईत श्रीमंताला लिहिल्याप्रमाणें होतें. पण हें पहिल्या दिवशीं स्वारीचे लक्षांत कोठें आलें?

त्या थोरल्या डॉक्टराच्या सांगण्यानें अर्धवट साफ झालेलें मन आतां अगदीं साफ झालें. पण तसें बायकोला बोलून दाखविण्यास त्याचें मन धजेना. कारण ती आपली आणखी टर उडवील. तेव्हां तीं दोनही पत्रें "पहा, काय हें आचरट भावजी लिहितात तें; अगदीं मूर्ख बेटा!" असें म्हणत तिच्या अंगावर टाकलीं व दामोदरास तीं वाचून सांग असें सांगितलें. तो अर्थ कळल्यावर "मी आधींच म्हटलं होतं हें असं कांहीं तरी झालं असेल" असें राधाबाई म्हणाली, आणि "तूं असं म्हणणार हें आम्हांला ठाऊकच" असें कृष्णराव म्हणाला. शेवटीं संध्याकाळीं गणपतराव येऊन त्यानें सर्व हकीकत ऐकून केलेली थट्टा, व कृष्णराव थट्टेनें चिडून संतापून त्यानें दिलेल्या शिव्या, व शेवटीं "आम्ही मरायला टेंकलों तरी तुम्ही

आमची चेष्टाच करणार हें आम्हांला ठाऊक, ” असें उच्चारलेलें वाक्य, हीं फार मजेदार होतीं. आपल्यास कांहीं झालें नाहीं, डिस् नाहीं व पेप्शिया नाहीं असें त्याला खरोखरी वाटेपर्यंत दोन महिने लागले. व तसें वाटूं लागलें तरी त्यानें तसें स्पष्टपणें कधींच कोणाजवळ—त्यांतून राधाबाईजवळ तर नांव सुद्धां नको—कबूल केलें नाहीं. अजून सुद्धां तो असेंच म्हणतो कीं, “ गणपतरावांची व इतर सर्व डॉक्टरांची चूक. मला डिस्पेप्शिया आहेच.” ‘स्वभावो दुरतिक्रमः’!

---

**प्रश्न**

( १ ) कृष्णरावाच्या स्वभावाचें थोडक्यांत वर्णन करा.

( २ ) गोष्टीचा सारांश स्वतःच्या शब्दांत सांगा.

---

## ३

# वडिलांचा सन्मान

[ पुढील उतारा पुणें येथील फर्ग्युसन कालेजचे माजी प्रिन्सिपाल महादेव शिवराम गोळे यांच्या “ हिंदुधर्म व सुधारणा ” या विख्यात ग्रंथांतून घेतला आहे. प्रि. गोळे यांनीं सामाजिक सुधारणेविषयींचे आपले विचार यांत एका आत्मचरित्रपर कादंबरीचे रूपानें मांडले आहेत. विद्याधरपंत या नांवाचा एक विद्वान् गृहस्थ प्रथम कट्टा सुधारक असून, पुढें अनेक लोकांशीं चर्चा केल्यानंतर त्याचें मत हळूहळू पालटत जातें, व आपल्या हिंदुधर्मांतील कित्येक जुनाट व त्याज्य अशा मानीत असलेल्या आचारांत कांहीं ग्राह्य असा भाग आहे, अशी

त्याची खातरी पटते असें यांत दाखविलें आहे. ग्रंथाची भाषा अत्यंत रसाळ व विचारसरणी उद्बोधक आहे. विशिष्ट मतांचे बाबतींत कोणाचा प्रि. गोळे यांच्याशीं मतभेद झाला, तरी या ग्रंथाच्या सुरसतेविषयीं सर्व पक्षांना सारखाच आदर वाटतो. प्रस्तुत प्रकरणांत सुशिक्षित विद्वानांचें आपल्या मातापितरांशीं वर्तन कसें असावें, याची चर्चा आहे ]

एके दिवशीं लीलावतीकडून शहरांतील सर्व प्रसिद्ध गृहस्थांची मीं माहिती करून घेतली व त्यांपैकीं उत्तम सुविचारी गृहस्थ कोण तें तीस विचारिलें. जुन्यांत जुना व नव्यांत नवा, सर्वांत पूज्य असा एकच गृहस्थ येथें दिसतो, असें ती म्हणाली. तो गृहस्थ कोण म्हणून विचारतां, एक श्रीमंत घरंदाज पेन्शनर सदाशिवराव भाऊ म्हणून तेथें होते त्यांचें नांव तिनें मला सांगितलें. तेव्हां त्यांकडे जाऊन त्यांशीं संभाषण करण्याचा मीं निश्चय केला. एके दिवशीं दुपारचे वेळीं मी त्यांचे येथें गेलों. ते नुकतेच निजून उठले होते. त्यांनीं मला स्वागतपूर्वक मोठ्या आग्रहानें लोडाशीं बसविलें व आपणही जवळ बसून प्रकृति व मुलेंबाळें वगैरे संबंधाचे खुशालीचे प्रश्न विचारले.

इतक्यांत घरांत एक तान्हें मूल किंकाळ्या फोडीत आहे असें त्यांनीं ऐकिलें. तेव्हां ते उठून गडबडीनें घरांत गेले; व ‘ काय या बायकांस करावें ? ’ असें संतापून बोलतच त्या मुलास घेऊन बाहेर आले. मूल गोरेंगोमटें दीड दोन वर्षांचें होतें, व आजोबांनीं पोटाशीं धरल्यापासून त्याचें रडणें बंद झालें. भाऊसाहेबांनीं आपल्या उपरण्यानें त्याचे डोळे, नाक वगैरे स्वच्छ पुसून त्यास खेळवून आनंदांत आणण्याचा प्रयत्न आरंभिला. त्यास त्यांनीं हातांत धरून उंच करावें, खालीं ठेवावें, खांद्यावर घ्यावें, डोक्यावर बसवावें, त्याशीं त्याच्या बालभाषेंत बोलावें; व तें खदखदां हासूं लागलें म्हणजे त्याचे मुके

घेऊन त्यास खालीं ठेवावें. याप्रमाणें त्यांचा खेळ पहात मी बराच वेळ बसलों. मला फारच कौतुक वाटलें व आपणाकडे त्या मुलानें यावें म्हणून मींही हात पुढें केले. परंतु माझ्याकडे तें येईना, म्हणून तो नाद सोडून दिला. मुलास खेळवीत असतां मी त्यांकडे आलेला ते विसरले कीं काय असें मला वाटलें; इतकें त्यांचें चित्त दंग होऊन गेलें. कांहीं वेळानें मूल थकलेंसें पाहून त्यास त्यांनीं मांडीवर घेऊन थोपटण्यास आरंभ केला. क्षणभरांत तें झोंपीं गेलें, व मग भाऊसाहेब जणूं काय देहभानावर येऊन माझी माफी मागूं लागले. ‘ तेव्हां त्यांत काय आहे ? मुलें अशींच संभाळलीं पाहिजेत ’ वगैरे सामान्य उत्तरें मीं दिलीं. तीं ऐकून मला पुत्रप्रेम माहीत नाहीं असें त्यांस वाटलें. ते म्हणाले:—

“ तुम्ही अद्यापि तरुण आहां, तुम्हांस दूरदृष्टि आली नाहीं. सुधारणेविषयींचे तुमचे विचार परिपक्क झाले नाहींत. मी म्हणतों याचा राग मात्र येऊं देऊं नका. ”

मग मुलाचे अंगावर परमप्रेमानें हात फिरवून, त्याच्या सुखस्पर्शानेंच प्रेरित होऊन ते म्हणाले—“ हा एवढासा हाडामांसाचा गोळा आहे, परंतु केवढें याचें प्राबल्य आहे ! याचा जो कुटुंबावर जुलूम आहे, तेवढा अगदीं क्रूर राजाचाही आपल्या प्रजेवर नसतो. याचें अंग इतकें कोमळ, यास वाचा नाहीं, हें सर्वस्वी पराधीन, रडण्याखेरीज याजवळ दुसरें शस्त्र नाहीं, तरी याचा केवढा जुलूम आहे ? मार्दव आणि पराधीनता हे स्त्रियांचे विशिष्ट गुण होत, त्यांनींच त्या बलिष्ठांस जिंकतात. परंतु त्या दोन गुणांचा अगदीं अर्क म्हटला म्हणजे तान्हें मूल होय. तें बलिष्ठांस व दुर्बलिष्ठांस, पुरुषांस व स्त्रियांस,

दोघांसही जिंकतें, व दोघांसही आपलें दास्य करायास लावितें. प्रथमच मूल झालें म्हणजे तुम्हां तरुणांस त्याचा तिटकारा येतो; राग येतो. तुम्हांस कोणी न सांगतां कळतें कीं ' अरे, आपणावर जुलूम करणारा प्राणी जन्मास आला रे आला. आतां हा आपली तारुण्याची स्वैरवृत्ति चालूं देणार नाहीं ! ' बाह्यात्कारी तुम्ही असें दाखवितां कीं मूल बायकोचे गळ्यांत, आपणास त्याची बिलकुल फिकीर नाहीं; परंतु त्यानें किंचाळी फोडली कीं तुमचें अंतः-करण कळवळतें; ' काय पोराचे हाल चालविले आहेत ' म्हणून संतापून तुम्ही त्याचें सांत्वन करायास जातां, व बायकोवरचें प्रेम विसरून तीस रागावून क्रूर शब्द बोलतां ! तिनें कां मुलाची उपेक्षा केली याचा विचार करण्यास तुम्हांस फुरसत कोठें आहे ? कुटुंबांत जेवढीं माणसें आहेत तेवढ्यांनीं या तान्ह्या बाळाचें दास बनलेंच पाहिजे. त्यास संभाळतां संभाळतां मुलें कंटाळून पळून जातात. स्त्रिया त्याच्या सुखाकरितां आपलें सर्व काम एकीकडे ठेवितात; त्याच्या हागमुताची किळस मानिनातशा होतात. त्यानें त्यांचीं आंतडीं तोडावीं, रात्रभर झोंप येऊं देऊं नये, कांहीं काम सुचूं देऊं नये, जिवास कोणतेंही सुख लागूं देऊं नये, त्याचा सर्व जुलूम सोसलाच पाहिजे ! त्या मुलास आईची दया न माया ! पुरुषांवर त्याचा कमी अंमल आहे असें समजूं नका. त्यास समजाविण्याकरितां तुम्ही आपले-पाशीं घ्या मात्र, म्हणजे मग तुमचा सर्व संभावितपणा एकीकडे राहतो. तें तुम्हांस लववील तसें लवलेंच पाहिजे. तुमचें बाळपण तुम्हीं विसरलां असतां, तें मुलाच्या नादानें तुम्हांस क्षणभर पुनः परत मिळतें. मूल तुमची शेंडी ओढील, मिशा उपटील, कान धरील, त्यास कोण प्रतिबंध

करणार ? तें आपलें अंग मळवून तुम्हांस मलिन करील; तुम्ही म्हणाल 'धन्यास्तदंगरजसा मलिनीभवंति' (मुलांच्या अंगच्या धुळीनें मलिन होणारे धन्य होत); तें मूल बोट दाखवील तिकडे तुम्हांस गेलें पाहिजे; तें मागेल तें त्यास दिलें पाहिजे. त्यानें आपलें रडण्याचें शस्त्र काढूं नये म्हणून तुम्ही त्यास कडेवर घ्याल, खांद्यावर ठेवाल, डोक्यावर बसवाल; त्यास घेऊन गरगर फिराल; आपण घोडा बनून त्यास चाबूकस्वार कराल; त्यास मांडीवर घेऊन थोपटून 'अंगाई' म्हणून बायकांसारखे स्वर काढाल ! त्याच्यासारखें बोबडें बोलाल, वेडावणें दाखवाल, नाचाल, उड्या माराल, काय करणार नाहीं कोण जाणे ! याप्रमाणें ही मुलाची सेवा आहे. ती मुलाची किंचाळी जे जे खेळ तुम्हांकडून करविते, ते दुसरा कोणी तुम्हांकडून जबरदस्तीनें करून घेईन म्हणेल, तर तुम्ही प्राण गेला तरी करणार नाहीं ! मुलाची ही सेवा जुलमानेंच आपण पत्करतों असें नाहीं; त्यांत फार आनंद आहे. संभावितपणाचे सामाजिक निर्बंध आपणांस क्षणमात्रही स्वातंत्र्य देत नाहींत; तें स्वातंत्र्य मुलाच्या संगतीनें आपणांस प्राप्त होतें. आपलें बाल्य आपण पाहिलें नसतें तें मुलाशीं एकजीव होऊन आपणांस अनुभवितां येतें. मुलाचें हास्य, त्याचा स्पर्श, त्याचे बोबडे बोल, त्याची सर्व कृति आनंददायक आहे. खऱ्या सात्त्विक प्रेमाचा अनुभव मुलास उराशीं धरून त्यास हंसवून त्याची आनंदित मुखचर्या पाहण्यांत आहे. त्या प्रेमानें मात्र खरोखर हृदय द्रवतें व देहभान हरपतें.

आपल्या मातापितरांनीं, बहिणभावंडांनीं व आप्तांनीं आपणाकरितां किती कष्ट भोगिले असतील, आपलें किती दास्य केलें असेल,

आपल्या संगतींत किती आनंद मानला असेल व त्यांच्या निरपेक्ष प्रेमास नित्य केवढा पूर येत असेल, या गोष्टींची कल्पना प्रत्येक तरुणास अवश्य आली पाहिजे; व ती यावी म्हणून त्यानें तान्ह्या मुलाचे जे सोहाळे कुटुंबांत चालतात त्यांचें उत्तम अवलोकन केलें पाहिजे. हें ज्ञान त्यास आल्यास तो स्वैर होणार नाहीं, मातापितरांचा व आप्तांचा मान ठेवील व त्यांस अविचारानें किंवा उन्मत्तपणें दुःख देण्यास तयार होणार नाहीं. ज्यांनीं आपणाकरितां सुखदुःख समान करून अगणित श्रम केले, त्यांसच दुःख देण्यास कोणीही सूज्ञ मनुष्य कारण होईल काय? विशेषतः, मुलगा कृतज्ञ होईल या आशेनें ज्यांनीं आपली सर्व प्राप्ति त्यास सुशिक्षित करण्यांत खर्च केली; व द्रव्याचे संबंधानें, किंबहुना उपजीविकेसंबंधानें, स्वतःस ज्यांनीं पराधीन करून घेतलें, त्यांशींच कृतघ्नता कोण करील? कोणी शुद्ध पशु असेल तर तो करील! मुलांस विद्वान् केल्यावर ते आपला अपमान करितील, असें पुष्कळ जुन्या लोकांस अनुभवानें कळून आलें आहे; परंतु त्यांची कृतघ्नता त्यांकडे, असें मनांत आणून ते मुलांच्या विद्याभ्यासाकरितां लागेल तो खर्च करितात; विधवा स्त्री आपली पदरमोड करिते; कित्येक भिक्षा मागून मुलांचें पोट भरतात. तेव्हां विद्वानांस त्यांची विद्या आप्तांनीं निस्पृहपणें दिलेली असते, असें सिद्ध होतें. मुलगा आपणांहून सवाई व्हावा म्हणूनच त्यांचा प्रयत्न असतो. या प्रयत्नास सिद्धि येऊन मुलास सवाई ज्ञान आलें कीं त्यानें मातापितरांस 'तुम्ही कसे इतके अडाणी हो!' असें तिरस्कारानें व आश्चर्यानें म्हणावें काय? मातापितरांत सौजन्य फार मोठें असतें; आपण मुलावर केलेल्या उप-

कारांबद्दल ते त्यापाशीं शेखी मिरवीत नाहींत. नाहीं तर ज्यास वडील माणसांच्या अज्ञानाबद्दल आश्चर्य वाटतें, त्यास वडील माणसें असें उत्तर देणार नाहींत काय ? 'बाबारे, तूं ज्ञाता झालास याचें भूषण तुला नाहीं. जें द्रव्य व जे श्रम आम्हीं तुला ज्ञाता करण्यांत खर्च केले, तेच स्वतः ज्ञान संपादन करण्याकरितां आम्हीं खर्च केले असते, तर तूं महामूर्ख व आम्हीं मोठे ज्ञानी झालों असतों. परंतु तुझें हित स्वहितापेक्षां आम्हांस अधिक श्रेयस्कर वाटलें; आमच्या भांडवलावर तूं विद्याप्राप्ति केली आहेस. तुजवर आम्हीं जे उपकार केले आहेत त्यांची गणती नाहीं. तूं पशु असशील तरच उपकाराची फेड अपकारानें करशील. आम्हीं तुझे हातीं शस्त्र दिलें म्हणून तूं आमचेच गळे कापणार काय ? धिक्कार असो तुझ्या ज्ञानोन्मादास !' या प्रकारचें त्यांनीं भाषण केल्यास त्यास विद्वान् गृहस्थ काय उत्तर देईल ? परंतु मातापितर जेवढें सौजन्य व मौन धरतात, तेवढा विद्वानास अधिकच आवेश चढतो. तो त्यांच्या दुःखास कारण होतो. पदोपदीं त्यांच्या आज्ञा मोडतो. त्रयस्थांचे किंवा अल्पवयी मुलांचे समोर त्यांचा अपशब्दपूर्वक उपमर्द करितो. हें इष्ट नाहीं, अशानें कोणताही समाज सुधारत नाहीं. नीति व सदाचार यांची उन्नति न होतां हानि मात्र होत जाते.

याप्रमाणें मुलें खेळविण्याच्या प्रेमकृत्यापासूनही एका मोठ्या नीतितत्त्वाचा बोध विचारी मनुष्यास होण्यासारखा आहे. तें तत्त्व कृतज्ञतेचें होय. परंतु विचारास अवलोकनाचा पाया पाहिजे. कृतज्ञता हा गुण फार व्यापक आहे. याच्या समाधानाचें आद्यस्थान मातापितर होत. बंधुभगिनी, कुटुंबांतील, कुलांतील, ज्ञातींतील माणसें, सर्व

सत्पुरुष, देशाचे राज्यकर्ते व सर्व देश किंवा सर्व मनुष्यजात, हीं क्रमानें मातापितरांच्या नंतर कृतज्ञतेस पात्र होतात. कृतज्ञतेच्या दृष्टीनें सर्वांशीं योग्य वर्तन ठेविलें, तर सदाचाराचा बहुतेक भाग त्यांत येईल. याकरितां मुलांचें कोवळें मन आहे तेव्हांपासून तीं कर्तींसवर्तीं माणसें होईपर्यंत त्यांवर कोण कोण, किती व कसा उपकार करीत आहे, हें त्यांस शिकविलें पाहिजे. कृतज्ञतेनें वागण्याची त्यांस नित्य संवय लाविली पाहिजे. कृतज्ञता जागृत असेल, तर कुटुंबांत, समाजांत किंवा देशांत गैरशिस्त वर्तन होण्याचा थोडा संभव उरतो. या कृतज्ञतेच्या तत्त्वास सत्य, प्रेम आणि दया हीं जोडल्यास नीतींचीं सर्व तत्त्वें त्यांत आलीं. कृतज्ञता, सत्य, प्रेम आणि दया यांचें क्रमानें महत्त्व दाखवीत गेलें पाहिजे. त्या योगें ईश्वरापासून अगदीं रंकापर्यंत कोणाचाही आपले हातून अपमान होणार नाहीं, कोणासही पीडा होणार नाहीं, यथाशक्ति यथामति योग्य कर्तव्यांस आपण दक्ष राहूं. या रीतीनें आपण व आपल्या भोंवतालचें जग सुखी व समाधानी राखण्याचें श्रेय आपणांस येईल. याप्रमाणें मुलांच्या व मोठ्यांच्या शिक्षणांत या चार तत्त्वांची मातबरी दाखविण्याचा सर्वत्र प्रयत्न सुरू झाल्याखेरीज, मुलें सुशील व विनयी होणार नाहींत; त्यामुळें समाजांत व कुटुंबांत कलह, दुःख व असमाधान हीं उत्पन्न होत राहतील, खरी सुधारणा म्हणून होणार नाहीं. परंतु उन्मत्त विद्वानांस ही गोष्ट कोणीं समजावून द्यावी ? हल्लींच्या शिक्षणपद्धतींत हीच मोठी न्यूनता किंवा मोठा दोष आहे. त्यामुळें समाजाची तूर्त तरी हानि होत आहे."

---

**प्रश्न**

( १ ) लहान मुलांचा जुलूम वडील माणसें खुषीनें कां सहन करतात ? मुलांशीं प्रेमानें खेळण्यापासून आपणांस कोणता बोध प्राप्त होतो ?

( २ ) सुशिक्षित तरुणांनीं आपल्या वडील माणसांशीं कसें वागावें ?

( ३ ) कृतज्ञता म्हणजे काय ? सदाचरणाचीं बहुतेक अंगें कृतज्ञतेंत येतात असें म्हणतात तें कां ?

---

## ४

# एकांतवासाचें सुख–जोग्याची हकीकत

[ विख्यात इंग्रज ग्रंथकार डॉ. जॉनसन् याच्या ‘रासेलस’ नामक कादंबरींतून पुढील उतारा घेतला आहे. प. वा. कृष्ण शास्त्री चिपळूणकर यांनीं ह्या कादंबरीचें मराठी भाषांतर केलें. उत्कृष्ट भाषांतरकार म्हणून कृष्णशास्त्री यांचा लौकिक केवढा दांडगा आहे, हें निदान “अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी” ज्यांनीं वाचल्या असतील त्यांना तरी सांगणें नको. रासेलस ही केवळ नांवाचीच कादंबरी आहे. एका गोष्टीचें निमित्त करून डॉ. जॉनसन्नें यांत नाना प्रकारच्या सांसारिक विषयांवर चर्चा केली आहे. रासेलस हा आबिसिनीया देशांतील राजपुत्र. यास जगांतील दुःखांची कल्पनाच येऊं नये म्हणून ‘आनंदगुहा’ नामक एका निसर्गरमणीय स्थानांत त्याच्या बापानें कोंडून ठेवलें होतें. पण तेथें त्यास कंटाळा येऊन तो एके दिवशीं, इम्लाक या नांवाचा एक कवि मित्र व बहीण निकाया यांजबरोबर, गुप्तपणें गुहेंतून बाहेर पडला. नंतर तीं तिघेंजणें अनेक देश हिंडलीं, व ठिकठिकाणच्या लोकांशीं त्यांनीं संवाद केले. ‘सुख कोठें व कसें मिळेल,’ हा त्यांच्या शोधाचा विषय होता. अशाच एका प्रसंगाचें वर्णन खालील उताऱ्यांत आहे ]

वाटेनें शेतकऱ्यांस विचारीत विचारीत तिसऱ्या दिवशीं तीं जोग्याच्या मठाजवळ येऊन पोहोंचलीं. हा मठ डोंगराच्या एका

बाजूस खडक फोडून तयार केला होता, व त्याच्या वरच्या आंगास डोंगरावर नारळींची व ताडांची दाट झाडी होती. या ठिकाणापासून नील* नदीचा धबधबा इतक्या अंतरावर होता कीं, त्याचा तेथून एकसारखा मंद ध्वनि मात्र नेहमीं ऐकूं येत असे. या नादानें कटकट न होतां अंतःकरणाची वृत्ति एकाग्र होऊन मननाकडे लागे; व वारा सुटून ताडमाडांच्या झावळ्या वाजूं लागल्या म्हणजे तर वर सांगितलेला प्रकार विशेषच होई. डोंगरांत आंगचीच त्या ठिकाणीं एक कपारी होती, ती मनुष्यकृतीनें सुधारून तेथें पुष्कळ निरनिराळ्या जागा केल्या होत्या. त्या जोग्यानें निरनिराळ्या कामांकरितां योजल्या होत्या. रस्त्यानें चालतांना कोणा वाटसरास रात्र झाला व एकाएकीं पावसानें गांठलें, आणि ते तेथें आश्रयास आले, तर त्यांस उतरावयास जागा जोगी देत असे.

राजपुत्र वगैरे मंडळी संध्याकाळची तेथें पोहोंचली. त्या वेळीं तो जोगी मठाच्या दारापाशीं बाहेरच्या अंगास एक बांक टाकून त्यावर वारा खात बसला होता. त्याच्या बाजूस एक पुस्तक व कांहीं लेखण्या व कांहीं कागद होते; व दुसऱ्या बाजूस कुऱ्हाड, वाकस वगैरे अनेक प्रकारचीं विखनें (हत्यारें) पडलीं होतीं. ही मंडळी आली तें प्रथम जोग्यास कळलें नाहीं, त्यामुळें तो एकटा असल्याप्रमाणें बसला होता. त्याची मुखचर्या पाहून राजकन्या आपल्या सोबत्यांस म्हणाली:—“मला जर विचाराल तर याच्या मुखचर्येवरून यास स्वतः वास्तविक सुख प्राप्त झालें आहे, किंवा तें प्राप्त करून

---

* उत्तर आफ्रिकेंतील मुख्य नदी. या नदीमुळेंच ईजिप्त देश सुपीक बनला आहे.

घेण्याचा मार्ग दुसऱ्यास सांगण्याचें सामर्थ्य याच्या अंगीं आहे, असें दिसत नाहीं."

मग त्या सर्वांनीं त्यास मोठ्या अदबीनें सलाम केला असतां त्यानेंही त्यांस परतून सलाम केला. त्याच्या सलाम करण्याच्या रीतीवरून स्पष्ट दिसून आलें कीं, तो मनुष्य पूर्वीं दरबारांत पुष्कळ वागला असावा. तो म्हणालाः—"बाबांनो, तुम्ही रस्ता चुकल्यामुळें कदाचित् येथें आलां असाल. तसें झालें असल्यास कांहीं चिंता नाहीं. तुम्हांस येथें रात्रीच्यारात्र खाणेंपिणें व निजावयास आंथरूण यांची मठांत व्हावी त्याप्रमाणें सोय होईल. मनुष्यास अवश्य जें जें पाहिजेच तें सर्व येथें आहे, पण त्यापेक्षां अधिक म्हणजे मिजाशीच्या वस्तु मात्र येथें नाहींत; व तुम्हीही त्यांची जोग्याच्या झोंपडींत अपेक्षा करणार नाहींच."

त्यांनीं उत्तर केलें कीं, "आपणासारख्या साधूच्या हातून कांहीं जरी प्राप्त झालें तरी तो मोठा श्रेयस्कर प्रसादच आहे." नंतर तीं मठांत शिरलीं. आंत पाहतात तों जागा फारच स्वच्छ होती, व वस्तु जेथल्या तेथें ठेवलेल्या असल्यामुळें कोठें कांहीं पसारा नव्हता. तें पाहून सर्वांस मोठा संतोष झाला. त्यांस भूक लागली असेल असें समजून त्या जोग्यानें त्यांपुढें खावयास शिजवलेलें मांस व प्यावयास मद्य आणून ठेविलें; परंतु तो स्वतः फळेंमुळें खाऊन पाणी प्याला. दुसऱ्या कशास शिवला नाहीं. त्याच्या भाषणांत थट्टामस्करी नसूनही तें चित्तास संतोष करणारें होतें; व परमार्थपर असून त्यांत स्वमताभिमान अगदीं नव्हता. त्याचे ते गुण व ती वृत्ति पाहून सर्वांच्या मनांत त्याजविषयीं पूज्यबुद्धि तत्काळ उत्पन्न झाली, व राजकन्येस

असा पश्चात्ताप झाला कीं, विचार केल्याशिवाय आपण प्रथम दर्शनीं यास उगीच एकाएकीं नांव ठेवलें.

मग कांहीं वेळ साधारण भाषण झाल्यावर इम्लाक जोग्यास म्हणाला:—"महाराज, आपली वृत्ति व थोरपण पाहिल्यावर आतां आपली कीर्ति इतकी दूरवर पसरल्याचें नवल आम्हांस वाटत नाहीं. आम्ही केरो * शहरांत राहात असतों. तेथें आपल्या ज्ञानाची पराकाष्ठेची प्रशंसा ऐकून आपल्या दर्शनास आलों आहों. हा तरुण मुलगा व ही तरुण मुलगी यांचीं अद्याप लग्नें झालीं नाहींत. त्यांच्या मनांत असें आहे कीं, जगांत अत्यंत उत्तम जी स्थिति असेल ती शोधून काढून तिचा आश्रय करावा. व या गोष्टींत आपला बुद्धिवाद ऐकावा म्हणून हीं आपल्या पायापाशीं आलीं आहेत."

जोग्यानें उत्तर केलें कीं, "बाबांनो, चांगल्या रीतीनें जो वागेल त्यास सर्व अवस्था चांगल्याच आहेत. आतां सर्वोत्कृष्ट अवस्था निवडून काढण्याविषयीं जर म्हणाल, तर दुःख होण्याचीं उघड जीं कारणें आहेत तीं जितकीं टाळवतील तितकीं टाळावीं, या साधारण नियमापेक्षां मला दुसरा कांहीं विशेष उपाय सांगतां येत नाहीं."

राजपुत्र म्हणाला, "जो सर्वसंग सोडून एकांतीं सर्व काळ वास करतो तो खचित दुःखाच्या सर्व कारणांस टाळतो, ही गोष्ट महाराज, आपण आपल्या उदाहरणानें सर्व जनांस दाखवीत आहां."

जोगी म्हणाला, "बाबा, मी आज पंधरा वर्षें एकांतवासांत घालविलीं खरीं; परंतु माझें उदाहरण पाहून दुसऱ्या कोणीं असें करावें

---

* ईजिप्त देशाची राजधानी. हें शहर अत्यंत प्राचीन असून तेथील चतुष्कोणाकृति मनोरे ( पिरामिड्स् ) फार विख्यात आहेत.

असा माझा अगदीं अभिप्राय नाहीं. मी तारुण्य दशेंत शिपायाचा धंदा करीत होतों. पुढें पायरीपायरीनें वाढत वाढत मुख्य सेनापतीच्या पदवीस चढलों. मोठमोठ्या फौजा हाताखालीं घेऊन मी मोठमोठे विस्तीर्ण देश काबीज केले. तसेंच मोठमोठ्या लढायांत तरवार गाजविली, व वेढा घालून बिकट बिकट ठिकाणें सर केलीं. शेवटीं माझ्या वरची जागा रिकामी झाली, ती मला मिळण्याची असून माझ्या खालच्या एका अधिकाऱ्यास मिळाली. तेणेंकरून मला फार वाईट वाटलें, व ज्वानीचा भर निघून गेल्यामुळें अंगांतली कुवतही कमी वाटूं लागली. मग विचार केला कीं, संसारांत दुःखें, कलह व पापवासना या फारच आहेत; तर सर्व सोडून देऊन एकीकडे जाऊन शेवटचें वय निवांतपणांत घालवावें. पूर्वीं आमचा एक वेळ पराभव होऊन शत्रूंनीं पाठलाग केला असतां या कपारींत दडून बसून म्यां जीव बचावला होता. मग असा निश्चय केला कीं, याच ठिकाणीं राहून आयुष्याचे जितके दिवस राहिले असतील तितके काढावे. नंतर पाथरवट वगैरे कितीएक कारागीर आणून येथें खडक फोडून सोईच्या जागा केल्या, व निर्वाहास जे जिन्नस पाहिजेत ते सर्व येथें सांठवून येथें राहूं लागलों.

“ एखादा खलाशी दर्यांत वादळानें गांठावा आणि तो जीव बचावून बंदरास येऊन पोहोंचला म्हणजे त्यास कांहीं वेळ मोठा आनंद होतो; त्याप्रमाणें मी बहुत वर्षें लष्कराच्या धामधुमींत व कलकल्यांत घालवून एकाएकीं निवांत ठिकाणीं येऊन स्वस्थ राहिलों, त्यामुळें पहिल्यानें कितीएक दिवस मला फार समाधान वाटलें. या स्थितींत नवेपणामुळें जी गोडी वाटत होती ती कांहीं दिवसांनीं नाहींशी

झाल्यावर, या भोंवतालच्या रानांत ज्या अनेक प्रकारच्या वनस्पति आहेत व अनेक प्रकारचे धोंडे व खनिज पदार्थ आहेत, ते पाहून यांच्या अंगीं गुण कोणते आहेत वगैरे विचार करून पुष्कळ वर्षे मी करमणूक केली; परंतु अलीकडे त्याही शोधाचा कंटाळा येऊन त्यांतही मन लागेनासें झालें आहे. कोणी बोलावयास नाहीं व कांहीं करमणूक नाहीं, यामुळें उगीच एकटें बसलें म्हणजे अनेक प्रकारच्या शंका येऊन बुद्धीस व्यामोह * होतो, व अनेक प्रकारचे अप्रयोजक तरंग अंतःकरणांत उठतात. परोपकार व सत्कृत्यें करण्याचे प्रसंग गमावल्यावांचून मला दुष्कृत्यें टाळतां आलीं नाहींत असें जेव्हां जेव्हां मनांत येई, तेव्हां तेव्हां माझी मला मोठी लाज वाटे. व आतांशा मला असें वाटावयास लागलें आहे कीं, मीं एकांतवास जो स्वीकारला तो परमार्थीकरितां तादृश स्वीकारला असें नाहीं, तर जगाविषयीं द्वेषबुद्धि मनांत येऊन तिच्याच योगानें ही गोष्ट झाली. तर असल्या वैराग्यापासून काय फळ आहे ? कांहीं नाहीं. उद्योग नसल्यामुळें मूर्खपणाच्या व नाना तऱ्हेच्या गोष्टी नेहमीं मनांत गोंधळत असतात व कितीदा काढलें तरी त्यांजकडे पुनः पुनः मन जातें. मला पश्चात्ताप होतो कीं, एकीकडे एकटा येऊन राहिल्यानें नफ्यापेक्षां माझा तोटाच फार झाला. आतां कोणी असें म्हणेल कीं, एकटा राहिल्यानें दुष्ट लोकांच्या सहवासानें कदाचित् वाईट गुण लागते ते लागले नाहींत; पण त्यावर माझें असें उत्तर आहे कीं, चांगल्या सज्जन व ज्ञानी लोकांच्या भाषणापासून व उपदेशा-पासून जो लाभ व्हावयाचा तोही पण असें केल्यानें अंतरला. लोकां-

* भ्रम.

मध्यें राहण्यांत गुण अधिक कीं दोष अधिक, याचा मी फार दिवस विचार करीत होतों. शेवटीं गुण अधिक असा आज सकाळीं बुद्धीचा निर्णय झाल्यावरून उद्यां येथून निघून गांवांत किंवा नगरांत जाऊन राहण्याचा मीं निश्चय केला आहे. सर्वसंगपरित्याग करून जो एकांतीं जाऊन राहतो तो लोकांमध्यें राहण्यापासून होणाऱ्या सुखास मुकेल हें खचित आहे; परंतु तसें केल्यानें त्याची बुद्धि परमार्थाकडे विशेष लागेलच याचा भरंवसा नाहीं."

ह्या त्याचे भाषणावरून सर्वांस मोठा विस्मय वाटला. नंतर तीं त्यास म्हणालीं कीं, "महाराज, आपली इच्छा असल्यास आम्हां-बरोबर केरो शहरास चलावें." तें म्हणणें त्यानें मान्य केलें. मग त्यानें जवळपास पुष्कळ द्रव्य पुरून ठेविलें होतें तें काढून घेऊन तो त्यांच्या समागमें नगरास आला. जवळ आल्यावर नगर जेव्हां दिसावयास लागलें तेव्हां तें पाहून जोग्यास जो हर्ष झाला तो सांगतां पुरवेना.

---

## प्रश्न

( १ ) जोग्याच्या मठीचें थोडक्यांत वर्णन द्या !

( २ ) एकांतवासांत सुख नाहीं, असे जोग्यास कां वाटूं लागलें ?

( ३ ) जोग्यास घरदार सोडण्यापूर्वी खरें वैराग्य प्राप्त झालें होतें काय ?

( ४ ) एकांतवासाचे फायदे व तोटे यांवर लहानसा निबंध लिहा.

---

# ५

# वीरपत्नी गौतमाबाई होळकर



[ पुढील उतारा " भाऊसाहेबांची बखर " या पुस्तकांतून घेतला आहे. ही बखर कोणी लिहिली ह्याचा ठीक पत्ता लागत नाहीं. पण लिहिणारा शिंद्यांच्या पदरीं असून फार शोधक बुद्धीचा होता; व या बखरींतील भाषा तर जुन्या मराठी भाषेचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून समजली जाते. बखर अर्थात्‌च पानपतच्या घनघोर संग्रामाचा इतिहास आहे.

अहमदशहा अबदाली यास तोंड देण्याचें काम प्रथम शिंदे घराण्यावर पडलें. प्रथमची चकमक यमुनेच्या कांठीं झाली, तींत मराठ्यांचा पराजय होऊन मुसलमानी सैन्य अलीकडे आले. तेव्हां तेथून तळ हालवून मागें जावें असा दत्ताजी शिंदे यास त्याच्या लोकांनीं सल्ला दिला. पण रणशूर दत्ताजीनें माघार घेण्यापेक्षां मरण आलें तरी पत्करलें असें म्हणून फिरून दुराणीस तोंड देण्याची हिंमत बांधली. दुर्दैवानें या लढाईत दत्ताजी गोळी लागून पडला. तेव्हां नजीबखान रोहिल्याचा गुरु कुतुबशहा यानें त्यास मर्मभेदक प्रश्न विचारला- " पटेल, हमारे साथ तुम और भी लड़ोगे ? " घायाळ दत्ताजीनें तशाही स्थितींत साफ जबाब दिलाः " बचेंगे तो और भी लडेंगे. " हें बाणेदार उत्तर ऐकून कुतुबशहा चिडला, व त्यानें दत्ताजीस लाथ मारून सुऱ्यानें त्याचा गळा कापला ! जनकोजी शिंदे-ह्याचें वय तर अद्याप विशीच्या आंत होतें, पण पराक्रम अभिमन्यूसारखा होता-हेही दंडाला गोळी लागून जखमी झालेले. त्यावेळीं त्यांच्या सैन्याची केवळ दाणादाण झाली; त्यांत दत्ताजीची पत्नी भागीरथी बाई ही आसन्नप्रसव होती. अत्यंत कष्टानें ही मंडळी कोटपुतळी- पर्यंत जाऊन पोंचली. तेथें मल्हारराव होळकराची व त्यांची गांठ पडली व त्यांची आपत्ति अंशतः दूर झाली. त्या वेळचा प्रसंग ह्या उताऱ्यांत आहे ]

तों तेच दिवशीं मल्हारराव होळकर, यांची[1] निकडीचीं पत्रें गेलीं होतीं म्हणोन, मल्हारराव होळकर यांनीं जयनगरचा शह[2] टाकून मजल दरमजल मोठ्या मजली करून मिळावयास येत होते. तों इकडे यांची अवस्था ऐशी जाली. हें मल्हारराव यांस विदित नवतें. तेही मुकामास कोटपुतळी पासून दोन कोसांवर आले. बुणगियाचा[3] पुढें मुकाम जाला. मागून मल्हारराव सडी स्वारी अस्तमानास मजलीस शाहाजणें[4] वाजवीत आले. तों शिंदे यांचे लष्कराचे पळाचे राऊत[5] जाऊन तेथें पोंचले. मल्हारराव यांनीं जवळ बोलावून वर्तमान विचारिलें. स्वारांनीं वर्तमान सांगितलें कीं, " दत्ताजी शिंदे यांचा शिरच्छेद जाहला. जनकोजी शिंदे जखमी व बायका व लुटलेलें लष्कर असे येथून तीन कोसांवर कोटपुतळीस मुकाम करून राहिले आहेत. " हें वर्तमान मल्हारराव यांनीं ऐकतां क्षणींच अंबारीतच घालून घेतलें[6] व गंगाधर ताल्या शाहाजणें वाजवीत होते तें मना केलें. असे डेरियांत जाऊन शोक करिते जाले. ते समयीं त्यांची स्त्री गौतमाबाई होती, तिनें निषेध केला कीं, " सुभेदार, तुमचें वृद्धपण जाहलें. शिंदे यांचीं मुलें म्हणजे काय ? त्यांचे तोंडचें जार वाळलें नाही ! त्यांनीं एवढा पराक्रम करून मारतां मारतां मेले. एरवीं हा मृत्युलोकच आहे. जाला प्राणी वांचत नाहीं. परंतु इहलोकीं कीर्त करून परलोक साधन करणें, हेंच दुर्लभ. हें मूल जनकोजी शिंदे, याणें एवढा पराक्रम केला ! तुमचे दिवस समीप आले. तरी हिंमत धरून मारतां मारतां मरावें. हा प्रलाप स्त्रीजातीनें करावा. असें पुरुषास बोलिलें नाहीं. प्रस्तुत जवळ जखमी

---

१ यांची=शिंद्याकडचीं. २ वेढा, हल्ला. ३ बुणगे (बाजारबुणगे)=सैन्या बरोबरचे उदमी वगैरे गैरलढाऊ लोक. ४ वाद्यें. ५ घोडेस्वार. ६ अंग टाकलें.

व मुलें बाळें आले आहेत. तर ऐसेच जाऊन भेटून त्यांचें समाधान करावें. " म्हणोन बोलतांच वृद्धासं[1] विषाद येऊन गौतमाबाईस बोलिले कीं, " तुझे चित्तांत आम्हीं मरावें असें आहे. " यावर गौतमाबाईनीं उत्तर केलें कीं, " सुवासिणी असतां वैधव्याची आस्था धरील अशी कोण चांडाळीण असेल? अहेवेंपणें[2] हळद–कुंकु–मंडित मरावें, हीच इच्छा सर्व स्त्रियांची. परंतु जैसें पूर्व आचरण असेल तैसें घडेल. आपले पदरीं लौकिक भारी. तुम्हीं आपलें घोंगडी विणावयाचें स्वकर्म करीत असता तरि सहजच वाचावयाची आस्था धरावी. वांटा तरि शूराचा उचलिला आहे. वाण[3] सतीचें घेतलें [ ते ] जैसें सांभाळावें, तैसेंचि धर्मशास्त्र आहे." बाईचें वचन ऐकून, तैसेच रागास येऊन, घोडियावर स्वार जाहाले. हत्ती व फौज सिद्ध होऊन जनकोजी शिंदे यांजकडे चालिले. " जैशी दैवाची उजरी[4] तैशी बुद्धी उपजे शरीरीं." बरोबरीला तमाम फौजेची छबी[5] पळाली. तोंडें काळीं खापरासारखीं दिसों लागलीं. एकमेकांस बोलूं लागले कीं, " शिंदे यांची फौज एवढी लढती, तिची ही गत! आमची खानदेशी फौज, बहुतकरून तिची गत काय होईल न कळे!"

असो. या प्रकारें शिंद्यांच्या लष्करास मल्हारराव आले. तों भागीरथीबाई व काशीबाई यांस राहुटी देखील नाहीं. झाडास वस्त्रें गुंडाळून बैसलीं होतीं. तेथें गौतमाबाई आली ते समयीं उभयतां बायांचा व भानसिणी[6] यांचा कोल्हाळ जाला. तीन दिवस दम

---

१ मल्हाररावास. २ अहेव=अविधवा, सुवासिनी. ३ सतीचें वाण घेणें= एकदा अंगावर घेतलेलें काम पार पाडलेंच पाहिजे असें मानणें. ४ उजरी= उदय, तेज? ५ छबी=तेज, तोंडावरचें पाणी. ६ दासी, कुणबिणी.

खादला होता तितका उभडा आला. " भगवंतें आम्हांवर केवढा गहजब केला ! आम्हीं देवाचे घरीं काय चोरी केली होती ? एवढें निर्वाणें[1] आम्हांस [ कां ] दाखविलें ? आमचा वियोग केला ! आतां पाटील यांस कोठें पाहूं ? " म्हणोन धाय मोकलून ऊर माथा बडवून तोंडीं माती घालूं लागली. ते समयीं गौतमाबाई यांणीं बहूत शांतवन केलें. मायाजाळ, स्मशानवैराग्य दुसरियास सांगावें. परंतु ज्याचा उभडें[2] तोच जाणत असेल. हा अनुभव मनुष्यदेहीं सर्वत्रांस आहेच. तैसेच मल्हारराव [ यांची ] जनकोजी शिंदे यांस पाहून, जैशी माय प्रलाप करिते तैशी गत जाली. उफराटे जनकोजी शिंदे यांणीं मल्हारराव यांचें समाधान केलें.

" सुभेदार, हा मृत्युलोकच आहे. यांत केव्हांही जाणें खरें. वडील कीर्तिच करून गेले. आपणही किती दिवस जगणें आहे ? त्यांत अवकाशही नाहीं. ' सुपांतील हांसती आणि जात्यांतील रडती ' हाही दृष्टांत जाणावा. प्रस्तुत आमचे हातांत ग्रास जात्यांतील आहे. " म्हणोन शांत केलें. मल्हारराव यांनीं डेरा व बाडाच्यां[3] कनाथा व बिचोबा[4] व खाजगीचे डेरे पूर्ववत प्रमाणें आणून दिले. आपण तेथें राहिले. दोन्हीं सैन्यें एक जागां जालीं. त्या वेळेस लोकांस असें जालें कीं, कुडींतील प्राण व्याकूळ जाला असतां परततो तैसें घडलें. मल्हारराव आले म्हणोन ते दिवशीं सैन्य स्वस्थ राहिलें. तों मल्हारराव यांचे लष्करांत तीन वेळां दुराणी आले आले म्हणोन गडबड जाली.

दुसरे दिवशीं जाटांची[5] बातमी आली कीं, दुराणीची " फौज

---

१ अनर्थ. २ उमाळा, गहिंवर. ३ तंबू भोंवतालच्या कनाथी. ४ खांब नसलेला लहानसा डेरा. ५ भरतपूरचा राजा सुरजमल्ल जाट.

तुम्हांवर सडी होऊन येणार, तुम्ही स्वस्थ कसे राहिलां ?" म्हणोन पत्रें आलियावर मल्हारराव, जनकोजी शिंदे व गंगाधरपंत व रामाजी पंत दिवाण असे एकत्र होऊन जनकोजी शिंदे यांस विचार सांगते जाहाले कीं, "बाबा ! तुम्ही जखमी आहां. दुराणीची दौड भारी. सहजीं चालणें कच्चे चाळीस कोस. त्यांत तुमची निभावणी पडणार नाहीं. यास्तव बुणगे व बायका व तुम्ही आम्ही चमेली पार जाऊन सडे फौजेंत रामाजीपंत व आमचे गंगाधरपंत राहातील." याप्रमाणें मल्हारराव यांचें वचन ऐकून जनकोजी शिंदे यांणीं उत्तर केलें कीं, "सुभेदार, तुम्ही वडील आहां. मुलें माणसें व बुणगे घेऊन जावें. माझा नेमच आहे कीं, जेथें पाटील मृत्यू पावले त्या स्थळीं आपला देह टाकावा. असा माझा नेम [आहे]. आपल्यास राहाणें नाहीं." असें ऐकून मल्हारराव यांणीं बहूत प्रकारें वडीलपणें धि:कार करून सांगितलें. परंतु जनकोजी शिंदे यांचे बुद्धीस उतार पडेना. मग रागें मल्हारराव डेरियास येऊन गौतमाबाई यांसि वर्तमान सांगितलें कीं, "जनकोजी शिंदे आम्हांस सर्वत्रांस घेऊन बसतात. ऐकत नाहींत." तेव्हां गौतमाबाई थोर हिंमतीची बायको, तिनें मागती मल्हारराव यांस विचार करून सांगितलें कीं, "सुभेदार, तुमची 'साठी बुद्धी नाटी' तैसा विचार जाला आहे. अपकीर्ती मिळवून किती पन्नाशा जगणें आहे ? बहूत रोज गुजरले, थोडके राहिले आहेत. जनकोजी शिंदे मूल होत्साता त्याची एवढी हिंमत ! आणि तुम्हीं हा विचार काय म्हणोन ध्यानांत आणिला ?" असें ऐकून मल्हारराव यास विषाद येऊन दातानें ओठ चावून बोलता जाहाला कीं, "म्यां तुझें चित्त पाहिलें." असें म्हणोन तैसेच जनकोजी शिंदे यांचे डेरियास

येऊन खचीत जाबसाल केला कीं, "तुम्ही आम्ही सर्वत्र फौजेंत राहून बायका, मुलें बुणगे झाडून माळव्यांत लावून द्यावीं. तुम्ही आम्ही सडे राहून दुराणी भंवताले गनीमी काव्यानें राहून गिलचा हारीस आणावा." म्हणोन बोलून तेच समयीं बुणगियाचें कूच करविलें. शिंदे इमानाचे शाबूत, अशा आकांतांतही सावध; फौजेस आठवडा रोजमुरा दिला. बुणगियाचा बंदोबस्त करून वाटेस लाविलें. केरोलीचे राजाचा व मल्हारराव यांचा स्नेह, म्हणोन केरोलीचे घाटें बुणगे वाटेस लाविले. केरोलीवरून दत्ताजी शिंदे यांचे दहावे दिवशीं चमेलीस आले. होळकर यांचींही मुलें माणसें बरोबर होतीं. कोश-भराचे छाव्यानें गौतमाबाईचा तळ होता. तेथें क्रियाकर्म करून, कूच करून कुवारी नदीवर मुकाम केला. तेथें तेरा दिवस करून राहिले. तों रात्रौ भागीरथीबाई प्रसूत जाली. पुत्र जाहाला. ते समयीं तोफा व वरकड यंत्रें सुटलीं. दत्ताजी शिंदे यांचें दुःख एकी-कडे ठेऊन बहूतच आनंद जाहाला. खुशाली केली. सूर्योदय जाल्यावर मल्हारराव यांची स्त्री गौतमाबाई व तिची सून, खंडेराव होळकर याची स्त्री, अहिल्यांबाई[1] डेरियास उभयतां आल्या. त्यांणींही खुशाली करून गजांवर शर्करा वांटल्या. मोठे संकटीं पांच दिवस मुक्काम करून कूच केलें. ते माळवियांत येऊन पोचले. शिंदे यांचे बुणगे व बायका उज्जनीस राहिल्या. मल्हारराव यांचीं मुलें माणसें, भारघडी[2] इंदुरास राहिलीं.

---

१ हीच विख्यात अहल्याबाई होळकर. २ जड सामान.

### प्रश्न

( १ ) दत्ताजी शिंदे व गिलचे यांच्या युद्धाची हकीकत सांगा. या प्रसंगीं दत्ताजीनें कसें वर्तन केलें? कुतुबशहानें? याचें प्रायश्चित्त पुढें कुतुबशहास मिळालें काय?

( २ ) शिंद्यांच्या वाताहतीची खबर आली तेव्हां मल्हारराव होळकरानें काय केलें? त्या वेळीं गौतमाबाई काय बोलली?

( ३ ) पुढील धोरणाचे बाबतींत मल्हाररावाचा जनकोजी शिंदे यास काय सल्ला होता? जनकोजीनें काय उत्तर दिलें? या बाबतींत मल्हारराव व गौतमाबाई यांमध्यें काय संवाद झाला?

( ४ ) वरील प्रकरणांतून आजकाल प्रचारांत नसलेलीं पांच विभक्तिरूपें निवडून काढा.

---

## ६

# माझा स्विट्झर्लंड्मधील प्रवास

[ पुढील प्रवासवृत्त परलोकवासी प्रो० पां. दा. गुणे, पी. एच्. डी. यांच्या "माझा यूरोपांतील प्रवास" या पुस्तकांतून घेतलें आहे. प्रोफेसर साहेब संस्कृत वाङ्मयाचा उच्च दर्जाचा अभ्यास करण्यासाठीं जर्मनीस गेले होते. त्यावेळीं एका सुटींत त्यांनीं स्विट्झर्लंड्चा प्रवास केला. यूरोपांत असतांना त्यांनीं तेथील हकीकतीचीं फार मनोरंजक पत्रें आपल्या मित्रांस लिहिलीं. तींच पुढें एकत्र करून वरील पुस्तक छापण्यांत आलें. यापैकीं दोन तीन पत्रेंच पुढें उद्धृत केलीं आहेत. ह्यांत "यूरोपांतील हिमालय" असें ज्यास म्हणतां येईल, त्या आल्प्स् पर्वतापैकीं कांहीं अद्भुतरमणीय भागाचें वर्णन आलेलें आहे ]

म्युरेन्, ता. ३०–८–११

इंटरलाकेनहून काल एक पत्र रवाना केलेंच आहे. तेथून आज सकाळीं दहा वाजतां निघालों. एकंदरींत इंटरलाकेनचे पाच दिवस मोठे मजेंत गेले. रोज कोठें ना कोठें तरी पहायला जाणें, व कंटाळा येईल त्या दिवशीं गांवांतच अगर नदीच्या काठीं कूअरहौस * समोरच्या राईंत फिरणें, किंवा हॉटेलपुढें बागेंत बसून शेतकऱ्यांच्या गवताच्या गाड्या, गुरांचे कळप व त्यामागें चाललेले छोटे गुराखी वगैरे पाहणें, यांत करमणूक होत असे. इंटरलाकेन् हें खेडेवजाच असल्याचें मागें लिहिलेंच आहे. म्हणूनच मोटर, बग्या, सायकल्स, विजेचे दिवे वगैरे शहराच्या गोष्टी, व शेतकरी, गुरें, गुराखी या खेड्याच्या गोष्टी यांचा येथें मिलाफ झाला आहे.

इंटरलाकेनहून साडेअकराला लाउट्‌र्ब्रुनेन येथें आलों. हें एक अगदीं लहान खेडेंच आहे व एका सुंदर खोऱ्यांत अगर दरींत वसलेलें आहे. तिन्ही बाजूंनीं पर्वत व एक बाजू खुली, असें हें नैसर्गिक कोठारासारखेंच आहे. दोन बाजूंचे डोंगर तटासारखे सरळ गेले असून त्यांवरून लहानमोठे बरेच निर्झर खालीं पडतात; (यामुळें या गांवाला लाउट्‌र्ब्रुनेन अगर बहुनिर्झर हें नांव पडलें आहे.)

---

* कूअरहौस म्हणजे हवा खाण्याला आलेल्या पाहुण्यांच्या करमणुकीसाठीं जेथें रात्रीं गायनवादनाचे जलसे होतात, अशी नाटकगृहासारखी इमारत. स्विट्झर्लंडांत मी आजपर्यंत जेथें जेथें फिरलों, तेथें तेथें आपलें कूअरहौस ठेवलेलेंच. म्युरेन हें एक नाकपुडीएवढें खेडें आहे, पण येथें सुद्धां हवा खावयाला येणाऱ्या चैनी मंडळीसाठीं कूअरहौस आहे! मला यूरोपीय गायनाची अजून चव न समजल्यामुळें मी हीं कूअरहौसें बिलकुल टाळलीं!

पैकीं दोन तीन विशेष पाहण्यासारखे आहेत. एक स्टाउब्–बाख् ( धूलिनिर्झर ) म्हणून; हा कड्यावरून सुटल्यापासून खालीं येईपर्यंत उंचीमुळें व वाऱ्यानेंहि केवळ पांढऱ्या बारीक धुळीप्रमाणें दिसतो म्हणूनच त्याला तसें नांव पडलें आहे. दुसरा ट्रूमेल–बाख् अगर छिन्ननिर्झर म्हणून; पाण्याची अजब शक्ति, ( कीं, जिनें कठिण खडक फोडून त्यांत रंध्रें करून आपला रस्ता काढला आहे, ) व परमेश्वराची अगम्य कृति, यांचें हा निर्झर चालतें बोलतें निदर्शन होय. युंगफ्राउ,* अगर प्रमदेजवळचा एक ग्लेशर † (हिमनदी) पासून हा प्रचंड प्रवाह निघून पांच ठिकाणीं डोंगर फोडून बाहेर पडला आहे. अगदीं पहिल्या म्हणजे डोंगराच्या बऱ्याच वरच्या ठिकाणीं जाऊन पहावें, म्हणजे एका लहान, अंधाराच्या बोगद्यांतून फोंफावत निघून समोर खडकावर जोरानें आदळतांना हा दिसतो. तो तेथील धो धो आवाज, वितळलेल्या चांदीसारखा फेंसमय पाण्याचा अगडबंब लोट, त्यामुळें अत्यंत कठीण असतांहि झिजून मऊ झालेला कडा, व बऱ्याच उंचावर, आंतून कड्याच्या पोटीं पाहण्यासाठीं केलेल्या सज्जावर उभें असलेल्या प्रेक्षकालाहि सचैल अभिषेक

---

* हें आल्प्स्चें एक शिखर आहे. † ग्लेशर=हिमनदी. हिमालय, आल्प्स् यां सारख्या प्रचंड उंचीच्या पर्वतांच्या खोऱ्यांमधून बर्फाचा जो प्रवाह संथपणें वाहात असतो, त्यास हिमनदी म्हणतात. बर्फ अर्थात्च पाण्याप्रमाणें वाहतांना दिसत नाहीं. पण उतारावरून पसरलेला हा बर्फाचा विस्तार अगदीं न कळत कां होईना, खालीं सरकत असतो. येतां येतां तो बऱ्याच खालच्या उष्ण प्रदेशांत आला म्हणजे बर्फ वितळतें व साध्या नदीच्या रूपानें वाहूं लागतें. गंगा, ब्रह्मपुत्रा, सिंधु वगैरे पुष्कळ नद्यांचा उगम अशा हिमनद्यांतूनच झाला आहे.

घालणारा तुषारसमुदाय, हीं प्रत्येक आश्चर्य करण्यासारखीं आहेत ! असेंच जरा खालीं चार ठिकाणीं झालेलें आहे. यामुळें हा लोट चार पांच ठिकाणीं खडकाच्या भिंतीनें खंडल्यासारखा झाला आहे, म्हणून त्याला छिन्ननिर्झर म्हणतात.

हें पाहून झाल्यावर दमलों व जरा भूकहि लागली, म्हणून एका विसांव्याच्या ठिकाणीं दूध पिण्याला मागितलें. चहाचा एखादा पेला भरून दूध येईल असें मनांत म्हणतों, तों दासीनें चिनी मातीचें सरासरी पाऊण शेराचें भांडें भरून पुढें ठेविलें. किती मधुर व कसदार दूध तें ? पिऊन अंतरात्मा शांत झाला. ह्या पाऊण शेरावर दुधाला अवघे चाळीस सांतीम ( सरासरी ३–३॥ आणे ) पडले.

हें पाहण्याच्या गडबडींत एक इंग्लिश गृहस्थ तीनदां भेटला. प्रथम भेटतांच त्यानें वेळेला अनुसरून नमस्कार केला, व हंसला. मी हिंदी हें त्यानें तेव्हांच ओळखलें. नसतें तरच नवल ! इंग्रज लोक ताठेबाज असतात, अशी त्यांची सर्व यूरोपांत ख्याति; पण प्रवासांत कसचें काय आलें आहे ? त्याच्या माझ्या खूब गप्पा झाल्या. राज्यारोहणोत्सवाला आलेल्या हिंदी मांडलिकांचे भव्य पोषाक, घोड्यावर बसण्याची ऐट वगैरेची स्तुति तो करीत होता. हें सांगावयाचें एवढ्यासाठींच, कीं, प्रवासांत नेहमींचे चमत्कारिक रिवाज कोणीहि ठेवीत नाहींत. खरोखरी मला हे प्रवाश्यांचे रीतिरिवाज फार आवडतात. दुसरे प्रवासी भेटले असतां त्यांनां नमस्कार करणें, हंसणें, मार्ग विचारणें अगर सांगणें, एखादा दमलासें दिसल्यास त्याला उत्साह आणणें इत्यादि गोष्टी मला पटतात. तेथें ओळखी करून देण्याचा संभ्रम ‡ वगैरे कांहीं लागत नाहीं.

---

‡ शिष्टाचार.

नंतर, १८४० मेटर* (६१६६ फूट) उंचीच्या डोंगराच्या शिखरावर म्युरेन् म्हणून खेडें आहे तिकडे निघालों. सर्वजण त्याच्या सभोंवारच्या सृष्टिशोभेची, हवेची वगैरे फार स्तुति करीत असतात, म्हणून जिज्ञासेनें मीहि विजेची गाडी न घेतां पायींच चढूं लागलों. किंचित् अभ्रें आल्यामुळें उन्हाचा त्रास झाला नाहीं. एका बाजूनें डोंगर व त्यांवरील देवदारांची झाडी, आणि दुसऱ्या बाजूनें खालीं खोल दरी, असा हा मजेदार रस्ता होता. वाटेनें झुळझुळ वाहणारे लहान लहान ओढे कितीतरी ओलांडावे लागले. अशा तऱ्हेनें घाम पुशीत, वाटेनें भेटलेल्यांस नमस्कार करीत, पाठीशीं पडशी, कोट काढून तिच्यावर अडकवलेला, टोपी पुढें सदऱ्याला लोंबलेली, अशा थाटानें सरासरी सव्वा तास चाललों. तेव्हां आतां मजल बहुतेक गांठली असें वाटून, समोर दिसणाऱ्या काळ्या मेघाला 'भो मेघ गंभीरतरं नद त्वं' (हे मेघा, याहूनही मोठ्यानें तूं आतां गर्जना कर!) असें म्हणतों, तोंच जणुं काय चिडूनच, त्यानें धारांनीं मला झोडण्याला आरंभ केला. पंधरा वीस मिनिटें होता—पण डोंगरी पाऊस तो! त्यानें नखशिखांत भिजवून काढलें. जवळ झोंपडी वगैरे कांहीं आश्रय नाहीं. पावसांत झाडांचा आश्रय म्हणजे कृतघ्नाच्या मैत्री-सारखा! तेव्हां तसाच पुढें चेंपीत निघालों व आणखी पाऊण तासांत म्युरेन् गांठलें. त्या जोराच्या सरींत त्रिभुवन आठवलें! सारे कपडे चिंब भिजले. फक्त रात्रीचा पोषाक पडशींत कोरडा राहिला होता. तो घालून, बाकीचे कपडे वाळत टाकून स्वस्थ पडलों.

---

* १ मेटर=३९.३७ इंच. हें एक फ्रेंच माप आहे.



आल्प्स् पर्वतांतील एक ग्लेशर ( हिमनदी )

लाउटर् ब्रुनेन्, ३१ आगस्ट, १९११
(म्युरेन् सकाळीं)

आज सकाळींच उठून तेथून सरासरी आणखी १२०० मेटर उंच असलेल्या शिल्ट्हॉर्नवर जायचा बेत होता. त्याप्रमाणें लवकर तयारहि झालों. पण खिडकी उघडून पाहतों तों दाट धुकें चोहींकडे पसरलेलें ! साडे आठ वाजतां कोठें थोडी उन्हाची तिरीप पडल्या-सारखें होऊन पुनः धुकें दाटलें, तें अद्याप दहा वाजल्यानंतरहि वाढ-तच आहे. 'शिल्ट्हार्न्‌ला जायचें, शिल्ट्हार्न्‌वर जायचें' हें जें आज पांच दिवस वारें भरल्यासारखें झालें होतें, त्यावर आज या धुक्यानें विरजण घातलें ! फार दिवस बाळगलेल्या आशेचा असा अकस्मात् हिरमोड झाल्यानें जो निरुत्साह होतो तो कांहीं विचारूं नये ! काल संध्याकाळीं येतांना जी म्युरेन्‌ची गोड शोभा पाहिली, तिच्यावरच समाधान मानून, धुकें कमी होईल तेव्हां परत लाउटर्‌ब्रुनेनला जाणार आहें. तेथून पुढें ग्लेशर्स् व डोंगरांचीं शिखरें यांत विजेच्या गाडीनें जायचें आहे. तेथेंहि असेंच धुकें पडून सृष्टिवैभवाच्या देखाव्याचें आजच्यासारखें वाटोळें न होवो ही इच्छा आहे ! पहावें काय होतें तें.

ग्रीएन्झ, ३ सप्टेंबर, १९११

लाउटर्‌ब्रुनेन्‌हून गुरुवारीं रात्रीं मुद्दाम स्टेशनवर जाऊन टाकलेलें पत्र वेळेवर मिळालें असावें असें वाटतें. त्यानंतर ठरल्याप्रमाणें शुक्र-वारीं सकाळीं बर्फाच्या आगरांत–ज्याला 'आइसमेअर'—'हिमसमुद्र' म्हणतात, तिकडे जाण्याला निघालों. रस्ता फारच चढाचा होता. अशा चढासाठीं इकडे 'झानराउबान'चा उपयोग करतात. या गाडीच्या पुढच्या डब्याला मध्यें एक लहानसें दांते असलेलें चाक

असतें, व त्याचप्रमाणें नेहेमींच्या रुळांच्यामध्यें त्या लहानशा चाकाला जुळतील असे दांते असलेला तिसरा रूळ असतो. या योजनेमुळें केवढाहि चढ असला तरी गाडी खालीं घसरण्याची भीति नसते. ही गाडी ट्रॅमसारखी विजेनें चालते. हींत बसून दरी खालीं टाकली व डोंगरावर हळूहळू जाऊं लागलों. कांहीं ठिकाणांहून लाऊटर्‌ब्रुनेन्‌ची सबंध दरी, इतकेंच नव्हे, तर लांब पलीकडे तळ्यांच्या मधलें इंटरलाकेनहि दिसे, व दुसऱ्या बाजूनें आल्प्स्‌चीं गगनचुंबित शिखरें दिसत, व या विरोधाचा परिणाम मनावर फार होई. याप्रमाणें तीन स्टेशनें टाकून आयगर—ग्लेशर नांवाच्या २३२३ मेटर उंचीच्या स्टेशनावर आलों. येथून आयगर शिखराखालचा ग्लेशर तीन मिनिटांच्या अंतरावर आहे, म्हणून याला असें नांव आहे. येथें आयगर, मोंश, युंगफ्राउ हीं आल्प्स् पर्वताचीं तीन्ही प्रसिद्ध शिखरें समोरासमोर अगदीं थोडक्या अंतरावर येतात. व सूर्यकिरण त्यांवर पडले म्हणजे त्यांवरील बर्फाच्या अति शुभ्रपणानें डोळे दिपून जातात. ग्लेशरचा बराचसा भाग माणसांना त्याजवर चालतां यावें म्हणून दगड-माती टाकून खराब केला आहे, त्यामुळें त्याच्या शुभ्र-निळेपणाला गालबोट लागल्यासारखें झालें आहे. येथून पुढें आइस्‌मेअर बरेंच म्हणजे ७०० अधिक मेटरवर उंच असून आयगरच्या अगदीं पाठीच्या बाजूला आहे. अशा उंच शिखरांवर विलक्षण चढाच्या बोगद्यांतून गाडी नेण्यांत माणसानें जें आपलें कल्पनाचातुर्य दाखविलें आहे, तें अचंबा वाटण्याजोगें आहे. ह्या बोगद्यांतून पलीकडे जाण्यास अर्ध्या तासाच्या वर वेळ लागतो. मध्यें एक लहानसें स्टेशन केलें असल्यामुळें अगदीं सदट नाहींसा

वाटतो. शेवटच्या आइस्मेअर स्टेशनावर उतरून एक मिनिट उजेडाच्या बाजूनें गेलें, कीं, आइस्मेअर किंचित् खालीं दिसतें. ३१६१ मेटर उंचीवरून पाहिलेला हा बर्फाचा देखावा अपूर्व होय ! आयगर, फिशरहॉर्न् वगैरे शिखरें सभोंवती असून मध्यें सरोवरासारख्या जागेंत बर्फ सांठलेलें आहे. हें किती खोल असेल याची कल्पना करवत नाहीं. यावर माणसें फारशीं जात नसल्यानें याची नैसर्गिक शोभा अगदीं जशीच्या तशीच कायम राहिली आहे. गाडींतून उतरलेले आम्ही सर्व उतारू लोखंडी कठड्याशीं उभे राहून आश्चर्य व्यक्त करीत असतां एक दोन डोंगरी बर्फांतले वाटाडे 'बर्फावर जाऊन त्यांतील भेगा कशा असतात हें तुम्हांस पहायचें आहे काय ?' म्हणून विचारूं लागले. कोणी धजेना. इतक्यांत मला काय आहे तें पाहण्याची हुडहुडी भरून मी तयार झालों. एका लांकडी फळ्यांच्या कामचलाऊ जिन्यानें चांचपडत खालीं उतरल्यावर वाटाड्यानें माझ्या कमरेला चऱ्हाट बांधून आपल्या हातांत बळकट धरलें, व आम्हीं घटकेंत खालीं, घटकेंत पुनः वर, कांहीं सपाटीवर, असे बर्फांतून जाऊं लागलों. कांहीं ठिकाणीं बर्फ दगडासारखें कठीण व निसरडें होतें, तर कांहीं जागीं वाळूप्रमाणें बारीक ढिगारें असून ते पायाखालीं वाजत. पाय ठेवतांना निसरूं नये म्हणून टांच बळकट रोंवून, हातांतील आरीची काठी बर्फांत टोंचावी लागे. अशा रीतीनें पंधरा वीस मिनिटें चालल्यावर बर्फाच्या त्या समुद्रांत पडलेल्या एका मोठ्या भेगेच्या कांठाशीं आम्हीं आलों. रुंदी तीन चार हातांच्यावर नव्हती; पण लांबी खूब, फीशरहॉर्नपासून त्याच्या समोरच्या शिखरापर्यंत होती. खोल इतकी, कीं, डोकावून



आल्पसचें एक शिखर–मॅटरहॉनें

पाहिलें असतां डोळे फिरत. तिच्या आंतल्या दोन्ही बाजू निळसर असून अर्ध्या अंतरापर्यंत चमकत होत्या; त्याच्या पुढें हळुहळू प्रकाश नाहींसा होऊन तळ दिसत नव्हता. हिच्या पलीकडे जाण्यासाठीं दोन विती रुंदीची एक लांकडाची फळी आडवी टाकली आहे. तीवरून जाण्यापूर्वी पाय आपटून त्यांना चिकटलेला बर्फाचा चिखल झाडून टाकावा लागतो; नाहीं तर अरुंद फळीवरून पाय निसरून मोक्षच! चाळीस एक मिनिटें चालल्यावर माझी चिकाटी पाहून 'लगतच्या ग्लेशरवरून श्रेकहॉर्न्‌च्या बाजूनें तुम्हांला पलीकडे ग्रिंडेल-वाल्डच्या खोऱ्यांत सुरक्षित उतरवतों,' असें तो वाटाड्या म्हणाला. पण माझे बूट पातळ, व पायमोजेहि लोंकरीचे पण पातळच असल्या-मुळें मी तें नाकारलें. शिवाय परत ग्रिंडेलवाल्ड खोऱ्याकडचें टिकिट काढून पैसे खर्चून बसलों होतों, व वाटाड्याला कमींत कमी २५ फ्रांक द्यावे लागले असते. असो. याप्रमाणें बर्फाच्या समुद्रावर एक लहानशी सफर करून वर आलों. आपण आज कांहीं तरी विशेष अपूर्व केलें, पाहिलें, असें वाटे; छाती मात्र बराच वेळ उडत (धड-धडत) असल्याचें गाडींत बसल्यावर मागून माझ्या लक्ष्यांत आलें. याप्रमाणें आल्प्स् पर्वतांत येऊन लांबून व जवळून त्याचीं शिखरें पाहण्याची, प्रत्यक्ष त्यांत व त्यांवरील बर्फांत जाण्याची बरेच दिव-सांची हौस तृप्त झाल्यासारखें वाटून समाधान झालें. खुद्द बर्फावरून भेग ओलांडून चालत असतांना, मध्येंच उन्हानें शिखरावरचें बर्फ उलून एकादी भली थोरली बर्फाची शीळ खालीं घसरत असतां होणारा गडगडाट ऐकतांना, मनाला काय वाटत असावें त्याची मला अद्याप कल्पनाहि करतां येत नाहीं!

नंतर त्याच दिवशीं दुपारीं चार वाजतां ग्रिंडेलवाल्ड खोऱ्यांत त्याच नांवाच्या गांवीं आलों. येथेंही दोन ग्लेशर्स कांहीं उंचीवर आहेत; पण सहज वाटेल त्याला जातां येण्यासारखे असल्यामुळें अगदीं काळे खराब होऊन गेले आहेत. नेहमीं आटोक्यांत असलेल्या वस्तूचा अशा तऱ्हेनें उपमर्द करण्याचा माणसांचा स्वभावच आहे! एक ग्लेशर दोन उंच कड्यांच्या अरुंद व लांबचलांब खिंडीच्या मुळाशीं पाचर मारल्यासारखा वरपासून पायथ्यापर्यंत उभा असून, त्यांतून एक नदी जोरानें खिंडींतून गोंगाट करीत खालीं दरींत गेली आहे. या खिंडीला 'लुचीन श्लुख्ट् (Lutschine Schlucht)' म्हणतात. एकंदरींत हें ग्रिंडेलवाल्ड खोरें लाउटर् ब्रुनेन् इतकें रमणीय नाहीं. निदान मला तरी तें आवडलें नाहीं. पण त्याच्या पाठीशीं उभ्या असलेल्या फाउलहॉर्न् नांवाच्या शिखरावरून सभोंवारच्या आल्प्स्चा देखावा फार नामी दिसतो, असें मी वारंवार ऐकलें होतें व * बेडेकरहि तेंच म्हणतों. तेव्हां उद्यां तिकडे जावें असें वाटे; पण रस्ता पांच तासांचा बिकट, उंची फ्रेजेअरपेक्षां बरीच अधिक (फ्रेजेअर १८७७; फाउलहॉर्न २६८४;) व तशांत आइसमेअरमध्यें चढतां उतरतांना गुडघ्याची शीर लचकलेली, अशा स्थितींत न जाणें एकरक्षीं बरें वाटे. अशा 'हो नां' तच रात्रीं झोपीं गेलों.

तारीख दोन शनिवारीं सकाळीं उशिरां उठलों, व दहा वाजतां पाहतों तों पायांनीं आपली फाउलहॉर्न्ची वाट धरली, इतका उत्साह

---

* या नांवाच्या दीर्घोद्योगी गृहस्थानें प्रत्येक देशांतून प्रवास करतांना अत्यंत जरूरीचीं माहितीपूर्ण पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांचीं त्यानेंच केलेलीं भाषान्तरें यूरोप–अमेरिकेंतील सर्व लोक वापरतात.

होता ! अर्थात् मग तसाच पुढें सरसावलों. वाटेंत गुराखी, डोंगरी खेड्यांतं खेंचरावरून सामान नेणारे हेलकरी, इतर प्रवासी वगैरे भेटतील त्यांशीं बोलण्यांत वगैरे अर्धा मजल एक तास चाळीस मिनिटांतच गांठली. तेथें एक विश्रांतिगृह होतें; त्यांत दूध, पाणी पिऊन बरोबर घेतलेलीं फळें खातांच हुषारी आली. दोन इंग्लिश गृहस्थ माझ्या आधींच तेथें बसलेले होते; त्यांनां माझ्या मजल काढण्याचें आश्चर्य वाटलें.

---

प्रश्न

(१) लाउटर् ब्रुनेन् येथें पाहण्यासारखें काय आहे ?

(२) ग्लेशर ( हिमनदी ) म्हणजे काय ? आयगर ग्लेशरचें वर्णन द्या.

(३) आइसमेअर (हिमसमुद्र) म्हणजे काय? लेखकानें पाहिलेल्या हिमसमुद्राचें वर्णन करा.

(४) हिमालय व आल्प्स् पर्वतांची तुलना करा; व प्रवासाच्या सोई कोठें अधिक आहेत तें सांगा.

---

## ७

# उत्तररामचरिताचें संविधानक

[ पुढील उतारा परलोकवासी विष्णुशास्त्री चिपळुणकर यांच्या 'कविपंचक' नामक ग्रंथांतून घेतला आहे. ह्या पुस्तकांत, कालिदास, भवभूति, बाणभट्ट, दण्डी व सुबंधु या संस्कृत कवींवर त्यांनीं पांच निबंध लिहिले आहेत. हे लेख मूळ शाळापत्रक नांवाच्या मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झाले होते. प्रस्तुत लेख भवभूतीवरील निबंधापैकीं एक भाग आहे ]

'उत्तररामचरित' हें भवभूतीचें तिसरें नाटक होय. याची मागील दोहोंपेक्षांही * विशेष ख्याति असून कोणी कोणी तर यास सर्व

---

* महावीरचरित व मालतीमाधव.

संस्कृत नाटकांत उत्तम लेखितात. हें नाटक मागील 'महावीर-चरिता' स उत्तरभागरूप आहे. मागच्यांत रामायणकथा रामाच्या अभिषेकापर्यंत असून यांत तीं बहुधा शेवटपर्यंत नेली आहे; तरी 'महावीरचरिता' प्रमाणेंच यांतही मूळच्या कथेपेक्षां पुष्कळ ठिकाणीं फेरफार केले आहेत. ते पुढील संविधानकावरून सहज लक्षांत येतील.

राम राज्यावर बसून कांहीं काळ लोटल्यावर ऋष्यशृंगानें द्वादश-वार्षिक सत्र आरंभिलें. ऋष्यशृंग हा रामाची बहीण शांता हिचा नवरा. यानें बोलावल्यावरून रामाच्या तिघी आया, वसिष्ठ व अरुंधती, अशीं राजकुलांतील वडील माणसें तिकडे गेलीं. जनकराजा राम व सीता यांस भेटण्याकरितां अयोध्येस येऊन कित्येक दिवस राहिला होता. तोही नुकताच परत मिथिलेस गेला. त्यामुळें जानकीस खेद झालेला पाहून, तिच्या करमणुकीस्तव रामानें आपल्या सर्व वृत्तांताचा चित्रपट तयार करविण्यास लक्ष्मणास सांगितलें होतें. तो घेऊन लक्ष्मण आला, व तीं चित्रें अनुक्रमेंकरून तो दाखवीत असतां रामास त्या त्या वृत्तांताच्या स्मरणानें पुर्वानुभूत हर्ष, विरह, शोक इत्यादि मनोवृत्तींचा पुनः एक वार पहिल्याप्रमाणें अनुभव घडला.† याप्रमाणें पाहतां पाहतां दंडकारण्यांतील गोष्टीपर्यंत जेव्हां आलें, तेव्हां रामास जानकीवियोगाचें स्मरण असह्य होऊन त्यानें लक्ष्मणास थांब म्हणून सांगितलें. सीतेस ती चित्रित वनशोभा पाहून गर्भारपणामुळें असा डोहाळा झाला कीं,

---

† वाङ्मय-प्रवेशिका भाग १ ला, पान १९३ वरील 'स्मृतिचित्र' ही कविता पहा.

भागीरथीच्या पवित्र तीरीं जाऊन तेथील वनांत राहावें. मग तिची ती इच्छा पूर्ण करण्यास रामानें लक्ष्मणास रथ तयार करण्यास सांगितलें. लक्ष्मण तिकडे गेल्यावर सीता चित्रदर्शनानें परिश्रांत होऊन रामाचा हात उशाशीं घेऊन निजली. इतक्यांत दुर्मुख नांवाचा रामाचा चोर-बातमीदार आला. त्यास रामानें लोक आपणाविषयीं काय बोलतात असें विचारल्यावरून सीतेविषयींचा भयंकर लोकापवाद त्यानें त्याच्या कानांत सांगितला. तो ऐकतांच राम मूर्च्छित झाला, पण पुनः सावध होऊन निरुपायास्तव त्यानें सीतेस अरण्यांत सोडविण्याविषयीं निश्चय केला. मग त्या क्रूर संकल्पाप्रमाणें करण्यास त्यानें दुर्मुखाकडून गुप्त-पणें लक्ष्मणास सांगवलें.

यानंतर यापुढील पुष्कळ वृत्तांत,—म्हणजे कुश व लव हे जुळे मुलगे गंगेनें स्वतः आणून वाल्मीकीच्या स्वाधीन केले; ब्रह्मदेवानें वर दिल्यावरून तो आद्यकवि रामायण रचावयास लागला; वसिष्ठ अरुंधती व रामाच्या आया इतकींजणें सत्रसमाप्तीनंतर वाल्मीकीच्या आश्रमांत येऊन राहिलीं; रामानें अश्वमेधास आरंभ करून घोडा सोडला, व त्याबरोबर सेनेसहवर्तमान लक्ष्मणाचा मुलगा चंद्रकेतु याची योजना केली—हा सर्व, वासंती नांवाची जनस्थानांत * राहणारी वनदेवता व वाल्मीकीच्या आश्रमांत राहणारी तापसी आत्रेयी यांच्या परस्पर संवादांत सुचविला आहे. आत्रेयीनें शेवटीं हेंही सांगितलें कीं, शंबूकनामक शूद्र † या पंचवटींत स्वधर्मविरुद्ध तपश्चरण करून

---

* दण्डकारण्यांतील पंचवटी वगैरे स्थानें ज्यांत आहेत तो प्रदेश.

† ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या द्विजातीयांनींच वेदाध्ययन, तपश्चर्या वगैरे

लोकांच्या अकालमरणादि अनर्थांस कारण होत आहे असें आकाशवाणीनें सांगितल्यावरून, राम त्यास दंड करण्याकरितां इकडे लवकरच येणार आहे. त्याप्रमाणें राम येऊन त्यानें शंबूकाचा वध करतांच तो दिव्य देह धारण करून प्रगट झाला. पुढें शंबूकाच्या भाषणावरून तें दंडकारण्य होय असें रामास समजून तो पूर्ववृत्तांत आठवून तेथील शोभा पाहूं लागला. नंतर अगस्त्याच्या आश्रमाकडून बोलावणें आल्यावरून त्या ऋषीच्या दर्शनास तिकडे गेला.

तिकडून परत अयोध्येकडे जातांना रामानें आपलें पुष्पक विमान पुनः त्या दंडकारण्यांत थांबविलें, कीं पूर्वीचीं स्थळें पाहून सीताविरहाचें दुःख अंमळ हलकें करावें. परंतु तसें न होतां जनस्थानाच्या दर्शनानें त्याचें वियोगदुःख अधिकच जागृत मात्र होऊन त्यास मूर्च्छा आली. हा होणारा अनर्थ गंगेनें आधींच जाणून त्याच्या निवारणाचा उपायही योजून ठेविला होता. तो हा कीं, आपल्या प्रभावानें सीतेस अदृश्य राहण्याची शक्ति देऊन तमसेस तिजजवळ ठेविली होती. यास्तव राम मूर्च्छित पडतांच सीता अदृश्य रूपानें त्याजवळ गेली. आणि तिच्या हाताचा परिचित स्पर्श होतांच राम सावध झाला. पण डोळे उघडून पाहतो तों जवळ कोणी नाहीं. तेव्हां फार खेद होऊन त्यास वाटलें कीं, सीतेच्या निदिध्यासामुळें मला ही उगीच भ्रांति झाली. इतक्यांत वनदेवता वासंती घाबऱ्यां

---

करावी; शूद्रांनीं तीं करणें हें पाप होय, व त्याचमुळें एका ब्राह्मणाचा मुलगा अकालीं मरण पावला, अशी त्या वेळची समजूत होती. यामुळें रामचंद्रासारख्या न्यायनिष्ठ राजासही केवळ तपाचरण करण्याबद्दल शंबूकाचा वध करण्याची आवश्यकता भासली !

घाबऱ्यां रामाकडे आली; आणि सांगूं लागली कीं, सीतेनें पूर्वी ज्यास आपल्या हातानें वाढविलें त्या तरुण लहान हत्तीवर एक मोठा दुसरा हत्ती घाला घालीत आहे. तेव्हां त्यास सोडविण्याकरितां राम त्वरेनें तिकडे गेला. पण पाहतो तों तोच जय पावून आपल्या स्त्रीसह-वर्तमान खुशाल जलविहार करीत आहे. याप्रमाणेंच इतर पशुपक्षीही पूर्वींच्या परिचयाचे त्यानें पाहिले, व वासंतीनें पूर्वींच्या अनेक प्रसंगांचें रामास स्मरण दिल्यामुळें त्या त्या औत्सुक्यादि वृत्ति त्याच्या मनांत उठल्या. बोलतां बोलतां सीतेविषयींही गोष्ट काढून तिचा परित्याग केल्याबद्दल वासंतीनें केवळ हृदयभेदक अशा शब्दांनीं रामाचा * उपा-लंभ केला. रामासही सीतेचा समागम चिरकाल अंतरल्यावरून व घोर अरण्यांत तिची गति काय झाली ती मुळींच न कळल्यावरून अत्यंत गहिंवर आला, व दुःखावेग सहन न होऊन मूर्च्छाही आली. तेव्हां पुनः पहिल्याप्रमाणें सीतेनें त्याच्या ललाटास आपल्या हातानें स्पर्श करून त्यास सावध केलें, पण त्याच्या किंवा वासंतीच्या दृष्टीस पडली नाहीं. शेवटीं अश्वमेधाचा काळ अंतरेल यास्तव वासंतीस पुसून राम विमानांत बसून अयोध्येकडे निघाला.

या पुढील स्थल वाल्मीकीचा आश्रम कल्पिला आहे. तेथें वसिष्ठ वगैरे मंडळी होतीच, आणि जनकही वाल्मीकीस भेटावयास आला आहे. सीतेच्या भयंकर गतीस्तव त्याचा शोक चालला असतां आश्रमांतील बटूंपैकीं एक त्याच्याकडे आला. त्यानें माझें नांव लव व वडील भावाचें नांव कुश असें सांगितलें. आईबापांचीं नांवें विचारतां, तीं मला माहीत नाहींत, आम्ही दोघे वाल्मीकि ऋषीचे

---

* निंदा.

इतकेंच काय तें आम्हांस ठाऊक आहे असें तो बोलला. तरी जनकास व कौसल्येस त्या मुलाच्या तोंडवळ्यावरून व चालचलणुकीवरून सीतेच्या व रामाच्या खुणा पटल्या. इतक्यांत त्या मुलाचे खेळगडी धांवत धांवत त्याकडे आले, आणि ‘ अश्व ’ या नांवाचा एक चमत्कारिक पशु आपल्या आश्रमांत आला आहे, तो तुला दाखवतों चल, असें म्हणून त्यास तिकडे घेऊन गेले. पुढें त्यानें तो अश्व धरून ठेवल्यावरून त्याचे रक्षक त्याच्यावर चालून आले. पण रामाचीं दिव्यास्त्रें त्यास जन्मतःच प्राप्त झालीं असल्यामुळें त्यानें एकट्यानें सर्व सैन्याचा पराभव केला. तें वर्तमान ऐकून कुमार चंद्रकेतु त्याशीं भिडावयास आला. नंतर दोघांचीं वीरभाषणें होऊन युद्धप्रसंग झाला. हें सर्व राम शंबूकवध करून दंडकारण्याहून परत येण्याच्या आंत झालें. मग राम येतांच त्यानें दोघांस युद्ध थांबविण्याविषयीं आज्ञा देऊन आपणाकडे बोलाविलें. चंद्रकेतूनें लवाची फार प्रशंसा केली, व रामायणकथेचा मुख्य पुरुष हा असें समजतांच लवानेंही रामास वंदन केलें. पुढें कुशही तेथें येऊन रामास अनेक कारणांवरून आपल्या दोघां पुत्रांची ओळख पटली. शेवटीं वाल्मीकि ऋषीच्या आज्ञेवरून लक्ष्मणानें गंगातीरीं मोठा समाज बसण्यासारखी रंगभूमि तयार केली, व तेथें त्या कवीनें रचलेल्या लहानशा नाटकाचा अप्सरांनीं प्रयोग केला. हा प्रयोग सर्वांसमक्ष करण्याचा त्या मुनीचा उद्देश असा कीं, सीतेस वनांत सोडल्यावर पुढें काय वृत्तांत झाला तो सर्वांस विदित व्हावा. त्याप्रमाणें, सीतेनें आपला देह गंगेंत टाकला, तीस दोन पुत्र झाले, नंतर गंगेनें व पृथ्वीनें तिचें रक्षण करून दोघां पुत्रांस क्षात्रसंस्कार * करण्यास्तव वाल्मीकीच्या स्वाधीन केलें, इत्यादि सर्व वृत्तांत

* क्षत्रियांना उचित असें शिक्षण.

त्या दृश्य काव्यांत * लोकांस प्रत्यक्ष झाल्यासारखा झाला. शेवटीं या उपनाटकांतील सीतेनें पृथ्वीच्या पोटांत ठाव मागितला, व आंत गडप झाली. नंतर सर्व पडद्यांत गेल्या, परंतु लागलीच सर्वांसमक्ष खरोखरीची सीता, गंगा व पृथ्वी अशा तिघी गंगेतून निघाल्या, व याप्रमाणें सीतेची शुद्धि सर्वांदेखत सिद्ध झाल्यावर रामानें सीतेचा पुनः अंगीकार केला. शेवटीं वाल्मीकीनें सर्वांस आशीर्वचन केलें आहे.

वरील संविधानकांत मुख्यतः दोन गोष्टी बदलून घातल्या आहेत. एक ही की, मूळच्या कथेंत लव व कुश यांनीं रामलक्ष्मणादिकांचा पराभव करून टाकला असें वर्णन असतां, येथें लव व लक्ष्मणाचा पुत्र चंद्रकेतु यांचाच मात्र युद्धप्रसंग आणिला आहे. तशीच दुसरी गोष्ट ही कीं, राम, लक्ष्मण व सीता यांचा शेवट फार दुःखाचा झाला असतां येथें तो गोड झालासा दाखविला आहे. पहिला फेरफार करण्याचें कारण उघडच आहे कीं, नाटकाच्या नायकादि मुख्य पात्रांवर लाघवदोष † येत होता तो न यावा; व दुसरा तर अगदीं आवश्यकच होय. कां कीं, दुःखपरिणामी नाटकांचा—ज्यांस इंग्रजींत 'ट्रॅजेडी' म्हणतात त्यांचा—प्रघात संस्कृतांत मुळींच नाहीं, व अशा प्रकारचा नाटकाचा शेवट असूं नये अशा विषयीं साहित्यशास्त्राचा ‡ स्पष्ट नियमही आहे. संविधानकाच्या इतर भागांची रचनाही अशीच चातुर्यानें केली आहे. तीवरून मुख्य पात्रांच्या अंगचे उदात्त गुण कवीस स्पष्ट रीतीनें दाखवितां आले आहेत. सीतेवर रामाचा इतका

* नाटकांत. † कमीपणा. ‡ साहित्यशास्त्र—ज्या शास्त्रांत मुख्यत्वेंकरून काव्याचें (श्राव्य व दृश्य दोहोंचें) आणि काव्यसंबंधीं शब्द, अर्थ, रस, गुण व दोष यांचें विवेचन केलेलें असतें तें शास्त्र.

जीवप्राण असतां व चित्रपटावरून झालेल्या पूर्ववृत्तांतदर्शनानें तर त्याचें हृदय अत्यंत द्रवून प्रेमभरांत आलें असतांही, दुर्मुखाच्या तोंडून जनापवाद कानीं पडतांच तें त्यानें तत्क्षणीं दगडाप्रमाणें कठिण केलें. व वसिष्ठाच्या निरोपास[1] आणि आपल्या नुक्त्याच केलेल्या कठोर प्रतिज्ञेस[2] अक्षरशः अनुसरून सीतेनें निद्रिस्त असतां घातलेली मिठी मोठ्या क्रूरपणानें तत्काळ तोडली, व अत्यंत सद्गदित होऊन तिचा शेवटचा निरोप घेतला ! याचप्रमाणें दुसऱ्या व तिसऱ्या अंकांतील प्रसंगही हृदयभेदक आहेत. त्यांवरून महाशय पुरुषांचें अंतःकरण समयविशेषीं, किंबहुना एकेच वेळीं, 'वज्राहून कठोर व कुसुमाहून मृदु' कसें असतें तें कवीनें दाखविलें आहे. शंबूकवधाचा प्रसंग कवीस अवश्य घालावा लागला; कारण अशा कांहीं कामाशिवाय राजकार्य सोडून दंडकारण्यांत येण्यास रामास सवड कोठची? तरी त्याच्या सदयत्वास विरुद्ध असें तें कर्म असल्यामुळें, व शिवाय रंगभूमीवर प्रयोग करण्यास अप्रशस्त, यास्तव त्याच्या वधाचा प्रसंग फार संक्षेपानें उडवून त्यास दिव्य पुरुषाच्या रूपानें लागलीच आणला आहे.

तिसऱ्या अंकांत तर करुणरस जसा काय अवतरलाच आहे. दंडकारण्यांतील वनशोभा पाहून रामाचें मन द्रवलें, व तें स्थान पुष्कळ वर्षांनीं पुनः पाहिल्यामुळें जो जो पदार्थ त्याच्या दृष्टीस

---

१,२ यज्ञांत गुंतलेल्या वसिष्ठ ऋषीनें नुकताच रामचंद्रास असा निरोप पाठविला होता कीं, तूं कांहीं झालें तरी प्रजारक्षण व प्रजारंजन (त्यांना खूष ठेवणें) हें राजाचें कर्तव्य आहे हें विसरूं नको; व यास अनुलक्षून त्याच वेळीं रामानें "माझें प्रेम, दया, सौख्य, फार तर काय प्रत्यक्ष सीतेच्या सहवासावर पाणी सोडण्याचा प्रसंग आला तरी लोकानुरंजनाकरितां मी हें आनंदानें करीन," अशी कठोर प्रतिज्ञाही केली होती.

पडे तो तो पूर्ववृत्तांतस्मारक होऊन सीताविरहाचें दु:ख जागृत करी. तशांत सीतेची सखी वनदेवता बासंती हिचीही गांठ पडली आहे. पण याहूनही एक चमत्कारिक गोष्ट या अंकाच्या संविधानकांत कवीनें मोठ्या चातुर्यानें योजिली आहे. ती तर यांतील करुणरसास विशेष अनुकूल झाली आहे. ती सीतेची अदृश्यता होय. जिची घोर अरण्यांत काय गति झाली हें कांहींच न समजल्यामुळें रामाच्या हृदयांत दु:खाचे उमाळे येताहेत, तीच स्वतः पुढें उभी असतांही त्यास कळूं नये; व तिचाच परिचित हस्तस्पर्श झाला असतांही रामाच्या भाषणावरून त्यास उन्माद झाला अशी वासंतीस शंका यावी, व रामानेंही ती व्यर्थ भ्रांतिच मानावी; या गोष्टी अत्यंत हृदयद्रावक होत, व यांच्या योगानें सीतेचा परित्याग केल्याबद्दलचा जो रामाचा कठोरपणा त्याचा अगदीं विसर पडतो.

चवथ्या अंकास वाल्मीकीचा आश्रम हें स्थळ अनेक कारणांनीं फार समर्पक झालें आहे. राम व सीता हीं दोघें लहानपणापासून फार गुणांचीं असतांही त्यांस सुख म्हणून कधीं लागलेंच नाहीं व शेवटीं तर फारच भयंकर परिणाम झाला, हें पाहून कौसल्येस व जनकास पराकाष्ठेचें दु:ख होऊन त्यांची चित्तवृत्ति उदास व विरक्त झाली असतां, त्यांचे हृदयोद्गार वाचकांच्या किंवा प्रेक्षकांच्या हृदयावर स्थलौचित्यानें विशेष ठसविण्यास ऋषीच्या आश्रमाशिवाय दुसरें योग्य स्थान कोणतें सांपडणार ? तसेंच संसारांतील नानाविध दु:खांचे प्रसंग काढून भागलेला असा वृद्धवर्ग सशोक व सचिंत होत्साता एकीकडे बसला असतां आश्रमाच्या दुसऱ्या बाजूस तेथील बटु अनध्यायास्तव* निश्चिंतपणें

* सुटी मिळाल्यामुळें.

व स्वच्छंदपणें खेळत असून त्यांत अगदीं दंग होऊन गेले होते, या दोन्ही गोष्टीही एकापुढें एक घातल्यानें परस्पर फारच शोभतात; कां तर संसारांतील या दोन अवस्था परस्परांहून अत्यंत भिन्न असल्या-मुळें अशा ठिकाणीं त्यांचा भेद फारच ठळक रीतीनें दिसून विशेष खुलतो. पुढें लव येऊन सीतेविषयीं निराश झालेल्या जनकास व कौसल्येस त्याकडे पाहून सीतेचा हा पुत्र असेल अशी शंका उत्पन्न झाली वगैरे वृत्तांत; लवाचे खेळगडी येऊन त्यांनीं केलेलें घोड्याचें मौजेचें वर्णन[1]; आणि राजपुरुषांनीं दटाविलें असतां इतर बटूंमध्यें व त्या तेजस्वी क्षत्रियकुमारांत तत्क्षणीं दिसलेलें अंतर, या सर्व गोष्टीही मोठ्या खुबीनें आणल्यामुळें त्या ह्या अंकास शोभाप्रद झाल्या आहेत. असो. या पुढील शेवटल्या तीन अंकांचेंही याप्रमाणें विशेष वर्णन करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. वरील संविधानकावरूनच त्यांविषयीं आमच्या चतुर वाचकांस बरीच कल्पना बांधतां येईल असें आम्हांस वाटतें.

'उत्तररामचरितां' त मुख्य रस म्हटला म्हणजे करुण होय. तो सर्व नाटकभर पसरला असून त्याची कमाल तिसऱ्या अंकांत झाली आहे. पांचव्यांत व साहव्याच्या आरंभीं वीर असून, दोघेही योद्धे कुमार असल्यामुळें त्यांचीं भाषणें विशेष मजेचीं वाटतात.

---

१ घोड्याचें मौजेचें वर्णन—"हें पाहिलेंस का ? लवा! येथें एक विचित्र प्राणी आला आहे! त्याला एक लांब शेंपूट आहे, तें तो सारखें हालवीत असतो; त्याची मान लांबलचक असून त्याला चार खूरही आहेत; गवत खातो, व वारंवार मोठेमोठे लिदीचे गोळे टाकतो. चल लवकर, नाहीं तर तो जाईल निघून." हें वर्णन अर्थात्च वाल्मीकीच्या आश्रमांतील बटूंनीं केलें आहे.

शेवटल्या म्हणजे सातव्या अंकांत आरंभीं करुण व शेवटीं अद्भुतरस आहे. याप्रमाणें प्रस्तुत नाटकांत कवीनें करुणरसावर मुख्य धोरण ठेवून इतर केवळ प्रसंगोपात्त किंवा तदंगभूत असे आणले आहेत. हें सर्व या नाटकाच्या आंतील रचनेविषयीं झालें. पण केवळ बाह्यत: पाहतांही यांतील निरनिराळीं स्थळें कवीनें किती चमत्कारिक योजलीं आहेत तीं सहज वाचणारांच्या सुद्धां लक्षांत आल्या-वांचून राहणार नाहींत. कोठें ऋषींचा आश्रम, कोठें वनदेवतांचीं रम्य व भव्य अरण्यें, कोठें विद्याधरलोकींचा दिव्य प्रदेश, कोठें सुरासुरादि सर्व भूतसृष्टीनें अधिष्ठित असा आश्चर्यभूत रंग, * कोठें समरभूमि, अशा चित्रविचित्र स्थलांची कल्पना केल्यानें त्या त्या अंकांतील रस वाचकांच्या, व विशेषत: प्रेक्षकांच्या, मनावर विशेष आल्हादकारक होण्यासारखा झाला आहे. प्रकृत नाटकांत सृष्टि-वर्णनाचाही प्रसंग कवीनें आणला आहे; तो दुसऱ्या व तिसऱ्या अंकांत होय. या दोहों ठिकाणीं केलेलें दंडकारण्याचें वर्णन फार सुंदर आहे. तसेंच कांहीं दुसऱ्या जागींही प्रसंगवशात् जेथें जेथें वर्णन करणें आलें आहे तेथें तेथेंही तें तसेंच उत्कृष्ट व समर्पक केलें आहे. यांतील पात्रें बहुतेक रामायणावरून प्रसिद्धच आहेत; व येथेंही त्यांचे उदात्त गुण तसें संविधानक योजून कवीनें अधिक व्यक्त केले आहेत. याप्रमाणें अनेक गुणांनीं ‘उत्तररामचरित’ फार रमणीय झालें आहे. व यावरूनच तें एकदम रसिकप्रिय होऊन आजपर्यंत त्याचीच बाकीच्या दोहोंपेक्षां पूर्वींच्या पंडितांत विशेष प्रसिद्धि आहे; व ही त्याची ख्याति कालगतीबरोबर सतत वृद्धिंगत होऊन

* नाटकाची रंगभूमि.

भवभूतीचें नांव दिगंतरींही जाऊन तें चिरकाल राहील यांत तिळमात्रही संदेह नाहीं !

---

### प्रश्न

( १ ) मूळ रामायणांतील गोष्टींत नाटककारानें कोणते ठळक फरक केले आहेत ? व ते कां केले आहेत ?

( २ ) रामचंद्राच्या स्वभावांतील कोणत्या गुणांचा उल्लेख प्रस्तुत नाटकांत ठळकपणें आला आहे, हें उदाहरणें देऊन सांगा.

( ३ ) करुणरसाचें पोषण करण्यासाठीं कवीनें कोणकोणते प्रसंग नाटकांत घातले आहेत ?

---

## ८

# आजकालचीं पोरें

[ पुढील उतारा मध्यप्रांतांतील प्रसिद्ध लेखक व कवि श्री. ना. के. बेहेरे यांच्या " बोथट–बाण " या नांवाच्या विनोदी लेखसंग्रहांतून घेतला आहे. सामाजिक व्यंगांचें किंवा रूढ कल्पनांतील दोषांचें दिग्दर्शन करण्यास विनोदरूपी शस्त्राचा फार चांगला उपयोग होतो. पण हे विनोदरूपी बाण तीक्ष्ण व विषारी असूं नयेत. ज्यांना आपले दोष दाखवावयाचे असतील त्यांनासुद्धां ते झोंबूं नयेत, उलट थोड्या गुदगुल्याच व्हाव्या अशा रीतीनें

हे बाण सोडतां आले तर विशेषच उत्तम. प्रस्तुत लेखमाला अशाच उद्देशानें लिहिलेली असल्यामुळें प्रो. बेहेरे यांनीं त्या लेखांना " बोथट बाण " अशी संज्ञा दिली आहे ]

## दृश्य पहिलें

**काळः**—सन १८५५

[ अंगणांत तक्तपोशीवर जुनें धोतर व मागें लाल खादीचा तक्क्या असून त्याला टेंकून उघडेबंब बसलेले हरेश्वरभट चंचींतून तमाखू खाऊन जवळच्या पिकदाणींत थुंकत आहेत ]

**हरेश्वरभट**—राम्या, शिंच्या म्हणतोस तरी काय ? तूं विंग्रजी शिकणार ? अरे मूर्खा ! तुझ्या बापजाद्यांनीं 'न[1] वदेत् यावनीं भाषाम् प्राणैः कंठगतैरपि' असें म्हटलें आहे, तें उगीच ? अरे, आपल्याला ती भ्रष्ट भाषा शिकून करायचें आहे काय ? चांगले वेद पढावेत, संहिता म्हणावी, ब्रह्मकर्म शिकावें ! चार मंत्र म्हटले कीं, पोटाला कांहीं कमी का आहे ? विंग्रजी शिकून बाटणार वाटतें ? अरे, आपली जात, आपला धर्म–तुला कशाचीच का पर्वा नाहीं ? तूं शिकलास तर तुला मी अन् मला तूं अंतरलों, असें समज.

**घरांतून**—शिकला यस्फ्यस् तर काय झालं ? त्या विनायकभटजींचा गोप्या नाहीं का शिकत त्या पाद्र्याजवळ ?

**हरेश्वरभट**—( चवताळून )अग ! या कलियुगांत तूं सुद्धां मला अक्कल शिकवायला लागलीस अं ? म्हणे गोप्या शिकतो आहे ! खा गाढवा, तो पाद्री मांसमच्छी खातो, म्हणून तूंहि खा, समजलास ?

---

१ प्राण गेला तरी यवनांची भाषा बोलूं नये !

अन् ऐकलंस का ग ? त्या पाद्रीसाहेबांची बायको नेसते तसला लहंगा तूं कां नेसत नाहींस ?

**रामचंद्र**—( हळूच ) मला चांगली नोकरी मिळेल.

**हरेश्वरभट**—नोकरी ?–अरे, पण तुला नोकरीशीं काय करायचें आहे ? आपणां ब्राह्मणांना चार घरें फिरलें कीं बस्स ! सेवाधर्म हा बोलूनचालून शूद्रांचा, समजलास ? नोकरी मिळाली म्हणजे तुझे हात कांहीं स्वर्गाला पोहोंचणार नाहींत ! मीं नोकरी केली नाहीं, तर माझें कांहीं अडलें का ? संसार झाला, मुलेंबाळें झालीं, चार पैसे गांठीं पडले, तुझें लग्न करून दिलें–नोकरी नाहीं केली म्हणून माझें काय कमी झालें बाबा ?

**रामचंद्र**—( रडूं लागतो. )

**हरेश्वरभट**—राम्या, बाप मेला म्हणून रडायला अजून वेळ आहे ! ( सुस्कारा टाकून ) ठीक आहे. शिका तुमच्या मनांत आहे तर ! तुमचा पोंगा वाजूं द्या एकदांचा ! तुम्ही आजकालचीं पोरें ! तुम्हांला आमचें काय आवडणार आहे ?

---

## दृश्य दुसरें

**काळः—सन १८७५**

[ घरच्या ओटीवर सत्रंजी, लोड टाकून अंगांत फ्रेनेलची बंडी असलेले रामचंद्रपंत बसले आहेत. समोर विड्यांचें तबक व तमाखूची डबी असून एका पेटीवर सरकारी कामाचे कागद पडले आहेत. समोर केशव उभा आहे ]

**रामचंद्रपंत**—हें तुझें करणें आपलें तुलाच शोभतें ! आज किती दिवस झाले मी पहातों आहें,–मी म्हणत होतों, तुझें

वर्तन आज सुधारेल, उद्यां सुधारेल; पण कांहीं नाहीं—येरे माझ्या मागल्या ! अरे, आम्ही नाहीं का इंग्रजी शिकलों ? शिकवतांना का शेंडीला गांठ द्यायची नाहीं, असें शिकवितात, कीं पागोटें न घालतां त्या टोप्या घाला, असें शिकवितात ? आहे तरी काय ? मीं आज सहा महिने झाले, पहातों आहे. तुझें वर्तन दिवसेंदिवस आपलें अधिकाधिक बिघडत चाललें आहे ! परवां तो कोट करून आणायला तुला कुणीं रे अक्कल शिकविली ? अन् हे अंगांत गुंड्यांचे सदरे तुला बरे का वाटतात ? बाराबंद्या अन् अंगरखे अंगाला बोंचतात, पागोट्याचें ओझें होतें, हेंच ना ? आम्ही जणुं काय मुळीं माणसेंच नाहीं ! मग हें थोरलें धोतर तरी कशाला नेसलास ? साहेबलोकांसारखी पाटलोणबूट घालून हिंडावें कीं नाहीं ? वा ! चांगले दिवे लावतां !

**घरांतून**—हें काय बाई ! पोरांना कीं नाहीं सर्व कांहीं शोभतं हो ! मोठा झाला कीं घालील पागोटं. चार दिवस लहान आहे, तोंपर्यंत दुसऱ्याच्या मुलांचं पाहून तसं करावंसं वाटतं. एवढं कांहीं नको त्याबद्दल त्याला बोलायला ?

**रामचंद्रपंत**—( संतापून )—तूं—तूं या पोराला लाडानें बिघडवलास ! अन् काय रे ? त्या गोसावड्याच्या—कोण तो रे—व्याख्यानाला गेला होतास, नाहीं का ? मला सर्व कांहीं कळतें. समजलास ना ? तुम्ही माझ्यापासून कितीही लपवा, मला कळल्यावांचून कधींही रहायचें नाहीं ! काल संध्याकाळीं मी मुद्दामच पहात होतों, सोंवळें नेसतोस का नाहीं तें ! पण तस्सा आपला ओवळ्यानें बसलास जेवायला ! अरे, धर्मबिर्म कांहींच नाहीं का रे तुला ? त्या स्वामीच्या

व्याख्यानांत हेंच होतें वाटतें ? तरी तो भोंदूच वाटला मला !

**केशव**—बाबा, त्यांचें व्याख्यान अगदीं कळकळीनें चाललें होतें.

**रामचंद्रपंत**—हो तर ! त्या गोसावड्याच्या व्याख्यानांत तुला कळकळ दिसायची, अन् आमचें बोलणें म्हणजे वरवर–ठीकच आहे ! आमच्या आंतड्यांचा पीळ कसा दिसणार तुला ? कसला समाज अन् कसलें काय ! आपला धर्म वाईट का आहे, म्हणून असले चोंचले काढायचे ? छे छे, भ्रष्टतेची अगदीं कमाल झाली ! केशव, तूं इतका बिघडशील, असें नव्हतें वाटलें मला ! आम्ही नव्हतों का—

**केशव**—( डोळे चोळतो. )

**रामचंद्रपंत**—रडतां कशाला ? तुमच्या मनाजोगतें होऊन जाऊंद्या ! तुम्ही आजकालचीं पोरें ! तुम्हाला आमचें काय आवडणार आहे ?

---

## दृश्य तिसरें

**काळः**—सन १८९५

[ माडीवरील एका खोलींत सत्रंजी–तक्क्याची बैठक असून, एका बाजूला एक टेबल खुर्ची ठेवली आहे. टेबलावर सरकारी कागद पहात केशवराव बसले आहेत. त्यांच्या अंगांत गुंड्यांचा सद्रा असून हातांत पेटविलेली विडी आहे. डोक्यावर संजाबदार घेरा असून तेल लावून तुळतुळीत केलेली शेंडी मागें सोडली आहे. अप्पा जवळच उभा आहे ]

**केशवराव**—अप्पा, तुझ्या बोलण्याचें मला मोठें नवल वाटतें. म्हणे इतक्यांत माझें लग्न केलें तर अभ्यासांत व्यत्यय येईल ! अरे,

जगांत काय तूं एकटाच अभ्यास करणारा आहेस ? लग्नानें अभ्यासांत व्यत्यय यायला काय झालें ? (दाराकडे पाहून) ऐकलंस का ? (लक्ष्मीबाई येतात) आपले चिरंजीव साफ म्हणतात कीं, 'मला लग्नच करायचें नाहीं ! माझ्या अभ्यासांत व्यत्यय येईल !' हा आतां लहान का आहे ? चांगला वीस वर्षांचा झाला ! तूंच सांग आपल्या चिरंजीवाला चार उपदेशाच्या गोष्टी. माझें लग्न झालें, तेव्हां तूं केवढी होतीस ?

**लक्ष्मीबाई**—इश्श, हें काय बाई भलतंच ? असेन नऊ दहा वर्सांची !

**केशवराव**—अन् माझें तरी वय त्या वेळीं किती होतें ! मी तर सारा सोळा वर्षांचा होतों. काय रे अप्पा ! मग माझ्या अभ्यासांत व्यत्यय नाहीं आला तो ? खरेंच, मीं तुला एवढी मोकळीक ठेवली, हीच मुळीं माझी चूक झाली. शर्ट मागितले, शर्ट करून दे; सायकल मागितली, सायकल घेऊन दे; कोट शिवतों म्हणाला, तर शीव बाबा—मीं तुला कोणत्या बाबतींत आजपर्यंत कमी केलें आहे ? मला न विचारतां देखील तूं किती गोष्टी केल्या आहेस ! पण मीं तिकडे लक्ष्यच दिलें नाहीं. कॉलर्स घे, नेक्टाय घे, असें एक का दोन ? पण मी म्हणत होतों कीं, आहे लहान तोंवर करील—त्याला समजूं लागलें कीं, त्याचा तोच सुधारेल ! पण दिवसेंदिवस अधिकच शेफारत चाललास ! परवां कॉलेजच्या डिबेटिंग क्लबांत 'पुनर्विवाह करणें उत्तम', असें तूं म्हणालास, म्हणून बापू मेहेंदळे सांगत होता मला. साहेबांच्या बायका पुनर्विवाह करतात म्हणून तो चांगला, होय ? साहेबांचें जर इतकें अनुकरण करायचें आहे तर तुम्हाला आम्हीं ठेवलेलें 'अप्पा' नांव बिलकूल नसेल खपत ? मग हेन्री, जॉन असें एखादें नांव ठेऊन घे

आपणाला. ( लक्ष्मीबाईंना उद्देशून ) ऐकलेत ना आपल्या चिरंजीवांचे प्रताप ? यांना म्हणे विधवेशीं लग्न करायचें आहे. आजकाल तें नवीन मत निघालें आहे ना ?

**लक्ष्मीबाई**—भलतंच एकादं ! अप्पा, तूं लग्नाला कबूल हो कसा ! काय तरी चमत्कार मेला ! विधवा परत सवाष्ण होईल तरी कशी ? कांहींच्या बाहींच बाई बोलणं इकडचं ! तूं कांहीं अभ्यासाची काळजी करूं नकोस अप्पा ! आम्ही आपली तुझ्यासाठीं लहानशी मुलगी पाहूं हो !

**अप्पा**—मी स्वतः आपल्या पायांवर उभा राहिल्यावर मगच लग्न करीन म्हणतों.

**केशवराव**—हें रे काय बोलणें तुझें ? तुला आपल्या खर्चाची कांहीं तरी काळजी आहे का ? तुझा कॉलेजचा खर्च कोण तुझा तूंच चालवतोस होय ?

**लक्ष्मीबाई**—अप्पा, देवानं आपणाला कांहीं कमी केलं नाहीं. तूं आपला लग्नाला कबूल हो कसा ? मला किती बरं कष्ट पडतात ! माझ्यावर तुझं प्रेम आहे ना ? मग माझ्यासाठीं तरी लग्नाला नाहीं का कबूल होत तूं ?

**केशवराव**—त्याला कसली आली आहे माया अन् ममता ? त्याचीं Principles ( मतें ) आहेत ना ?

**अप्पा**—( हळूच ) आई ! तुझ्याकरितां म्हणून मी लग्न करतों; पण मुलगी मात्र माझ्या पसंतीची पाहिजे. शिकलेली अन् दिसण्यांत चांगली अशी हवी !

**केशवराव**—वा ! आम्ही पाहूं तें तुझ्या वाईटाचेंच पाहूं !

आम्ही म्हणजे तुझे वैरी! स्वतःच्या पसंतीनें तूं लग्न करणार? मी कांहीं आपली बायको पहायला गेलों नव्हतों, मग माझा संसार कुठें नाहीं रे वाईट झाला? अरे, आईबापांना तुमची काळजी कांहींच का नसते? ते करतील, तें तुझ्या वाईटाचें का करतील?

**अप्पा**—(पुटपुटत) मला सर्व जन्म त्या मुलीबरोबर घालवायचा आहे—

**केशवराव**—आणि आम्ही तुझी एखाद्या कैदासणीशीं गांठ घालून देणार आहों, होय ना? आमच्या वडिलांनीं आमचें लग्न ठरवलें, तेव्हां आम्ही एक शब्ददेखील बोललों नाहीं कीं, कसली विचारपूसहि केली नाहीं! मुकाट्यानें उठलों, अन् बोहल्यावर जाऊन बसलों!

**लक्ष्मीबाई**—पण मी म्हणतें, त्याचं एवढं म्हणणं तरी काय आहे? दाखवायची त्याला मुलगी एकदां! आपल्याला तरी एवढा हा हट्ट हवा कशाला? पहा रे अप्पा, आपली बायको स्वतःच पाहून ये तूं. तेंच बरं. तुला दाखवल्याशिवाय कांहीं आम्हीं पक्कं करीत नाहीं. झालं ना आतां तुझ्या मनासारखं? बाकी आम्ही करूं तें तुझ्या बऱ्याचंच करूं हो!

**केशवराव**—होऊंद्या—तुमच्या म्हणण्याप्रमाणें होऊंद्या. तुम्ही आजकालचीं पोरें! तुम्हांला आमचें काय आवडणार आहे?

---

## दृश्य चवथें

**काळः**—सन १९१५

[ माडीवर एका शृंगारलेल्या दिवाणखान्यांत अप्पासाहेब आरामखुर्चीवर चिरूट ओढीत पडले असून जवळच त्यांच्या पत्नी इंदिराबाई एक पुस्तक वाचीत बसल्या आहेत. अप्पासाहेबांच्या अंगांत एक शर्ट असून डोकीवर केंस

राखले आहेत; मात्र मागें शेंडीची बट आहे. पोमॅटम लावून भांग काढलेले केंस, अंगांत रेशमी शर्ट, त्यावर सुंदरसा टाय, पायांत क्यान्व्हासचे स्लिपर व डोळ्यांवर सोनेरी फ्रेमचा चष्मा, या थाटानें त्यांचे चिरंजीव वसंतराव हातांत टाइम्स घेऊन बसले आहेत ]

**अप्पासाहेब**—वसंत, तूं हा इंग्लंडला जायचा नाद सोडून दे ! इथें राहून विद्या होत नाहीं, असें कांहीं नाहीं. एम्. ए., एल्एल्. बी., सॉलिसिटर वगैरे वाटेल ती परीक्षा देऊन तुला इथल्याइथें मोठें होणें शक्य आहे. जस्टिस् रानडे, तेलंग इंग्लंडला थोडेच गेले होते ! तुझा हा उगीच कांहीं तरी हट्ट आहे, झालें.

**वसंत**—पण अप्पा ! मी आतां कुठें इंटर पास झालों आहें. मला वकील व्हायचें म्हटलें, तरी कमींतकमी चार वर्षें पाहिजेत; अन् आजकाल नुसत्या वकिलाला विचारतो कोण ? शिवाय युनिव्हर्सिटीची परीक्षा हटकून पहिल्या वर्षीं पास होईल, हीहि कांहीं शाश्वती नाहीं. यापेक्षां मी आज जर इंग्लंडला गेलों, तर तीन वर्षांत बॅरिस्टर–ॲट–लॉ होऊन येतों. बॅरिस्टराला जी मानमान्यता असते, ती मिळण्याची वकिलाला स्वप्नांतदेखील आशा नाहीं ! तेव्हां तुम्ही आपली मला परवानगी द्याच !

**अप्पासाहेब**—वसंत, तुला परक्या देशांत पाठवायचें म्हणजे कोण अडचणी आहेत, याची तुला तिळमात्र तरी कल्पना आहे का ? अरे, धर्माची अगदींच हेटाळणी करून उपयोगीं नाहीं. तूं तिकडे जाणार म्हणजे खाण्यापिण्याचा अगदींच ताळतंत्र सुटेल; अभक्ष्य भक्षण करावें लागेल. कसेंहि झालें तरी आपल्या धर्माला मुकून चालायचें नाहीं.

**वसंत**—तुमच्या किती Curious (चमत्कारिक) कल्पना आहेत या अप्पा ? या धर्माचें नसतें बंड कां म्हणून माजवायचें ? आजकाल पुष्कळ लोक इथें राहून देखील वाटेल तो अनाचार करीत नाहींत का ? अन् त्यांच्याकडे समाज काणाडोळाहि करीत नाहीं का ? तेव्हां अशा स्थितींत मी इंग्लंडला गेलों, तर कांहीं जगाविरुद्ध गोष्ट होईल, असें मुळींच नाहीं. तुमचा मुलगा बॅरिस्टर व्हावा, चांगल्या नांवालौकिकाला चढावा, असें नाहीं का वाटत तुम्हांला ? ही धर्माची पोकळ सबब नको. Damn this old rotten religion ! [ जळो तो जुनापुराणा धर्म ! ]

**अप्पासाहेब**—शाबास ! आपल्या तोंडून जंगी विद्वत्तेचीं मुक्ताफळें बाहेर पडूं लागलीं ! तूं इतका धर्मभ्रष्ट बनला असशील, असें मला वाटलें नव्हतें. तरी तूं कॉलेजांत गेल्याबरोबर शेंडीला साफ रजा दिलीस, तेव्हांच मला संशय आला होता. एखाद्या वेळीं तर तुझ्या जानव्याचा देखील पत्ता नसतो ! वा: ! एकूण तूं आमच्या कुळाच्या नांवलौकिकाचा चांगलाच उद्धार करणार म्हणायचा ! तें कांहीं नाहीं बस्स ! तुला शिकायचें असेल, तर हिंदुस्थान कांहीं लहान देश नाहीं ! तुला विलायतेंत पाठवून वाटेल तसे चार करूं द्यायला माझे पैसे कांहीं वर नाहींत आले ! एक शब्द देखील यासंबंधीं माझ्याजवळ बोलूं नकोस !

**इंदिराबाई**—त्याला विलायतेला जावं म्हणून इतकं वाटतं आहे, तर आडकाठी कशाला आणायची म्हणतें मी इकडे ? स्वत:ला 'सुधारक' म्हणवून घेणं होत असतं ना ? मग ही असली झांकली सुधारणा काय कामाची ? बायकांना चुलीपुढचंच शहाणपण म्हणून

नांवं ठेवायचीं, मग आपली ही असली सुधारणा कशापुढची ? तें कांहीं नाहीं. वसंताला पाठवायचाच विलायतेला, बरं का ? बॅरिस्टरची आई म्हणून म्हणवून घ्यायची मला भारी हौस आहे गडे !

**अप्पासाहेब**—तुमच्याच म्हणण्याप्रमाणें होऊं द्या. पण मुलगा तिकडून बिघडून न यावा म्हणून तुम्ही काय खबरदारी घेणार आहां, तें मला पहिल्यांदा सांगा. नाहीं तर त्यानें येतांच एकादी मेमसाहेब बरोबर आणावी म्हणजे खासें काम ! त्या देसायांच्या मुलानें नाहीं का आणली ?

**इंदिराबाई**—माझा वसंत कांहीं तसला नाहीं हो ! वसंत, नाहीं ना तूं असले कांहीं तरी चार करणार तिकडे ?

**वसंत**—हः हः ! याचा विलायतेला बॅरिस्टरीच्या अभ्यासासाठीं जाण्याशीं काय संबंध बोवा ! लग्न म्हणजे स्वतःसाठीं Life-Companion (जीवितयात्रेंतील सोबतीण) निवडण्याचा नाजूक प्रश्न ! तो सोडवतांना जातकुळीकडे कां पहावें, मी विचारतों ? ज्याच्या त्याच्या ध्येयाप्रमाणें या गोष्टी जो तो करणार, हें उघड आहे. मग अप्पा, तुमची आहे ना परवानगी मला ? मी पुढल्या स्टीमरनेंच जाईन म्हणतों.

**अप्पासाहेब**—जा; तुमच्या मनाप्रमाणें होऊं द्या ! बाकी माझ्या परवानगीची तुम्हांला विशेष कसली नड येणार आहे ? तुम्ही आजकालचीं पोरें ! तुम्हांला आमचें काय आवडणार आहे ?

---

**प्रश्न**

(१) या संवादात्मक लेखांत मुख्यत्वें काय दाखविलें आहे ?

(२) सन १८५५ पासून सुरवात करण्याचें कारण काय? १८५५ पासून १९१५ पर्यंतच्या कालांत लोकांच्या विचारांत व आचारांत क्रमानें कसा फरक पडत गेला हें दाखवा.

(३) "जुने डोळे, नवे चाळे" अशी म्हण आहे. ती या प्रकरणीं लागू पडते काय? कशी?

---

९

# आमचें ग्रहण अजून सुटलें नाहीं

[ महाराष्ट्रीय समाजसुधारकांचे अग्रणी परलोकवासी प्रो. गोपाळराव आगरकर यांच्या निबंधसंग्रहांतून पुढील लेख घेतला आहे. "बोले तैसा चाले" अशा कट्टया सत्यनिष्ठेमुळें आगरकरांच्या लेखणीस एक विलक्षण शक्ति प्राप्त झाली होती. सणसणीत स्पष्टोक्ति हा तिचा मुख्य विशेष होता. अनेक शतकें घोरत पडलेला हिंदू समाज कठोर टीकास्त्राच्या तडाक्याशिवाय जागा होणें शक्य नाहीं असें त्यांना वाटे. म्हणून प्रथम केसरीचे द्वारें, व नंतर 'सुधारक' पत्र काढून त्यांनीं सामाजिक, धार्मिक, व राजकीय व्यंगांवर खरमरीत लेख लिहिले, व तत्कालीन महाराष्ट्रीय समाज हालवून सोडला. या लेखांतील कडक भाषेमुळें, व पुरातन चालीरीतींवरील उपहासपर टीकेमुळें पुष्कळ लोकांना त्यावेळीं आगरकरांचा राग आला; पण आगरकरांनीं लोकनिंदेची व छळाची कधींच पर्वा केली नाहीं. आज चाळीस वर्षांनंतर त्यांचीं बहुतेक मतें सर्वमान्य होण्याच्या पंथांत आहेत. प्रौढ व जोरदार भाषा, व सडेतोड विनोद यांचा आगरकरांचे लेख उत्कृष्ट नमूना होत ]

गेल्या शुक्रवारच्या ग्रहणासारखी पर्वणी आली म्हणजे आमच्या समाजांत जी चलबिचल होऊन जाते, विशेषतः वरिष्ठ वर्गांतील

अशिक्षित पुरुषांची व स्त्रियांची जी धांदल उडून गेलेली असते, ती पाहून आमच्या बुद्धीचें ग्रहण अद्यापि सुटलें नाहीं, असें कोणत्याही विचारी पुरुषास वाटणार आहे. अशा प्रसंगीं अगदीं अज्ञ लोकांचें वर्तन जसें व्हावें तसें आमचें वर्तन होत असतें. ज्या रानटी लोकांस सूर्य एका दिशेनें येऊन दुसऱ्या दिशेनें निघून जातो कसा; चंद्राच्या बिंबास क्षय व वृद्धि कशानें होते; एकाएकीं सूर्याच्या व चंद्राच्या भोंवतीं खळीं पडतात कशीं; उदककणवाही अभ्रांनीं आकाश व्यापृत झालें असतां, किंवा ईषत् वर्षाव होऊं लागला असतां, आकाशांतील ज्या प्रदेशांत सूर्य असेल त्याच्या उलट प्रदेशांत नानातऱ्हेच्या रंगांची विशाल धनुराकृति कशी पडते; शुक्रासारखे कांहीं ग्रह कांहीं महिने क्षितिजापासून वर येत असल्यासारखे दिसत असून पुनः खालीं कसे उतरूं लागतात, व कांहीं दिवसांनीं मुळींच दिसेनासे कां होतात; आकाशस्थ कांहीं तारे परस्परांमधील अंतर कधींच बदलीत नाहींत, व कांहीं आज या तारकासमूहापाशीं, उद्यां त्या तारकासमूहापाशीं, अशीं एकसारखीं स्थानांतरें करीत असतात, याचें कारण काय; सूर्यप्रकाशांत उभें राहिलें असतां पडणारी छाया साऱ्या वर्षभर सारखी कां पडत नाहीं; तेजोमय शिखा किंवा पुच्छ असलेले असाधारण प्रचंड तारे[1] एकाएकीं कोठून येतात, व थोडे दिवस दिसत राहून, मग नाहींसे कसे होतात, आणि इतर ताऱ्यांप्रमाणें फिरून लौकर कां दिसत नाहींत; एखाद्याच्या गळ्यांतील मौक्तिकहार तुटून पडावा, त्याप्रमाणें नभोमंडलांतील तारकहार त्रुटित होऊन, त्यांतील भव्य मणि अनेक दिशांस विदारल्यासारखे कशामुळें

१ धूमकेतु.

दिसतात; भलत्याच ठिकाणीं एखादे वेळीं उपलवृष्टि कशी होते; मोठमोठीं बादळें कशीं सुटतात; डोक्यावरील अफाट पोकळींत पाणी जमतें कसें, आणि पर्जन्यधारा येतात कोठून; चंद्र व सूर्य नित्याप्रमाणें शांतपणें आकाशपंथ आक्रमीत असतां, एकाएकीं त्यांच्या तेजाचा अपहार करून मनुष्यलोकास कधीं गाढ तिमिरांत, व कधीं अर्धवट संध्येंत, चाचपण्यास कोण लावतो—वगैरे प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें देतां येणें अशक्य असल्यामुळें, त्यांनीं आश्चर्यजनक दृग्विषयां-विषयीं हवे तसे तर्क लढवून, त्यांसंबंधानें आपल्या शोधक मनाची हवी तशी समजूत घालून घ्यावी, आणि त्या समजुतीच्या अनुरोधानें आचरण करावें, हें त्यांच्या संबंधानें अगदीं स्वाभाविक आहे, व याबद्दल त्यांस अणुमात्र दोष लावतां येणार नाहीं; कारण तसें केल्याखेरीज त्यांस गत्यंतरच नाहीं. पण ज्या लोकांस या विषयांचें खरें ज्ञान झालें आहे, त्यांनींही त्यांच्याप्रमाणेंच वर्तन करणें म्हणजे अमूढ असून मूढाप्रमाणें आचरण करणें होत नाहीं काय ? कोणी असें म्हणतील कीं ज्योति:शास्त्राचें ज्ञान अद्यापि जितकें पसरावें तितकें पसरलें नाहीं, त्यामुळें सध्यांचा वेडेपणाचा प्रकार दृष्टीस पडतो. या आक्षेपावर आमचें असें उत्तर आहे कीं, कोणत्याही विषयाच्या संबंधानें कितीही ज्ञान वाढलें, व लोकांत त्याचा कितीही प्रसार झाला, तरी जुन्या पद्धति सोडून देऊन तदनुसार नव्या पद्धतीनें वागण्याचें धैर्य आल्याशिवाय, ज्ञानाच्या वृद्धीपासून किंवा त्याच्या प्रसारापासून म्हणण्यासारखा फायदा होत नाहीं. ग्रहणें कशीं होतात, चंद्रसूर्यांस खळीं कशीं पडतात वगैरे गोष्टी युरोपांतील सर्व लोकांस समजल्या आहेत, असें म्हणतां येणार नाहीं. पण जेवढ्यांस त्या पक्क्या कळून

आल्या त्यांनीं पूर्वापार चालत आलेल्या रूढींस न जुमानतां, अगोदर आपलें वर्तन बदलून नंतर दुसऱ्यांचें वर्तन बदलण्याचा प्रयत्न केला, यामुळें तिकडील लोकांच्या बुद्धीस ज्या राहूनें ग्रासलें होतें त्याच्या जबड्यांतून त्यांचा लौकर मोक्ष झाला. आमच्या इकडील पंडितांची तशी गोष्ट नाहीं. त्यांना लोकापवादाचें भय फार असल्यामुळें, ते आपल्या पांडित्यप्रदर्शनापलीकडे सहसा जात नाहींत. हा आमच्या राष्ट्रीय प्रकृतींत नैसर्गिक दोष आहे, व यामुळें आमचें अतिशय नुकसान होत आहे. कोणत्याही विषयाच्या संबंधानें जोंपर्यंत आपली पक्की खातरी झाली नाहीं तोंपर्यंत सामान्य लोकांच्या समजुतीप्रमाणें आचरण करणें दूष्य होणार नाहीं; कारण विनाकारण रूढ पद्धति सोडण्यांत कोणत्याही प्रकारचा फायदा नाहीं. सर्व जुन्या राष्ट्रांत ज्योतिःशास्त्राविषयीं नानातऱ्हेचे ग्रह पसरले होते, व त्यांच्या अनुरोधानें त्यांचें वर्तन होत होतें. लढाईला जावयाचें झालें, विवाह करावयाचा झाला, कोणत्याही मोठ्या कामासाठीं बाहेर पडावयाचें झालें कीं, प्रथम त्या त्या गोष्टीस ग्रहांची अनुकूलता कशी काय आहे, हें जोश्याकडून पहावयाचें, आणि त्यानें ते अनुकूल आहेत, अशी खात्री दिल्यास मग तिला आरंभ करावयाचा, असा प्रकार आशिया व युरोपखंडांतील सर्व जुन्या लोकांत रूढ होता. मनुष्याचें मन जात्या शोधक असल्यामुळें, ज्या ठिकाणीं त्याची मति खुंटते त्या ठिकाणीं तें पाहिजे तसल्या गोष्टीवर विश्वास ठेवण्यास तयार होतें. पृथ्वीवर घडून येणाऱ्या मोठमोठ्या चमत्कारांची मीमांसा आतांप्रमाणें त्या वेळेस करतां येणें शक्य नसल्यामुळें आकाशांत भ्रमण करणाऱ्या तेजोनिधींकडून ते होत असावे, अशी कल्पना त्या वेळेस होणें फार

साहजिक होतें. तसेंच अनेक वर्षें लक्षपूर्वक आकाशाचें अवलोकन केल्यावर तारे आणि ग्रह यांतील भेद लक्षांत यावा; ग्रह मागें पुढें होतात ते आम्हांस सुख किंवा दुःख देण्यासाठीं होत असावेत; श्वेत व रमणीय शुक्र सुखप्रद व बलवर्धक असावा; रक्तवर्ण मंगळास रुधिराची प्रीति असावी; मंद व निस्तेज शनीचा स्वभाव दुष्ट असून मनुष्यांना पीडा देण्यांत त्यास मोठा आनंद होत असावा–अशा कल्पना येऊं लागून अखेरीस मनुष्यांच्या मुख्य मुख्य वृत्तींचा आरोप, निरनिराळ्या ग्रहांवर, त्यांच्या त्यांच्या स्वरूपाच्या अनुरोधानें, व कवींच्या आणि जोश्यांच्या तर्काप्रमाणें, करण्यांत आला यांत कांहीं नवल नाहीं, व सामान्य लोकांनीं तत्कालीन श्रेष्ठ व सूज्ञ लोकांच्या पदपंक्तीचें अनुसरण केलें यांतही कांहीं वावगें झालें नाहीं. पण अमुक गोष्ट अमुक रीतीनें घडत नाहीं, अमुक रीतीनें घडते, असें ज्यास पक्कें समजून आलें आहे, तो जर लोकांचा गैरसमज दूर करण्याचें धैर्य न करील, तर खऱ्या ज्ञानाचा प्रसार होऊन सुधारणा व सुखवृद्धि कशी व्हावी? आपल्या इकडील तत्त्ववेत्त्यांत आणि शास्त्रज्ञांत एक मोठा दोष दिसून येतो तो हा कीं, त्यांना आपल्या समजुतीप्रमाणें आचरण करण्याची उत्कट इच्छा किंवा धैर्य होत नाहीं. "पुराणांतलीं वांगीं पुराणांत" अशा पद्धतीनें आमच्यांतील विद्वान् म्हणविणाऱ्यांचें वर्तन बहुधा होत असल्यामुळें दुर्मति, दुराग्रह आणि दुष्ट चाली यांचें ठाणें या देशांत कायम झाल्यासारखें झालें आहे. बाकी ज्या देशांत भास्कराचार्यासारखे ज्योतिषी होऊन गेले, त्या देशांत अजूनपर्यंत चंद्रग्रहण किंवा सूर्यग्रहण आलें असतां कांहीं वेळ थंड पाण्यांत निष्कारण बुड्या मारण्याची, उपवास

करण्याची, भलभलत्या वस्तूंचीं दानें करण्याची, मूर्खपणाच्या मंत्राचा जप व सिद्धि करण्याच्या फंदांत पडण्याची, पापडलोणच्यावर व दहींदुधावर तुळशीपत्रें घालीत बसण्याची, आणि जणुंकाय आपणास सुतक्यानेंच स्पर्श केला आहे कीं काय असें समजून, स्त्री-पुरुषांनीं धोतरापात्रांसकट डोक्यावरून पाणी घेण्याची चाल अजूनपर्यंत दृष्टीस पडावी काय? पण आमच्या भास्कराचार्यांसच हा प्रकार अप्रशस्त म्हणण्याची छाती कोठें होती? भास्कराचार्यांचें भास्कराचार्यत्व फक्त वेधशाळेंत! आचार्य तिच्याबाहेर पडले कीं, "यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं ना करणीयं नाचरणीयं" (शुद्ध असूनही जर एखादें आचरण लोकविरुद्ध असेल तर तें करूं नये) या उपदेशाचे अनुयायी! ग्यालीलिओ-कोपर्निकसादि यूरोपीय ज्योतिर्विदांनीं अशा प्रकारचेंच आचरण केलें असतें तर यूरोपांत ज्ञानरवीचा प्रकाश फांकून अज्ञानतिमिराचा विध्वंस झाला असता काय, व आज त्या खंडास जो सुदिन प्राप्त झाला आहे तो होता काय? तसें इकडे व्हावें अशी इच्छा असेल, तर लोकापवादाचें भय टाकून, आपल्या मनास शुद्ध दिसेल तें लोकांस सांगण्याचें, व तदनुसार वागण्याचें, धैर्य केलें पाहिजे; आणि तसें पुष्कळांकडून होऊं लागलें, तरच अज्ञानराहूनें ग्रासलेल्या या आमच्या हतभाग्य देशाचें ग्रहण लौकर सुटणार आहे!

---

## प्रश्न

(१) ग्रहणाचे वेळीं सुशिक्षित मंडळींचें वर्तन पाहून आगरकरांस काय वाटलें? ते जुन्या आशिक्षित लोकांस कां दोष देत नाहींत? सुशिक्षितांवरच त्यांचा कटाक्ष कां?

( २ ) ज्ञानाचा खरा उपयोग होण्यास अंगीं धैर्य असण्याची आवश्यकता आहे, असें लेखकानें कां म्हटलें आहे? ( पृ. १३४ वरील मानसिक धैर्याविषयींचा मजकूर वाचा ).

---

## १०

# वनवास पुरवला, पण अज्ञातवास नको !

[ पुढील उतारा श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर यांच्या "कीचकवध" नाटकांतून घेतला आहे. श्रीयुत खाडीलकर हे मराठी नाटककारांत अग्रगण्य ठरले आहेत. ऐतिहासिक, पौराणिक व स्वतंत्र अशीं अनेक नाटकें लिहून त्यांनीं मराठी वाङ्मयांत आपलें नांव चिरस्मरणीय करून ठेवलें आहे. या नाटकांत "कीचकवध" हें नाटक फार श्रेष्ठ दर्जाचें ठरलें आहे.

पांडवांच्या अज्ञातवासांत त्यांना विराट नगरींत वेष पालटून राहण्याचा कसा प्रसंग आला होता, व तेथें आपल्या सामर्थ्यानें व उद्दामपणानें राजा विराटाला सुद्धां न जुमानणाऱ्या त्याच्या सेनापतीनें—कीचकानें—सैरंध्रीच्या वेषांत असलेल्या द्रौपदीवर पापी नजर ठेवल्यानें त्यास शेवटीं भीमाच्या हातून कसें प्राणास मुकावें लागलें हें सर्व कथानक "भारतीय युद्धा" सारख्या एखाद्या पुस्तकांतूनच वाचलें पाहिजे. पुढील संवाद ध्यानांत येण्यासाठीं येथें येवढें मात्र सांगितलें पाहिजे कीं, कीचकानें सैरंध्रीला मी आपल्या नाटकशाळेंत ( जनानखान्यांत ) ठेवणार असें राणी सुदेष्णेला सांगितलें. तेव्हां बोलण्याप्रमाणें करण्यास हा दुष्ट चुकणार नाहीं असें वाटून द्रौपदीनें एकांतांत धर्मराज ( कंकभट ) व भीम ( बल्लव ) यांना गांठून आपलें या संकटांतून रक्षण करा अशी विनंति केली. त्या वेळचा हा संवाद आहे ]

### [ कीचक वध—अंक १ ला, प्रवेश ३ रा ]

( **स्थळः**—महालक्ष्मीचें देवालय; कंकभट, बल्लव, सैरंध्री बोलत आहेत )

**कंक०**—द्रौपदी, आम्हां पांडवांची शक्ति केवढी मोठी असली, तरी आज त्याचा काय उपयोग ? आमचें पूर्वींचें वैभव आठवावें

आणि डोळ्यांतून पाणी काढावें, ह्यापलीकडे आजच्या आमच्या स्थितींत आम्ही काय करूं शकणार ? जरासंधाला ज्यानें सहज लीलेनें मारलें तो एकटा भीम सर्व कौरवांना पुरून उरण्याइतका बली आहे—पण आज आपण ' होता ' असेंच म्हटलें पाहिजे. पांचाली, तुझ्या स्वयंवराच्या वेळीं ज्या अर्जुनानें सर्व कौरव व इतर राजे ह्यांचा समाचार घेतला, राजसूय यज्ञाचे वेळीं ज्या धनुर्धरानें सर्व पृथ्वी पादाक्रांत केली, वनवासांत असतांना ज्यानें गंधर्वांचा मद उतरून सुयोधनाला सोडवून तुझ्या देखत सर्व कौरवांना खालीं माना घालावयास लाविलें, तोच महारथी आज हातांत कांकणें भरून बसला आहे ! आमचें सामर्थ्य उघडपणें दाखविण्याचे दिवस परमेश्वर आणी तों, सर्व मानापमान मुकाट्यानें गिळणें हाच शहाणपणाचा मार्ग मी समजतों.

**सैरंध्री**—महाराज, आपण शांतिब्रह्माचे सागर आहां, तेव्हां जुलूम करणाऱ्यांच्या लाथा सर्वांनीं शांतपणें खाव्या, असें आपणास वाटतें तें ठीकच आहे. शिवाय वनवास संपल्यानंतर, हल्लींच्या अज्ञातवासांत दुसऱ्याच्या दुःखाची अटकळच आपणास करतां येईनाशी झाली आहे. आपणास राजसभेंत बसावयास मिळतें, केवळ धर्माधर्माच्या वादविवादांत राजा आपली सल्ला मसलत विचारून जुगाराचे दोन पैसे तोंडावर फेंकतो, एवढ्यावरच संतुष्ट होऊन, इंद्रप्रस्थाच्या सिंहासनाच्या मालकांनीं खुद्द आपल्या बायकोला परक्यांची वाईट रीतीनें दासी होण्यास सांगावें, ह्याहून पांडवांना लज्जास्पद गोष्ट कोणची ?—गुलामगिरींत कांहीं दिवस गेल्यानें गुलामगिरींतच मजा वाटूं लागते, ह्याचें उदाहरण म्हणून, विराटनगरींतील पांडवांच्या

वर्तनाकडे आपल्या पुत्रपौत्रांनीं बोटें दाखवूं नये असें तरी आपण वागलें पाहिजे; एवढीच आपल्या दीन पत्नीची महाराजांच्या पायांपाशीं विनंति आहे.

**कंक०**—द्रौपदी, कीचकाच्या नाटकशाळेंत तूं जा, असें मी एका शब्दानें तरी बोललों का ?

**सैरंध्री**—महाराज, काल जर कौरव हजर असते आणि पांडवां-समोर ह्या द्रौपदीला आपली नाटकशाळा करण्याची कीचकानें केलेली प्रतिज्ञा जर त्यांनीं ऐकली असती, तर पांडवांना अज्ञातवासांत ठेवण्याचें सार्थक झालें, असेंच त्यांना वाटलें असतें.—महाराज, भरसभेंत त्या हलकट दुःशासनानें माझा पदर ओढला, त्यावेळीं मी द्यूतांत जिंकलेली दासी होतें, असें आपणास वाटलें, म्हणून आपण कपाळावर हात मारून गप्प बसलां; पण काल मी कांहीं गुलाम नव्हतें किंवा आपणही गुलाम नव्हतां—

**कंक०**—द्रौपदी, आपण अज्ञातवासांत आहोंत हें तूं विसरूं नकोस.

**सैरंध्री**—म्हणूनच म्हणतें, आजची आमची स्थिति पाहून कौरवांना आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं.—महाराज, बारा वर्षें सोडून जन्मभर वनवास आला तरी पुरवला, पण हा अज्ञातवास—

**कंक०**—द्रौपदी, आपल्या पापामुळें एकदां आपण स्वस्थाना-पासून भ्रष्ट झालों म्हणजे वनवासाच्या यातना मनुष्याच्या कपाळीं लिहिल्या असतात. ह्या वनवासांत तो हुषारीनें वागला, म्हणजे अज्ञातवासाचीं सुखें त्याला मिळतात. ह्या अज्ञातवासाचे दिवस अक्कल-हुषारीनें व आपली धर्मवृत्ति कायम ठेऊन त्यानें काढले, म्हणजे

पुन्हा तो आपल्या पहिल्या स्थितीला जातो. संसाराचें रहाटगाडगें असें आहे.

**सैरंध्री**—महाराज, वनवासांत आपण पूर्वी कोण होतों, काय होतों, ह्याची आठवण तरी विसरून जावी लागत नाहीं. पांडव वनवासांत असतांनाहि पूर्वीप्रमाणेंच सर्व जगाला आपल्या तेजानें थक्क करून सोडीत असत. पण आज आपली स्थिति काय आहे ?—इंद्रप्रस्थाच्या सिंहासनाचे मालक आम्ही, असे शब्द प्रसिद्धपणें तोंडावाटे काढण्याची मोकळीक तुम्हांला आहे काय ?—तुमच्या बायकोकडे वांकड्या नजरेनें पहाणाऱ्या जयद्रथाला पांच पाट काढून, गुलाम बनवून, फजीत करून, आपल्या बहिणीकडे पाहून जसें तुम्हीं जीवदान दिलेंत, तसा पराक्रम करून दाखविण्यास "द्रौपदीपति," "द्रौपदीपति" म्हणून तो नरपशू मिरवीत असतांना तुम्ही पुढें कां सरसावलां नाहीं ?—महाराज, वनवास जन्मभर पुरवला, पण पांडवांच्या सर्व सद्गुणांचा लोप करणारा हा अज्ञातवास एक क्षणभरहि नको ! वनवासांत केवळ शरीराचे हाल होतात. महाराज, शरीर काय जसें ठेवावें तसें रहातें; पण ह्या अज्ञातवासांत मनाचे हाल होतात. पांडवांचा अज्ञातवास म्हणजे पांडवांनीं स्वखुषीनें, आपली पूर्वीची थोरवी विसरून जाऊन, दुसऱ्याच्या सत्तेखालीं राहण्याचें कबूल करणें होय. महाराज, स्वातंत्र्याचा आस्वाद घेणाऱ्या मनानें दोन दिवस स्वखुषीनें गुलामगिरींत घालविले, तर तत्काळ तें मन लेचेंपेचें होऊन मानापमान त्याला कळेनासा होतो; किंबहुना अपमान सहन करणें व पूर्वपीठिका विसरून जाणें, हाच सद्गुण असें त्याला वाटूं लागतें !—पांडव वनवासांतून सरळ हस्तिनापुराला गेले असते, तर



सै०—जन्मभर वनवास आला तरी पुरवला; पण पांडवांच्या सर्व सद्गुणांचा लोप करणारा हा अज्ञातवास एक क्षणभरही नको !

शरीरानें दुबळे पण मनानें खंबीर असे कौरवांना दिसून, आमच्या शत्रूंना आमची भीतिच वाटली असती. पण महाराज, राजमंदिरांतील नोकराचाकरांना मिळणाऱ्या सुखाला लालचावलेले आजचे पांडव शरीरानें तुकतुकीत, पण मनानें षंढ झालेले पाहून कौरव आनंदानें टाळ्या पिटतील !

**कंक०**—द्रौपदी, कीचकाच्या नाटकशाळेंत तूं जावेंस—

**बल्लव**—दादा, कीचकानें द्रौपदीला नाटकशाळेंत ठेवणार म्हणून म्हटल्याबरोबर तुम्ही गप्प कसे बसलां ?—हा भीम जर काल हजर असता, तर जरासंधाला उभा चिरून एका जरासंधाचे दोन जरासंध जसे मीं केले, त्याप्रमाणेंच एका कीचकाचे दोन कीचक केले असते.—पांचालीनें मला कालची हकीकत सांगितली, त्या वेळीं कीचकापेक्षां तुमचा राग मला अधिक आला. कीचक काय सांगून सवरून महा अधम, सूतपुत्र, महापशू तो; पण त्या हलकटाचें उद्दामपणाचें वर्तन तुम्ही कसें सहन केलेंत ?—दादा, तुमचें स्वतःचें छत्र त्या पशूच्या डोक्यावर धरलेलें पाहून तुमचें रक्त संतापानें ज्या अर्थी तापलें नाहीं, त्या अर्थी इंद्रप्रस्थाच्या छत्राला पांडव लायकच नाहींत असें मी समजतों.—आम्हीं पांडव जिवंत असतांना, त्या सूतपुत्र कीचकानें 'द्रौपदीपति' म्हणून मिरवावें हं ? दादा, धिक्कार असो तुमच्या धर्माला आणि शांत शीलाला !

**कंक०**—भीमा, शांत हो. ह्या वेळीं क्रोधाच्या तडाख्यांत सांपडून अविचारानें व अधर्मानें आम्हीं बिलकूल वागतां कामा नये. आमचें सुदैवच म्हणून, भीमा, तूं कालच्या समा-रंभांत हजर नव्हतास.—तो नरपशू कीचक भीम हीं अक्षरें

केवळ आपल्या टांचेखालीं ठेंचतो, पण खरी वेळ आली म्हणजे भीमाच्याच लत्ताप्रहारानें त्या धर्मभ्रष्टाचा कपाळमोक्ष होणार, हें मला पक्कें दिसत आहे. पण द्रौपदी, आजची वेळ रागावण्याची नव्हे.—भीमा, आज संतापानें चिडून, उघडकीस येऊन, सुकुमार द्रौपदीनें पुन्हा वनवासांत जावें, ही गोष्ट मला बिलकूल पसंत नाहीं. आजचा काळ जसा मला दिसत आहे तसाच पुढचाहि स्पष्ट दिसतो आहे,—

**बल्लव**—मग काय, द्रौपदीनें कीचकाच्या नाटकशाळेंत जाऊन भ्रष्ट व्हावें असें म्हणतां ? आज हा अपमानकारक जुलूम सोसून, पुढें कधींकाळीं इंद्रप्रस्थाचें राज्य कौरवांपासून घेऊन तरी काय करावयाचें आहे ? दादा, मी तुमचा धाकटा भाऊ झालों, ह्याची मला इतकी शरम वाटते कीं, ह्या असल्या जगण्यापेक्षां अग्निकाष्ठ खाऊन मेलेलें पुरवलें !—द्रौपदीला कीचकानें भ्रष्ट केली म्हणून सर्व दुनिया छीः थुः करीत असतांना, युधिष्ठिर महाराज आपली प्रतिज्ञा पूर्ण करून इंद्रप्रस्थाच्या सिंहासनावर चढूं पाहतात काय ?—दादा, अजातशत्रू म्हणून कांहीं अग्निहोत्री आपला गौरव करितात, पण ज्यांना आपल्या बायकांवर जुलूम झाला असतांहि राग येत नाहीं,—धिक्कार असो त्यांच्या त्या अजातशत्रुत्वाला !

**कंक०**—भीमा, माझें बोलणें तरी ऐकून घेशील कीं नाहीं ? पांडवांना दुसऱ्याच्या सत्तेखालीं निमूटपणें दिवस काढण्याचें ठाऊक नव्हतें. अज्ञातवास कबूल केल्यानें दुसऱ्याची सत्ता स्वखुषीनें पांडवांनीं कबूल केल्यासारखी आहे. अशा स्थितींत जुलूम होत असला तरी उघडपणें आडदांडपणानें वागणें योग्य नाहीं. पुढच्या उत्कर्षावर दृष्टि ठेवून आजचे वाईट दिवस आम्हांस कसे तरी कंठावयाचे आहेत.—

द्रौपदी, तूं अशी खिन्न होऊं नकोस. हा बढाईखोर कीचक कितीही बडबडला, तरी खरोखर त्याच्या नाटकशाळेंत जाण्याचा प्रसंग तुला येईलसें मला वाटत नाहीं.—महाराजा विराट् उदार बुद्धीचा व कोमल अंतःकरणाचा असून महाराणी सुदेष्णा आपल्या सद्गुणांमुळें सर्व प्रजाजनांना प्रिय झालेली आहे.—द्रौपदी, शाब्दिक अपमान सांप्रतच्या स्थितींत आम्ही मुकाट्यानेंच गिळले पाहिजेत. पण तो दुष्ट कीचक आपल्या शब्दाप्रमाणें खरोखरच वागण्यास जर प्रवृत्त होऊं लागला, तर सुदेष्णेचीं आर्जवें कर, पायां पडून महाराणीच्या सत्यनिष्ठेवर व औदार्यावर अवलंबून रहा, म्हणजे कीचकापासून तुला त्रास होणार नाहीं.

---

### प्रश्न

( १ ) अज्ञातवासांत पांडवांनीं कसें वागावें या विषयीं युधिष्ठिराचें मत काय होतें ? द्रौपदीचें ? भीम कोणत्या पक्षाचा होता ?

( २ ) वनवासापेक्षांही अज्ञातवास दुःसह असें द्रौपदीस कां वाटे ?

( ३ ) कीचकापासून द्रौपदीचें रक्षण करण्याचे बाबतींत युधिष्ठिराचा मुख्य भरंवसा कशावर होता ? पुढें या बाबतींत काय अनुभव आला ?

( ४ ) युधिष्ठिर, भीम, व द्रौपदी यांच्या स्वभावांचें थोडक्यांत वर्णन करा.

# ११

# घर

[ बालोपयोगी मासिक " बालबोध " कित्येक वर्षे चालवून व हिंदुस्थान कथारस, मधुमाक्षिका यांसारखीं अनेक छोटीं मोठीं पुस्तकें लिहून कै. विनायक कोंडदेव ओक यांनीं मराठी बालवाङ्मयाची चिरस्मरणीय सेवा केली आहे. अत्यंत साधी व रसाळ अशी भाषा लिहिण्यांत त्यांचा हातखंडा असे. बालबोधाच्या प्रत्येक अंकांत कोणातरी प्रसिद्ध पुरुषाचें एक चरित्र, एक लहानशी उपदेशपर कविता, एक लहानसा निबंध, व शिवाय किरकोळ माहिती अशी योजना असे. अशाच एका निबंधाचा पुढील मासला आमच्या बालवाचकांस आवडेल अशी उमेद आहे ]

लहान माणसें मोठ्या माणसांच्या आज्ञा पाळितात; मोठीं माणसें लहान माणसांचें कल्याण करितात; सगळीं माणसें एकमेकांवर मनापासून प्रेम करितात; सगळीं माणसें नेहमीं खरें बोलतात; सगळीं माणसें नेहमीं सत्याचरण करितात; सगळीं माणसें एकमेकांचा संतोष करण्यास झटतात; सगळीं माणसें अंतःकरणपूर्वक देवाची भक्ति करितात; दया, क्षमा, आणि शांति ह्यांची वसति पुष्कळ आहे; काम, क्रोध, मद, मत्सर, इत्यादिकांस थारा नाहीं; हेवा, द्वेष, कुवासना इत्यादिकांची सावली देखील पडत नाहीं; एका माणसास सुख झालें म्हणजे तें सर्वांस होतें; एकाच्या पायास कांटा लागला कीं, सगळ्यांचे डोळ्यांस पाणी येतें; बोलायचें काय, तर सत्य; वाचायचें काय, तर सच्चरित; गावयाचें काय, तर परमेश्वरगुणानुवर्णन; आणि करायचें काय, तर धर्मशास्त्रानें जें काय अत्यंत पवित्र म्हणून सांगितलें आहे तें; इतक्या गोष्टी ज्या ठिकाणीं घडतात, तेंच घर होय;

आणि अशा ठिकाणीं राहणारीं जीं माणसें असतात त्यांसच कुटुंब म्हणावें. या गोष्टींचा अभाव झाल्यावर एखाद्या ठिकाणीं इतर कितीही चांगल्या आणि सुखदायक गोष्टी असल्या, तरी तें घर नव्हे, तें अरण्य होय; आणि असें सद्गुणांचें राज्य ज्या माणसांत नाहीं, त्या माणसांस कुटुंब म्हणूं नये, गुरें म्हणावें, जनावरें म्हणावें. याप्रमाणें चांगलीं माणसें वागत आलीं आहेत. दाशरथि राम अयोध्या सोडून निघाले; ते कां? तर कुटुंबामध्यें मत्सराचें प्राबल्य झालें. भरतानें राज्यत्याग केला; तो कां? तर त्यांत प्रेम नाहींसें झालें. धर्मराजांनीं राजधानी सोडली; ती कां? तर राज्यांत सापत्नभाव आणि दुष्टावा अतिशय माजला. म्हणजे रामचंद्रास घर हें अरण्य वाटूं लागलें, तसें धर्मराजांस आप्तांत राहणें हें अरण्यवासापेक्षां दुःखद वाटूं लागलें. हे दोघेही महात्मे स्वधामें सोडून अरण्यांत गेले. तेथें त्यांजपाशीं राज्यलक्ष्मी नव्हती, दरिद्र होतें; तरी सत्यप्रेम पुष्कळ होतें. त्याच्या योगानें त्यांस अरण्येंही स्वगृहापेक्षां अधिक सुखप्रद वाटलीं. सीतेनें अरण्यांतली स्थिति आपल्या बहिणींस सांगितली आहे:—

### आर्या

चालति माझ्यामागें लक्ष्मणजी काननीं, पुढें स्वामी; ॥
धामीं तशीच हर्षे प्रेमी पाहोनि आपुल्या स्वांमी[1] ॥ १ ॥

### अभंग

लक्ष्मण भावोजी मागें पुढें स्वामी ।
मज आहे धामीं ऐसें वाटे ॥ १ ॥

---

१ स्वा—स्वतःच्या पतीला.



श्री. विनायक कोंडदेव ओक

न बाधेचि मज उष्ण क्षुधा तृषा ।
तुम्हांपाशीं मृषा[1] न बोलावें ॥ २ ॥
जेव्हां राहीं वाटे चालतां मी मागें ।
मुरडोनी मागें विलोकिती ॥ ३ ॥
बाई काय सांगों स्वामींची ती दृष्टी ।
अमृताची वृष्टी मज होय ॥ ४ ॥

मोरोपंत

त्याचप्रमाणें पांडव द्वैतवनांत रहात होते, त्यांचें वर्णन केलें आहे:—

## आर्या

सरला वनवास मग द्वैतवनीं पांडुनंदन वसति तें ।
दिवसांत वांकुल्या शत दावित होतेंचि नंदनवसातितें[2] ॥ १ ॥

मोरोपंत

पांडवांस द्वैतवनामध्यें नंदनवनापेक्षांदेखील अधिक सुख होत होतें, असें ह्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. सारांश असा आहे कीं, सदाचरण हें सगळ्या सुखाचें स्थान आहे. म्हणून, घर हें जर सुखावह करावयाचें आहे,—आपल्या घरांत आपणास सुख व्हावें अशी जर इच्छा आहे,— तर तें घर सदाचरणाचें वसतिस्थान करावें.

मनुष्यास घरासारखें दुसरें सुस्थळ नाहीं. घर हें मोठें पुण्यक्षेत्र आहे. त्यांत मातापितरें ह्या देवता होत. त्या देवता सुप्रसन्न असल्या, म्हणजे मनुष्यास कांहीं उणें पडत नाहीं. त्याचे सगळे मनोरथ पूर्ण होतात.

---

१ मृषा—खोटें. २ स्वर्गांतील नंदनवनाच्या वस्तीला.

मनुष्याच्या अंगच्या सद्गुणांस आरंभ होण्याचें आदिस्थान घर होय. सद्गुण संपादण्यास घरासारखें दुसरें ठिकाण नाहीं. घरांतलीं सगळीं माणसें संबंधी असतात. कोणाचा संबंध जवळचा असतो, कोणाचा दूरचा असतो. कोणी श्रेष्ठ असतात, कोणी बरोबरीचीं असतात, कोणी कनिष्ठ असतात; कोणी खोल असतात, कोणी उघड्या मनाचीं असतात; कोणी आर्जवी असतात, कोणी उद्धट असतात. अशा सगळ्या प्रकारच्या माणसांशीं वागण्याचा प्रसंग मनुष्यास घरामध्यें येतो. त्यांशीं वेगळ्या वेगळ्या प्रकारें कसें वागावें, कोणाला संतुष्ट कसें करावें, हें त्याला शिकतां येतें. आत्मसंयमन करणें, जगाचे आघात सोसणें, परोपकार करणें, दुसऱ्याच्या अपराधांची क्षमा करणें, दुसऱ्याच्या आंगचे गुण दाखविणें, आत्मस्तुतीची इच्छा दाबणें, इत्यादि सद्गुणांचा आरंभ होण्याचें स्थान घर असतें. कां कीं, इतक्या वेगळ्या वेगळ्या प्रकारच्या माणसांशीं वेगळ्या वेगळ्या पर्यायांनीं वागावें लागतें. आणि त्यांत विशेष हें कीं, त्या शिकण्यामध्यें जरी क्वचित् एखादी चूक झाली, तरी तिचा परिणाम भयंकर होत नाहीं. ती चूक सुधारतां येते. हीच चूक परक्याशीं वागण्यांत झाली, तर ती सुधारतां येत नाहीं. तिचे परिणाम टाळतां येत नाहींत. आणि ते कदाचित् टाळतां आलेच, तर त्यास मनस्वी प्रयास पडतात. ह्यास्तव आम्ही असें म्हणतों कीं, घर ही सद्गुण शिकण्याची एक अत्युत्तम शाळा आहे. तिची बरोबरी इतर कोणत्याही ठिकाणाच्यानें करवणार नाहीं.

त्याचप्रमाणें, कविश्रेष्ठ मोरोपंत ह्यांनीं जें म्हटलें आहे कीं, मनुष्यांच्या अपराधांवर इतरांनीं कितीही पांघरूण घातलें, तरी तें

" थिटें " पडतें, पण आईच्या कृपेचें पांघरूण पुरून उरतें, तीच गोष्ट घराविषयीं आहे. मनुष्याच्या आंगचे दोष झांकण्यास घरासारखें दुसरें पांघरूण नाहीं. त्या कार्यास एवढें थोरलें आकाश तेंही " थिटें " होतें. पण घर पुरतें. दुष्ट मनुष्याला घर नकोसें होतें. पण घरास कधीं दुष्ट मनुष्य नकोसें होत नाहीं. दुष्ट माणसांनीं आपलीं घरें जाळिलीं आहेत; पण घरांनीं कधीं दुष्ट माणसांस जाळिलें नाहीं. घर हें खरोखर पुण्यक्षेत्र आहे. तेथें पाप असें कधींही होत नाहीं. अथवा उलट पर्यायानें आम्ही असें म्हणतों कीं, पाप होतें तें ठिकाण खरोखर घरच नव्हे, असें होतें.

तर मग मनुष्यास सुख होण्यास पाहिजे तें घर कसें असावें, हें वर सांगितलेंच आहे. तसें तें बांधण्याचा प्रयत्न कुटुंबांतल्या प्रत्येक माणसानें आपापल्या परी केला पाहिजे. म्हणजे आपापलीं कर्तव्यें केलीं पाहिजेत. त्यास संपत्ति लागत नाहीं, तसे मोठे प्रयासही पडत नाहींत. त्याची सामग्री विधात्यानें माणसाच्या अंतःकरणांत सिद्ध करून ठेविली आहे. ती यथायोग्य रीतीनें बाहेर काढून तिचा उपयोग यथायोग्य रीतीनें करणें, एवढेंच काय तें माणसाकडे आहे.

---

### प्रश्न

( १ ) घर कसें असलें म्हणजे त्यास ' घर ' हें नांव शोभतें ? श्रीरामचंद्राचा वनवास त्यास गृहवासाइतकाच सुखाचा कां वाटला ?

( २ ) " Charity begins at home " (आपल्या औदार्यास घरापासून सुरवात होते ) या इंग्रजी म्हणीचा अर्थ सांगा, व ती कितपत खरी आहे हें दाखवा.

( ३ ) " म्हणोनि म्हणती भले ऋण न जन्मदेचें फिटे " ( मोरोपंत ). इतरांपेक्षां मातेचे उपकारच अधिक असे कां समजतात ?

( ४ ) वाङ्मयप्रवेशिका भाग १ ला यांतील ना. वा. टिळक यांची " तें गृह " ही कविता व प्रस्तुत निबंध यांतील विचारांची तुलना करा.

---

# १२

# चाणक्याची प्रतिज्ञा

[ पुढील उतारा प. वा. हरिभाऊ आपटे यांच्या चंद्रगुप्त नामक ऐतिहासिक कादंबरींतून थोड्या संक्षेपानें घेतला आहे. चंद्रगुप्त मौर्य हा प्राचीन आर्यावर्तांत एक महापराक्रमी चक्रवर्ती राजा होऊन गेला, व त्यानें ग्रीक लोकांचा पराजय करून त्यांस हिंदुस्थानांतून घालवून दिलें, ही गोष्ट इतिहास-प्रसिद्ध आहे. हा नंदवंशांतील धनानंद राजाचा **मुरा** नामक शूद्र स्त्रीपासून झालेला पुत्र होता. **विष्णुगुप्त** ऊर्फ **आर्य चाणक्य** या नांवाच्या बुद्धिमान् व महाकारस्थानी ब्राह्मणाच्या साहाय्यानें यानें सर्व नंदांचा नाश करून मगध देशाचें राज्य संपादन केलें. चाणक्याची व चंद्रगुप्ताची प्रथम गांठ कशी पडली याचें रसभरित वर्णन पुढील उताऱ्यांत वाचकांस मिळेल ]

पूर्वार्धांत सांगितलेल्या प्रसंगास सुमारें पंधरा सोळा वर्षें झालीं. आतां यवनांनीं ( ग्रीक लोकांनीं ) पंजाबांत आपला अंमल पूर्णपणें बसवून टाकला होता. शिकंदर बादशहानें तिकडला बराचसा प्रांत काबीज करून व त्याच्या बंदोबस्ताकरितां आपले आप्त इष्ट ठेवून स्वदेशीं प्रयाण केलें होतें. पर्वतेश (पोरस) नांवाच्या बलाढ्य राजाचा पराभव करून शिकंदरानें त्यास आपला मांडलिक बनविलें, आणि त्याचें राज्य त्याच्याच स्वाधीन केलें. तेवढ्यानेंच तो राजा आनंदित होऊन

आपणास यवनांचा मांडलिक म्हणवून घेण्यांत धन्यता मानूं लागला..... अशा प्रकारें ठिकठिकाणीं यवनी अंमल सुरू झाल्यावर सहजच यवनी विद्येचा प्रचार सुरू झाला, व संस्कृत विद्येचा मान राहीनासा झाला, आणि संस्कृत पंडितांना त्यामुळें अतोनात वैषम्य वाटूं लागलें, हें सांगावयास नकोच.

पंजाबच्या उत्तरेस गांधार ( हल्लींचें कंदाहार ) देशाची राजधानी **तक्षशिला** नगरी होती. हा गांधार देश प्राचीन काळीं फार प्रसिद्धीस आला होता. कौरवांची माता धृतराष्ट्रपत्नी गांधारी ही या देशाचीच राजकन्या. शिकंदरानें हा देश पादाक्रांत करून तेथें आपलें राज्य स्थापलें होतें, यामुळें या वेळीं तक्षशिला नगरी यवनी अमलाचें केंद्र बनून राहिली होती. यामुळें आर्य पंडितांना फारच वैषम्य वाटून ते अगदीं असंतुष्ट होऊं लागले होते. अशा पंडितांपैकींच एकाच्या आश्रमांत आपण आज जाणार आहों.

आश्रम हा शब्द वर योजिला आहे; परंतु आर्य विष्णुशर्मा याच्या त्या निवासस्थलाला तो शब्द लावणें म्हणजे त्याची विटंबना करणेंच होय. बिचाऱ्या ब्राह्मणाची ती पर्णकुटी जेमतेम त्याला व त्याच्या वृद्ध मातुःश्रीला यथेच्छ वावरण्यापुरती सुद्धां नव्हती. दारिद्र्य म्हणजे मूर्तिमंत तेथें वास करीत होतें. श्री व सरस्वती या दोघींचें अतोनात वैमनस्य असें म्हणतात, त्याचा पूर्ण अनुभव कोणास घ्यावयाचा असल्यास त्या पर्णकुटींत त्यास तो उत्कृष्ट सांपडे. आर्य विष्णुशर्मा अत्यंत विद्वान्; वेदत्रयी त्यास मुखोद्गत असे. कर्मकांड अगदीं मूर्तिमंत त्याच्याच रूपानें पृथ्वीवर अवतरलें आहे कीं काय असें वाटे; नीतिशास्त्र तर त्या ब्राह्मणाइतकें कोणासच येत नसेल; धनुर्वेदांत तो

ब्राह्मण प्रति द्रोणाचार्य होता. त्यानें आपले शिष्य पढविण्याकरितां नाना प्रकारच्या शास्त्रांवर सुलभ ग्रंथ करून भूर्जपत्रांचे व ताडपत्रांचे भारेच्या भारे त्या आपल्या पर्णकुटींतच अडचणींत अडचण करून ठेवून दिले होते. त्याचा पिता त्याच्याच प्रमाणें अत्यंत विद्वान् परंतु दरिद्री होता. तो परलोकीं जाऊन सुमारें सात आठ वर्षें झालीं होतीं. आणि त्याच्या शोकानें अतिशय विव्हळ होऊन त्याच्या जननीनें आंथरूण धरलें, तें अद्यापि सोडलें नव्हतें, आणि आतां ती तें सोडील अशी आशा करण्यास जागा राहिली नव्हती. तिची सर्व शुश्रूषा या मातृभक्त पुत्रासच करावी लागे. अलीकडे ती फारच अस्वस्थ होत चालल्यानें त्याला तिच्या फार खस्ता खाव्या लागत. परंतु त्यानें कधीं कंटाळा केला नाहीं. यामुळें ती त्याला क्षणोक्षणीं आशीर्वाद देई, त्यांतच त्याचा संतोष होता. होतां होतां एके दिवशीं तिची प्रकृति फारच बिघडली, आणि दम्याचा जोर जास्त होऊन ऊर्ध्व लागला, व त्याच रात्रीं आपल्या मुलास "तुझा भाग्योदय लवकरच होईल, माझी सेवा केलीस ती व्यर्थ जाणार नाहीं" असा आशीर्वाद देऊन त्या वृद्ध माउलीनें देह ठेवला.

पुत्रास अतोनात वाईट वाटलें हें सांगावयास नकोच. परंतु त्याची समजूत करण्यास सुद्धां त्या वेळीं कोणी राहिलें नव्हतें. बिचाऱ्यास आपला आपणच शोक आवरून आपल्या जननीची उत्तरक्रिया वगैरे सर्व कांहीं उरकून घ्यावें लागलें. उत्तरक्रिया झाल्यानंतर आतां तक्षशिलेंतच डांबून राहाण्याचें त्या तेजस्वी ब्राह्मणास कांहींच कारण नव्हतें. उलट या यावनी अमलांतून अन्यत्र कोठें तरी जावें, जेथें आर्य राजाचें राज्य असेल व आपल्या विद्वत्तेची चीज होईल अशी राजसभा

गांठावी, आणि जमल्यास त्या राजास आपल्या धनुर्विद्यापारंगतत्वाचा व नीतिशास्त्रज्ञतेचा[1] उपयोग करून देऊन त्याचेकडून यवनराजाचा चांगला खरपूस समाचार घ्यावा, व पूर्ववत् सर्व आर्यमय करावें ही महत्वाकांक्षाही त्याचे मनांत सहजच आली. मनस्वी जे असतात त्यांना स्वदेश असा कोणता आहे ? ज्या देशांत ते जातील तो त्यांना स्वदेशाप्रमाणेच; त्यांतूनही स्वदेश हा यवनांचे ताब्यांत गेलेला. अशा स्थितींत केवळ आपली जन्मभूमि म्हणून तिला चिकटून राहाणें म्हणजे कुजलेल्या पदार्थांतील अळीप्रमाणें आपणही त्यांतच कुजून घेणें होय.....असा विचार करून आर्य विष्णुशर्मा यानें आपल्या पर्णकुटीचा निरोप घेतला. त्याला आपले ग्रंथ व पोथ्या सोडून जाणें मात्र फार जिवावर आलें. एका मित्राच्या घरीं ती सर्व भूर्जपत्री व ताडपत्री संपत्ति ठेवून त्यानें तक्षशिला नगरी सोडून मगध देशाकडे तोंड केलें.

## भाग २ रा

त्या वेळीं पाटलिपुत्र अथवा पुष्पपुरी हें शहर फारच भरभराटीस आलें होतें. उत्तर हिंदुस्थानांत आर्यांचें असें मोठें थोरलें राज्य तेवढेंच होतें. अर्थातच यवनी अमलाखालीं राहूं नये असें वाटून जे देशत्याग करीत, ते सर्व या पाटलिपुत्र नगरास जाऊन आपल्या कार्यकर्तृत्वाची व दैवाची परीक्षा पहात असत. मगध देशाचें राज्य त्या वेळीं फार विस्तृत होतें. शिकंदराच्या लोकांनीं गंगा उतरून एक दोन वेळां त्यावर

---

१ कौटिलीय अर्थशास्त्र या नांवानें प्रसिद्ध असलेला राजनीतिपर ग्रंथ या आर्य चाणक्यानेंच लिहिला आहे. याच्या कुटिल नीतीमुळें यास "कौटिल्य" असें नांव पुढें पडलें असें म्हणतात.

स्वारी करण्याचा यत्न केला होता. परंतु त्या प्रयत्नांत त्यांस मुळींच यश आलें नाहीं. पोरस राजाचा पराभव करून चढून गेलेल्या शिकंदराला तेथें एकदा चांगली थप्पड बसली व त्याच्या सैन्यानेंही पुढें जाण्याचें नाकारलें, तेव्हां नाइलाजास्तव त्याला परत जावें लागलें.

आज कित्येक दिवसांपासून पाटलिपुत्रांत महाप्रतापी असे नंदराजे राज्य करीत होते. विष्णुशर्मा पाटलिपुत्रांत आला तेव्हां तेथें धनानंद नांवाचा राजा राज्य करीत होता. यवनी अमलांतील विद्वान् लोक राजसभेंत येऊं लागले व मानमान्यता मिळवूं लागले त्यामुळें राजसभेंतील आश्रित पंडितांस अतोनात मत्सर उत्पन्न झाला. विष्णुशर्मा पंडिताच्या आधीं असे अनेक विद्वज्जन त्या सभेंत येऊन राहिले होते. प्रथम प्रथम ही गोष्ट राजास व सभापंडितांसही मोठी कौतुकास्पद वाटली; परंतु जसजशी राजाच्या दातृत्वाची कीर्ति सर्व भारतवर्षावर पसरत चालली, तसतसे विद्वान् याचक अधिकाधिक येऊं लागले, व त्यांत राजसभेंतील पंडितांपेक्षां विद्वान् लोक असल्यामुळें वादविवादांत सभापंडितांचा पराजय होऊन त्यांस खालीं मान घालून बसावें लागे. विष्णुशर्मा येऊन पोंचण्याचे आधीं बरेच दिवस या आश्रित पंडितांचा मत्सराग्नि धुमसत होता, व विष्णुशर्मा येण्याला, व त्या मत्सराग्नीचा भडका उडण्याला एकच गांठ पडली. विष्णुशर्म्यानें आधीं कोणाची शिफारस वगैरे न लावतां तडक राजसभा गांठली. माझ्या अंगीं जर कांहीं गुण असेल तर तो महाराजाला दिसेल, नाहीं तर नाहीं, असें म्हणून दरबार भरला असतां दुर्वास ऋषीप्रमाणें त्यानें एकदम प्रवेश केला, व राजास आशीर्वचन दिलें. आशीर्वचनपर श्लोक त्यानें स्वतःच रचलेले होते,

व ते धीर, गंभीर व अस्खलित अशा वाणीनें उच्चारल्या बरोबर सर्व सभा चकित होऊन त्याजकडे पाहूं लागली. त्याच्या एकंदर उद्धत पद्धतीवरून सभापंडितांनीं सहज ताडलें कीं हा कोणीतरी असामान्य बुद्धिमान्, तेजस्वी, व विद्वान् ब्राह्मण आहे, इतकेंच नव्हे तर जर का हा राजदरबारीं एकदा चिकटला तर आपल्या डोक्यावर बसल्याखेरीज कधींच राहणार नाहीं. तेव्हां यास क्षणभर सुद्धां येथें राहूं देतां उपयोगी नाहीं. असा विचार पांच चार पुढाऱ्यांच्या मनांत येऊन ते आपसांत कुजबुजूं लागले.

इकडे त्या अतिथि म्हणून आलेल्या ब्राह्मणाच्या धीर गंभीर वाणीनें राजा धनानंदाच्या मनावरही मोठी विलक्षण छाप बसली, व त्यानें अगदीं सहजगत्या त्यास उत्थापन देऊन आपणाजवळ आसन दिलें. हें तर सभापंडितांस फारच वैषम्य वाटलें. आजपर्यंत असा कोणाच पंडिताचा आदर राजानें आपण होऊन केला नव्हता. धनानंदानें त्या अतिथीस कोठून आलां वगैरे प्रश्न केले असतां त्यानें आपण तक्षशिला नगरीहून आलों वगैरे हकीकत सांगितली. ती ऐकून राजाश्रित पंडितांपैकीं एक उठून म्हणतो: "राजन्, आल्या अतिथीचें आपण स्वागत करून त्याचा आदर करीत आहां हें आपल्या दानशूरत्वाला योग्यच आहे. परंतु आदर काय किंवा दान काय, पात्रीं होत आहेत कीं नाहीं याचा विचार करून काय तें करावें, एवढीच आपल्या आश्रित जनांची विनंति आहे. यवनांचे राजे आजकाल आपल्या आर्य राज्यांवर तिलांजलि घेऊन बसले आहेत. तेव्हां ते कोणत्या मिषानें कोणास येथें पाठवितील याचा नेम नाहीं. पंजजनांचा (पंजाबचा) संहार अशा विश्वासघातकी लोकांच्या

घातक कृत्यांनींच झाला. नाहीं तर यवन राजे येऊन आर्यांस पराभूत करतील हें संभवनीय तरी होतें काय? तक्षशिला ही हल्लीं यवनांच्या ताब्यांत आहे. आणि त्याच नगरींतून हे येथें आले आहेत. कालच त्या नगरींतून आणखी एक गृहस्थ यवनांच्या जुलमास कंटाळून येथें आले, त्यांच्या सांगण्यांत असें आलें कीं, यवनराजा कोणा एका विद्वान् ब्राह्मणास इकडे पाठवून येथील भेद काढण्याच्या विचारांत आहे. या गोष्टीचा विचार करून आदरातिथ्य करावयाचें तें करावें. हे कोणाच्या ओळखीचे नाहींत, यांना कोणी ओळखीत नाहीं. तेव्हां यवन राजानें पाठविलेले हेर हेच नव्हेत म्हणून तरी कशावरून? आहेतच असें आमचें म्हणणें नाहीं. पण यदाकदाचित् असले, तर सर्पास दुग्धदान केल्याप्रमाणें पश्चात्ताप होण्याचा प्रसंग न यावा, म्हणून इतक्या निर्भीडपणें विनंति केली आहे."

धनानंद हा कीर्तिलोलुप व दानशूर खरा, पण थोडा चंचल व संशयी होता. त्यांतून शिकंदर बादशहानें पंजाबांत जो प्रळय मांडला होता, त्यामुळें त्यास वरील भाषणांत तथ्य आहे असें वाटलें. तो एकदम त्या ब्राह्मणास म्हणतो: "माझ्या सभापंडितांनीं आतांच सुचविलें तें अगदीं अक्षरशः मला खरें वाटतें. आपण आंत येण्याबरोबर मी आपला आदर केला. परंतु आपली येथें कोणाची ओळख आहे असें दाखविल्याखेरीज आपण त्या स्थानीं बसून राहावें हें आपल्यालाही उचित वाटणार नाहीं. हें राजनीतीला सोडून होणार आहे. तरी कृपा करून या पाटलिपुत्रांत आपली खातरी देईल असा कोणीही असल्यास सांगा........."

तें भाषण ऐकतांच या कोपिष्ट ब्राह्मणाच्या सर्वांगाची अगदीं

लाही लाही झाली. आणि तो एकदम राजा धनानंदास म्हणाला: “राजा, हें काय भाषण करतो आहेस ? यवनांच्या अमलांत राहण्याला त्रासून, कोणत्या तरी आर्य राज्यांत जावयाचें, इतकेंच नव्हे तर आपल्या नीतिज्ञानाचा व धनुर्वेदाचा पूर्ण उपयोग करून घेईल असा राजा भेटला तर त्यास तो उपयोग होईल असें करून त्याचेकडून यवनांचा व पर्वतेशा सारख्या लुब्ध्यांचा नाश करावयाचा; जिकडे तिकडे पुन: आर्य राज्याचा विस्तार करावयाचा, असा उद्देश धरून व मार्गांत तुझी कीर्ति ऐकून येथें आलों. यवनांचा द्वेष हें तर माझें ब्रीद आणि त्यांचाच मी हेर होऊन येईन ?....”

हें त्याचें भाषण इतक्या उद्धटपणानें झालें, व त्याचा कोप सर्वांस इतका खरा भासला, कीं, राजा आतां उलट त्याची क्षमा मागून त्यास आपल्या सभेंत ठेवतो, असें सभापंडितांस वाटलें. परंतु हें अगदीं इष्ट नाहीं असें मनांत येऊन त्यांचा अग्रेसर मध्येंच म्हणतो, “महाराज, जो हेर म्हणून येईल तो काय आपण यवनांचा हेर आहों, आपलें त्यांच्याविषयीं फार प्रेम आहे असें सांगत येईल ? यवनांच्या विषयीं मला मोठा तिटकारा आहे, त्यांचा द्वेष हेंच माझें ब्रीद असेंच तो म्हणेल. परंतु दूरदर्शी जनांनीं त्यामुळें फसतां कामा नये. आतां यांचा अपमान झाला व त्यामुळें यांना वाईट वाटलें, तरी पत्करलें; पण राज्य नष्ट झालें म्हणजे होणारा पश्चात्ताप किती भयंकर ! महाराज, आम्ही आपलें अन्न खात आहों. तर आपल्यावर संकट येत आहे असें दिसतांच आपणास जागृत करणें हें आमचें कर्तव्य आहे. मग त्या संकटापासून आपलें स्वत:चें व आम्हांसारख्या प्रजाजनांचें संरक्षण करण्याला आपण सर्वथा समर्थ आहांतच.”

या शेवटल्या बोलण्यानें धनानंद विशेषच खुलला; आणि त्याचा त्या ब्राह्मणाविषयींचा संशय विशेषच वाढून तो म्हणतो: " ब्रह्मन्, दूरदर्शीपणा हा कांहीं कधींही अस्थानीं नसतो. तर आपण अमुक अमुक अशी खात्री मला पटेपर्यंत सभेंतून जावें हें चांगलें. तशी खात्री पटली म्हणजे आपल्या विद्वत्तेप्रमाणें आपला आदर व संभावना होतील. तोंपर्यंत आपण हें आसन सोडावें." तें ऐकतांच त्या दुर्वास ऋषीप्रमाणें कोपिष्ट ब्राह्मणाच्या तळपायाची आग मस्तकास गेली, व त्यानें तट्कन उठून जातां जातां अशी प्रतिज्ञा केली: " मी खरा ब्राह्मण असेन तर हा नंदवंश समूळ नष्ट करून टाकून त्याच्या जागीं ज्यास मी आपल्या हातीं धरीन त्यास बसवीन, व त्याच्याच हातून यवनांचें पारिपत्य करवीन !" इतकें बोलून त्यानें आपली शेंडी मोकळी सोडली, व केलेली प्रतिज्ञा पूर्ण करीपर्यंत केंसांस हात म्हणून लावणार नाहीं, असाही त्यानें निश्चय केला. मनाजोगी दक्षणा मिळाली नाहीं, व राजसभेंत जें आपलें प्रस्थ माजेल असें वाटत होतें तें माजण्याची आशा नाहीं, म्हणून निराश होऊन संतापाच्या भरांत कांहीं तरी बडबड करीत निघून गेलेल्या ब्राह्मणाच्या बडबडीकडे काय लक्ष्य द्यावयाचें आहे, असें म्हणून राजदरबारीं त्याच्या बोलण्याकडे कोणीं लक्ष्य दिलें नाहीं. त्याच्या वल्गनांचें सर्वांस हंसूं मात्र आलें.

## भाग ३ रा

इकडे तो तेजस्वी ब्राह्मण या उप्पर या पाटलिपुत्रांत पाणी सुद्धां पिण्यास राहावयाचें नाहीं, असा निश्चय करून नगराच्या बाहेर

पडला. तो बऱ्याच अंतरावर गेला, तों सूर्य अस्तास जाण्याच्या बेतांत होता. पलीकडे कांहीं गवळ्यांचीं मुलें आपापसांत खेळत होतीं.

गुराख्यांच्या मुलांचा खेळ चालला होता तोही मोठा कौतुक वाटण्याजोगा होता. सर्व मुलें एकत्र होऊन त्यांनीं असा बाहाणा चालविला होता कीं, आपल्या प्रांतावर यवन चालून येत असून आपण त्यांचा अगदीं फन्ना उडविणार आहों. कांहीं मुलें यवन झालीं होतीं व कांहीं आर्य झालीं होतीं. त्यांत एक पंधरा वर्षांचा सुंदर मुलगा आर्यांचा राजा झाला असून आपल्याकडून मोठमोठ्यानें आज्ञा करीत होता, व आपल्या सैनिकांस त्याप्रमाणें वागण्यास लावीत होता. त्याचें तें एकंदर चारित्र्य पाहून या ब्राह्मणाचें चित्त अतिशय गहिंवरलें. ज्या मुलाचें एवढ्या लहानशा वयापासून येवढें लोकोत्तर चारित्र्य तो मुलगा गुराख्याचा खचित नव्हे असा त्यानें आपल्या मनाशीं पक्का निर्धार केला, व कसेंही करून या मुलाची पूर्वपीठिका शोधून काढावयाची, असा त्यानें निश्चय केला.

मुलांचा खेळ पुष्कळ वेळ चालला होता. तो चालला असतां ब्राह्मणास त्या मुलाची पुष्कळ प्रकारें परीक्षा करतां आली. शेवटीं मुलें दमून एकत्र झालीं, तेव्हां तो ब्राह्मण त्यांचेजवळ गेला, व त्या मुलास म्हणाला: “ मुला, मला तुझा हात एक वार पहावा अशी इच्छा आहे. तो मला पाहूं दे. ” मुलानें ब्राह्मणास अगदीं नम्रपणें नमस्कार करून आपला उजवा हात त्याचे पुढें केला. तो हात पाहातांक्षणींच ब्राह्मणास अत्यंत आनंद झाला. त्यावर चक्रवर्ती राजाचीं सर्व लक्षणें अगदीं स्पष्ट दिसत होतीं. अशा सुलक्षणांनीं युक्त असा मुलगा गुराख्याच्या पोटीं यावा, निदान गुराख्याकडून पाळला जावा, हें तरी मोठें

विलक्षणच, असें त्यास वाटलें; व त्याचा हात व मुख हीं त्यानें *सामुद्रिक दृष्टीनें नीट परीक्षून पाहिलीं. जों जों तीं सुलक्षणें त्याच्या दृष्टीस पडूं लागलीं, तों तों त्याला अशी दृढ इच्छा होऊं लागली कीं, आपण या मुलाच्या आईबापाकडे जाऊन याच्या जन्मासंबंधीं चौकशी करावी, आणि त्यांच्यापासून या मुलास मागून घ्यावें. त्या दृष्टीनें मुलासही त्यानें विचारलें कीं, "तूं मजबरोबर येतोस का? तूं आलास तर तुला मी सर्व विद्या शिकवीन; शस्त्रास्त्रविद्या व धनुर्वेद हीं सुद्धां तुला शिकवीन." शस्त्रांचें व धनुष्याचें नांव निघतांच मुलास पराकाष्ठेचा आनंद झाला आणि त्यानें त्यास म्हटलें, "महाराज, मला आपण या विद्या शिकवाल तर मी आपला दासानुदास होईन!" इतकें बोलणें झाल्यावर थोड्या वेळानें मुलांनीं आपापलीं गुरें एकत्र जमा केलीं, व सायंकाळ झाला म्हणून तीं घरोघर जाऊं लागलीं. ब्राह्मणही त्या गुराख्याचे मुलाबरोबर त्याचे घरीं गेला. त्या मुलाचा बाप मोठा सज्जन होता, व मुलाविषयीं तर त्यास अतोनात अभिमान असे. आपल्या मुलाची विलक्षण बुद्धि पाहून ब्राह्मण मुद्दाम त्याची चौकशी करण्याकरितां त्याजबरोबर आला, हें पाहून तर त्यास विशेषच आनंद झाला. रात्रीं तेथेंच वस्ती करण्याविषयीं त्यानें त्यास विनंति केली. गाईंच्या धारा वगैरे काढल्यानंतर ब्राह्मणास त्यानें दुग्धप्राशन करण्याबद्दल आग्रह केला, व ब्राह्मणानें त्याच्या आतिथ्याचा स्वीकार करून रात्रौ तेथेंच राहाण्याचा विचार केला.

दुग्धप्राशन वगैरे झाल्यानंतर त्या गुराख्यास आपले जवळ बसवून

---

* चेहरा व हात यांवरील चिन्हांवरून मनुष्याचें भविष्य वर्तविण्याचें जें शास्त्र आहे, त्यास सामुद्रिक शास्त्र असें नांव आहे.

घेऊन ब्राह्मण मोठ्या युक्तीनें ह्मणतो: “ हे वृद्ध गोपा, हा तुझा मुलगा विलक्षण बुद्धिवान् व तेजस्वी आहे. याच्या संबंधानें तुला कांहीं विचारावें असें मला वाटतें आहे. तुझी जर कांहीं हरकत नसली, आणि तुला राग येणार नसला, तर विचारतों.” ब्राह्मण आपल्यास काय प्रश्न विचारणार हें जणुं काय समजूनच गुराखी हंसला, व त्यास म्हणतो, “ महाराज, आपण ब्राह्मण; आपण एखादा प्रश्न विचारला, तर त्याचा राग काय म्हणून मानावा ? जें काय आपणास विचारावें असें वाटत असेल तें अगदीं मोकळ्या मनानें विचारा. मीही आपणास सरळ उत्तर देईन.”

तें उत्तर ऐकून ब्राह्मणास बरें वाटलें, व तो लागलीच म्हणतो: “ इतकें आश्वासन तूं देतोस, तर ठीक आहे. मीही तुला अगदीं निर्भीडपणें विचारतों. हा मुलगा तूं आपला म्हणतोस, पण हा तुझ्या वंशांतला दिसत नाहीं. जर याची आणखी कांहीं निराळी हकीकत असली, तर मला सांग. माझ्या तर्काप्रमाणेंच जर कांहीं निराळी हकीकत असली, तर तूं पक्कें समज कीं, हा मुलगा पुढें मोठा भाग्यशाली निवणार आहे; हा सार्वभौम राजा होईल !”

ब्राह्मणाचें हें बोलणें ऐकतांच गुराखी थोडा सचिंत झाला. नंतर लागलीच तो ब्राह्मणास म्हणतो: “ महाराज, आपल्या पायापाशीं खोटें बोलावयाचें नाहीं. हा मुलगा माझा नव्हे. आम्हां गुराख्यांच्या पोटीं असलें रत्न कोठून निपजावें ? हा मुलगा अगदीं तान्हेपणीं मला एके चांदण्या रात्रीं रानांत झाडाखालीं टाकलेला असा सांपडला. तो रडत होता. त्याच्या जवळ कोणी म्हटल्या कोणी सुद्धां नव्हतें. त्यास एखाद्या मांसाहारी श्वापदानें खाऊन कसें टाकलें नाहीं

याचेंच आम्हांला आश्चर्य वाटलें. आकाशांत भगवान् चंद्रमा जणुं काय त्यास धीर देऊन अगदीं निर्भयपणें राहण्यास सांगत होता. त्या मुलाला मीं लागलीच उचललें व आपल्या घरीं आणलें. त्याच्या मातापितरांचा शोध लागावा म्हणून मी पुष्कळ शोध केला, परंतु कांहीं तपास लागला नाहीं. या मुलाच्या अंगावर वस्त्रें विशेष नव्हतीं, आणि अंगावर बाळलेणें होतें तें एक रक्षाबंधन मात्र. तें मी नीट जपून ठेवलें आहे. मुलगा कोणाचा काय, याची कांहीं सुद्धां माहिती लागली नाहीं. मी आपलाच म्हणून बाळगून त्याचें संवर्धन चालविलें आहे."

हें ऐकून ब्राह्मण कांहीं वेळ स्वस्थ बसला, व नंतर म्हणतो: "तें रक्षाबंधन कोठें आहे तें आण पाहूं!" गुराख्यानें तें रक्षाबंधन साता चिंध्यांत पुरचुंड्या करून साता डेऱ्यांत लपवून ठेवलें होतें, तें मोठ्या सायासानें काढून ब्राह्मणास दाखविलें. पलीकडे दिवा होता त्याजवळ जाऊन ब्राह्मणानें तें रक्षाबंधन नीट न्याहाळून पाहिलें, तों त्यावरील ठसा पाहून त्यास मोठें आश्चर्य वाटलें. व एकदम तो त्या गुराख्यास म्हणतो, "बाबारे, हा मुलगा तूं माझ्या स्वाधीन कर. निदान कांहीं काळपर्यंत तरी माझ्या स्वाधीन कर. तो पुढें मोठें भाग्य काढील, यांत शंका नाहीं. मात्र त्याला कोणी तरी हाताशीं धरलें पाहिजे. मला सर्व विद्या येतात. आणखी माझें मन या मुलावर बसलें आहे. तर तूं याला माझ्या स्वाधीन कर." तें ब्राह्मणाचें भाषण ऐकून गोप फार सचिंत दिसला. तेव्हां ब्राह्मण त्यास पुढें म्हणतो: "दशरथ राजानें रामचंद्राला विश्वामित्राच्या स्वाधीन केलें, आणि विश्वामित्रानें त्या रामास सर्व विद्यांचें शिक्षण दिलें, त्याप्रमाणें तुझ्या या पुत्रास शिक्षण देऊन मी तयार करतों. तुला काळजी नको. हें राजबीज

आहे." तें मागणें ऐकतांच गुराख्यास अतोनात वाईट वाटलें व आपण इतके दिवस प्रेमानें वाढविलेला हा मुलगा ब्राह्मण मागतो त्याला कसा द्यावा, अशा विवंचनेंत तो पडला. ब्राह्मणास काय उत्तर द्यावें हें त्यास सुचेना. परंतु याचें उत्तर त्या मुलानेंच त्यास दिलें. या ब्राह्मणाचें व त्याच्या बापाचें भाषण प्रथम सुरू झालें तेव्हां तो मुलगा ऐकत नव्हता. परंतु ब्राह्मणानें या मुलाला माझ्या स्वाधीन कर असें म्हटलें तेव्हां तें त्यास आवडून मुलगा धांवतच आला व बापास म्हणाला: "बाबा, मला तुम्ही यांच्या स्वाधीन करा. मुळीं सुद्धां काळजी करूं नका. तुम्ही नेहमीं म्हणत असतां कीं, त्या यवनांचा कोणी उच्छेद करील तर पाहिजे; मग बाबा, मीच तो उच्छेद करूं लागलों तर काय वाईट? बाबा, तुमच्या आशीर्वादानें आणि या ऋषिमहाराजांच्या कृपेनें मी खरोखर पराक्रमी होईन. त्या यवनांनीं घेतलेला सगळा मुलूख मी त्यांच्यापासून परत घेईन व एक मोठें थोरलें स्वतंत्र राज्य स्थापन करीन. मग बाबा, तुमच्या नशीबाचीं हीं गुरें जाऊन तुम्ही स्वस्थ बसत जाल. खरोखर मी यवनांना मारून मगधदेशच्या राज्यासारखें इकडे स्वतंत्र राज्य स्थापीन!"

मगध देशाचें व त्याच्या राज्याचें नांव निघतांच ब्राह्मणाचा इतका वेळ अगदीं गुप्त असलेला संताप एकदम उद्दीप्त झाला, व तो त्यास म्हणतो: "अरे मुला, मगध देशाच्या राज्यासारखें राज्य कां म्हणतोस? तुला त्याही राज्याच्या गादीवर बसवून चक्रवर्ती करीन!" *

* हा विष्णुशर्म्यानें (चाणक्यानें) हातीं धरलेला बालकच प्रसिद्ध चंद्रगुप्त मौर्य या नांवानें पुढें मगधदेशाचा सम्राट् झाला. सम्राट् धनानंदाचा मुरादेवी-पासून झालेला हा पुत्र अरण्यांत अरक्षित असा कसा टाकला गेला, व पुढें चाणक्यानें नानाप्रकारच्या कारस्थानांनीं त्याला मगधाचा सम्राट् कसें बनविलें ही अत्यंत चित्तवेधक कथा वाचकांनीं मूळ पुस्तकांतूनच वाचली पाहिजे, हें उघड आहे.

### प्रश्न

( १ ) विष्णुशर्म्यानें तक्षशिला सोडीपर्यंतची हकीकत थोडक्यांत सांगा.

( २ ) राजसभेंतील प्रसंगाचें थोडक्यांत वर्णन द्या.

( ३ ) प्रस्तुत कथेवरून चाणक्याच्या स्वभावांतील कोणकोणते विशेष आपल्या दृष्टीस पडतात ?

( ४ ) राजसभेंतील अपमानामुळें चाणक्यानें केलेली कठोर प्रतिज्ञा योग्य होती असें तुम्हांस वाटतें काय ? या प्रश्नाचें उत्तर कारणांसहित द्या.

---

## १३

# अनुकरण

अनुकरण म्हणजे काय, हें बहुधा कोणालाही सांगायला नकोच. दुसऱ्याचें पाहून तसें करणें, याचें नांव अनुकरण. हें अनुकरण दोन प्रकारचें आहे, एक शारीरिक व दुसरें मानसिक. शारीरिक अनुकरण म्हणजे दुसऱ्याचा हुबेहूब कित्ता उचलून, त्याच्याप्रमाणें बोलणें, चालणें, पेहराव करणें वगैरे; आणि मानसिक अनुकरण म्हणजे दुसऱ्याची विचारपद्धति उचलणें, त्याच्या मतांचा अनुवाद करणें इत्यादिक होय.

प्रस्तुत कालीं वरील विषयाचा विचार करण्याचें किती अगत्य आहे, हें कोणाच्याही सहज लक्षांत येण्यासारखें आहे. तें असें कीं, आमचे राज्यकर्ते आम्हांपासून आचार, विचार, विद्या वगैरे सर्व गोष्टींत अगदीं भिन्न आहेत; तर त्यांचें अनुकरण आम्हीं करावें कीं

नाहीं, करणें झालें तर कोणत्या गोष्टींत, कितपत करावें वगैरे गोष्टींचा विचार करणें या कालीं अत्यंत महत्वाचें आहे.

आतां अनुकरणाविषयीं सामान्य विचार केला असतां, ही गोष्ट कोणासही स्पष्ट दिसणार आहे कीं, ही प्रवृत्ति मनुष्यस्वभावासच खिळलेली आहे. यावरूनच ‘मनुष्य हा अनुकरणशील प्राणी आहे,’ अशी एका तत्त्ववेत्त्यानें ‘मनुष्य’ या शब्दाची व्याख्या केली आहे. मनुष्य जें बरेंवाईट आचरण करितो, त्याच्या अंगीं जे गुणावगुण दृष्टीस पडतात, तें सर्व अनुकरणाचें फळ आहे असें सामान्य अनुभवावरूनही कळतें. संस्कारविशेषाच्या योगानें पुढें कांहीं वेगळा प्रकार झाला तर न जाणों; पण जोंपर्यंत तो झाला नाहीं, तोंपर्यंत मनुष्याचे धर्म हे सर्व साहजिक अनुकरणानें जसे बनवावे तसेच बनतील, हें उघड आहे.

आतां पाश्चात्यांपासून आम्हांस ज्या अनेक गोष्टी घेण्यासारख्या आहेत, व ज्यांपासून वरील प्रवृत्ति आम्हांस हितावह होण्यासारखी आहे, त्या सांगतों.

पाश्चात्य लोकांपासून, आणि त्यांतून विशेषतः इंग्रज लोकांपासून कित्ता घेण्यासारखी सर्वांत मोठी गोष्ट म्हटली म्हणजे **व्यवस्थितपणा** ही होय. कोणत्याही गोष्टींत इंग्रज लोकांचें वर्तन पाहा; राज्यकारभार, व्यापार, सामान्य व्यवहार, चोहोंकडे जसा काय घड्याळाचा ठोका ! अमक्या अमक्या वेळेस अमकें अमकें काम व्हावयाचें म्हणजे त्या वेळेस तें झालेंच म्हणून समजावें; त्यांत कधीं अंतर पडावयाचें नाहीं ! सृष्टीचे व्यापार जसे आज अनादिसिद्ध सुयंत्रपणें चालले आहेत, तसाच प्रकार आमच्या राज्यकर्त्यांच्या व्यवहारांचा होय, असें म्हणावयास चिंता नाहीं.

आतां तिकडून आमच्या मंडळीकडे जों वळावें, तों सगळा प्रकार याच्या उलटा. मोठमोठ्या संस्थानांतील कारभारापासून तो साधारण जेवणावळीच्या कामापर्यंत सारा एक प्रकार. तो काय ?—तर सुस्ती, अंदाधुंदी, हलगरजीपणा, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं ! हा सर्व गैदीपणा आमच्या इतका अंगवळणीं पडून गेला आहे कीं, त्याचें दोषरूपत्वही आम्हांस भासेनासें झाले आहे. जुन्या लोकांच्या तोंडून मराठी दरबाराची किंवा मोंगलाईची तारीफ कधीं कधीं ऐकूं येते. ती काय ?—तर 'अंदाधुंद कारभार !' 'अलीजाही कारखाना !' पण ही अलीजाही आम्हांस पुरती भोंवून तिनें आम्हांस अगदीं अन्नास मोताद करून टाकिलें असतांही, अद्याप आमचे डोळे उघडले आहेत असें नाहीं. आमचा श्रीमंतीचा धूर व बादशाही खाका अजून आहे तो आहेच !

दुसरी गोष्ट जेवणाची घ्या. या संबंधाचा अनुभव नेहमीं सर्वांस आहेच. बोलावणेकऱ्याला ताकीद कीं, सर्वांस दहा वाजतांचें आमंत्रण कर. लोक नेहमींचे घटलेलेच. त्यांनीं मुळींच धरून बारा वाजतां किंवा एक वाजतां बाहेर पडावयाचें. मग तेथें जाऊन चार घटका भोजनप्रतीक्षा झाल्यावर, उपरान्तिक अन्नाचा लाभ व्हावयाचा ! त्यांतून एखादे बडे गृहस्थ यावयाचे असले, किंवा कांहीं मानापानाची मंडळी यावयाची असली, म्हणजे तर कांहीं विचारूंच नये; मग बुभुक्षु जनांनीं बिछायतीवर एकेक झोंप काढून घ्यावी हा उत्तम मार्ग ! आणि या मार्गास कित्येक अनुसरतात देखील ! कां कीं, आमच्यांत आढ्यतेचें व श्रीमंतीचें विशेष लक्षण म्हटलें म्हणजे हें कीं, निदान दोन बोलावणीं तरी घेतल्याखेरीज जागचें

हालूंच नये. आणि त्यांतून बादशाही मिजास म्हटली म्हणजे ही कीं, दोन बोलावणीं परत जाऊन तिसऱ्या खेपेस सांगावयाचें कीं, कोणी येत नाहीं हो ! ! खरोखर पाहतां, हा केवढा मूर्खपणा आहे बरें ! ज्या बेट्यांना वेळेची किंमत कळत नाहीं, आपल्या एकट्याकरितां शेंकडों मंडळीस ताटकळत ठेवण्याची ज्यांस शरम वाटत नाहीं, व पोरकटपणाची आढ्यता मिरवून आपलें हंसें करून घेतल्याची ज्यांस पर्वा नाहीं, त्यांस काय म्हणावें ! असो. परमेश्वर करो, आणि असल्या जडशिरोमणींच्या डोक्यांत थोडी तरी समजूत शिरो ! या प्रार्थनेखेरीज त्यांस सुधारण्याचा दुसरा कांहीं मार्ग आम्हांस दिसत नाहीं !

या संबंधानें यूरोपियन लोकांचे रिवाज किती उत्तम आहेत. निमंत्रण व्हावयाचें, तें नुसत्या एका चिठ्ठींत ! पांच वाजतांचें बोलावणें असेल, तर पावणेपांच वाजतां कोणाला कांहीं गडबडसुद्धां दिसावयाची नाहीं; पांचांच्या ठोक्याला पहावें तों तमाम मंडळी हजर ! कोणास यावयाचें नसलें, कीं त्याची माफीची चिठ्ठी हजर व्हावयाची ! या उत्तम व्यवस्थेमुळें सर्वांस किती सोईस्कर होतें बरें ! हीच गोष्ट सभादिकांची. फार करून पांच मिनिटेंही त्यांचीं कधीं आगेंमागें व्हावयाचीं नाहींत. सारें काम एखाद्या यंत्राप्रमाणें चालावयाचें ! पण आमचें यंत्र एकदां कधीं काळीं बिघडलें आहे, तें आजमित्तीपर्यंत ! तें परमेश्वरसत्तेनें कधीं ताळ्यावर येईल तें येवो ! येईल तो सुदिन, इतकें बरीक खरें !

इंग्रज लोकांपासून कित्ता घेण्यासारखी दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे **साहस** होय. हा गुण ज्या मानानें राष्ट्रांत असतो, त्या मानानेंच

त्याचा उत्कर्ष किंवा अपकर्ष सामान्यतः आढळतो. शरीराचें चालक जसें मन, त्याप्रमाणेंच मनाचें चालक साहस हें होय. साहसजन्य उत्साह ज्याच्या मनाला नाहीं, तो केवढाही बुद्धिमान् असला, तरी सुस्तींत पडलेल्या अजगराप्रमाणें किंवा मेलेल्या हत्तीप्रमाणेंच तो होय, यांत संशय नाहीं. त्याचा मोठेपणा म्हणजे अवजडपणा; त्यापासून उपयोग म्हणून कांहींएक नाहीं! इंग्रज लोक केवढे साहसप्रिय आहेत, हें येथें सविस्तर सांगायला पाहिजे असें नाहीं. त्यांच्या उलाढालीं-पासून व उपद्व्यापापासून सुटलें असें या जगांत कांहीं आहे काय?

आतां इंग्रज लोकांच्या **जात्यभिमानाकडे** वळूं. कोणत्याही राष्ट्रास नीच स्थितींतून उच्च स्थितीस येण्यास जे गुण अवश्य आहेत, त्यांपैकीं जात्यभिमान हा एक होय. ज्या देशाच्या लोकांत हा गुण चांगलासा वसत नाहीं, त्या देशाच्या हातून मोठीं कामें होण्याचा संशयच आहे. ज्याप्रमाणें कार्पासतंतु निरनिराळ्या मौक्तिकफलांत प्रवेश करून, त्यांचा एक हार बनवून सोडतो, त्याप्रमाणें जात्यभि-मानाचा बंध एका जातीच्या अनेक व्यक्तींस एकत्र करून त्यांस प्रेमबद्ध करून टाकितो. हा अभिमानाग्नि लोकांच्या अंतःकरणांत प्रज्वलित झाला, म्हणजे त्यापुढें कोणाचें कांहीं चालत नाहीं. एखाद्या वेळेस हा विकोपास जाण्याचा संभव आहे हें खरें; व तसा गेला तर त्यापासून फार वाईट परिणाम होतात, हेंही आम्ही कबूल करितों. परंतु बाह्य जगांत अशी कोणती वस्तु आहे, किंवा अंतः-करणांत असा कोणता मनोविकार आहे कीं, त्याचा दुरुपयोग केला असतां तो घातुक होत नाहीं? बचनाग-सोमलादि मी मी म्हणविणारीं जालीम विषें, सदुपयोग केला असतां गुणावह होतात, व संजीवनी,

सुवर्णमालिनी, किंवा मौक्तिकरस यांसारखीं राजमान्य रामबाण औषधेंसुद्धां अज्ञानामुळें व दुरुपयोगामुळें प्राणहारक होतात, ही गोष्ट चांगली अनुभवसिद्ध आहे. तथापि कोणत्याही मनोवृत्तीस किंवा बाह्य वस्तूस चांगली वाईट म्हणावयाचें, तें तिच्या सामान्य स्वरूपावरून होय. मदमत्त झालेल्या द्विपेंद्रानें एखादे वेळीं क्वचित् प्राणनाश केला, म्हणून ज्याप्रमाणें ऐरावती लक्ष्मीचा अनादर करणें योग्य नाहीं, त्याप्रमाणेंच कांहीं प्रसंगीं प्रकुपित होणाऱ्या जात्यभिमानापासून जरी घोर अनर्थ घडतात हें खरें असलें, तरी त्यासाठीं या अनुपमेय गुणाचा तिटकारा करणें बरोबर नाहीं. जात्यभिमानापासून वाईट परिणाम होण्याचें कारण, कधीं कधीं धर्माभिमानाशीं त्याची घट्ट गट्टी असते, हें होय. हे दोघे बंधु स्वभावरीत्या एकत्र झाले, म्हणजे सर्व जगास भारी होऊन बसतात. या दोघांपैकीं मागून निर्देशिलेल्या गुणाची प्रकृति विशेष तऱ्हेवाईक, लहरी आणि जलाल आहे. यामुळें या वडील बंधुराजांनीं एखादे वेळेस उग्ररूप धारण केलें, म्हणजे छोटे बंधु त्यांच्यापुढें हूं कीं चूं करीत नाहींत. केवळ ज्येष्ठांच्या तंत्रानें ते आपलें आचरण ठेवितात. ही गोष्ट नीट लक्षांत वागवली असतां, व एकाचा दुसऱ्यावर वरचष्मा न होऊं देण्याची खबरदारी घेतली असतां जात्यभिमान हा गुण कांहीं वाईट नाहीं; एवढेंच नाहीं, तर स्वोन्नत्यर्थ व देशोन्नत्यर्थ त्याची आवश्यकता आहे.

आतां हें सर्वांस श्रुतच आहे कीं, हा जात्यभिमानाचा गुण इंग्रज लोकांत पूर्वीपासून पूर्णपणें वसत आहे. पण आमची तऱ्हा पहा! एकाचें तोंड पूर्वेकडे तर दुसऱ्याचें पश्चिमेकडे, आणि कोणाची दाद

कोणास नाहीं ! आम्ही हिंदुलोक मूळचे चतुर्वर्णाश्रमी असतां कालांतरानें आम्हांत किती तरी जाति उद्भवल्या आणि पुढें आणखी किती उद्भवणार आहेत, परमेश्वर जाणे ! या जात्यनंतत्वामुळें आमच्या जात्यभिमानाचे तुकडे तुकडे झाले, आणि हीच गोष्ट पुढें हरएक प्रकारें आमच्या नाशास आणि दुर्दैवास कारण झाली हें उघड आहे. यास्तव ही गोष्ट निरंतर लक्षांत ठेवून या जात्यभिमानाच्या बाबतींत इंग्लिश लोकांचें अनुकरण करणें आपणांस किती योग्य आहे, याचा वाचकांनीं विचार करावा म्हणजे झालें.

पाश्चात्य लोकांपासून आमच्या लोकांनीं घेण्यासारखी आणखी एक मोठी गोष्ट **एकी** होय. एकी म्हणजे अवघ्या राष्ट्राची जूट. ही जूट आमच्या देशांत अनेक कारणांनीं कमी असल्यामुळें, आमच्यांत अवदशा शिरण्यास मार्ग झाला. वरील गोष्ट इतिहासाच्या द्वारें हवी तशी सिद्ध करून देतां येईल, व प्रत्यक्ष अनुभवही तसाच आहे, हें कोणास ठाऊक नाहीं असें नाहीं. पण हें सर्व आम्हांला काय होय ? आमचे अवगुण आम्हांला सुटतील तेव्हां पुढें सर्व गोष्टी ! या अवगुणांचा राजा म्हटला म्हणजे ऐक्याभाव हा होय. त्यांतून विशेष लज्जास्पद गोष्ट ही कीं, एक वेळ अज्ञान व गांवढळ लोकांची जूट बऱ्याच प्रकारें बनवितां येईल; पण चार अक्कलवान् व शहाणेसुर्ते जमले कीं, चौघांचीं तोंडें चार दिशांस झालींच ! कुणब्यामाळ्यांत पाहिजे तसा कट करितां येईल; पण 'वर्णानां ब्राह्मणो गुरुः' असें म्हणविणाऱ्यांत एकी करतांना बिचारा ब्रह्मदेवही थकेल असें वाटतें. सारेच बृहस्पति पडले, मग कोणीं कोणाचें ऐकावें ? इंग्रजींत एक म्हण आहे कीं, "बबर्जी फाजील झाले कीं सैंपाक बिघडलाच !" हिचा येथें

चांगला अनुभव येतो. खरोखर हाच प्रकार आम्हांस भोंवतो आहे. तर इंग्रज लोकांकडे पाहून त्यांच्या आंगचा हा जुटीचा गुण ज्या दिवशीं आमच्या लोकांच्या हृदयांत बिंबेल, तोच सुदिन समजला पाहिजे.

आतां आणखी एकाच गुणाविषयीं विवरण करावयाचें. हा गुण म्हणजे **मानसिक धैर्य,**—ज्यास इंग्रजींत ‘ मॉरल करेज ’ म्हणतात तो—होय. ‘ शारीर धैर्य ’ म्हणजे काय, हें कोणास सांगावयास नकोच. अंगधिटाईनें शत्रूवर चालून जाणें, संकटसमयीं न डगमगणें इत्यादि व्यापार ज्या गुणाचे आविर्भाव होत, त्यास ‘ शारीर धैर्य ’ नांव आहे. आतां मानसिक धैर्य म्हणजे काय, हें सांगतों. स्वतंत्रतेनें विचार करणें, व तसा विचार करून जें तथ्य वाटेल, तें बिनदिक्कत बोलून दाखविणें, आणि बोलण्याप्रमाणें आचरण ठेवणें, या तीन गोष्टींस वरील नांव दिलें आहे. खरा शूर आहे, तो जसा शत्रूंच्या संख्येची पर्वा न करितां त्यांच्यावर बेलाशक तुटून पडतो व धारातीर्थीं पतन पावण्याचा उत्साह धरतो, त्याचप्रमाणें मानसिक धैर्य ज्याच्या ठायीं खरें वास करतें, तो पुरुषही प्रतिपक्ष्याच्या आक्षेपांस किंवा निर्भर्त्सनेस खुशाल एकीकडे गुंडाळून ठेवितो, आणि आपल्या मतांचें निःशंकपणें प्रतिपादन करून त्यांप्रमाणें आचरणही करावयास चुकत नाहीं.

हा विषय बराच लांबला आहे, व याहूनही तो लांबण्यासारखा आहे, यांत संशय नाहीं. पण येथवर दाखविलेल्या गुणांच्या संबंधानें आम्हांत व आमच्या पाश्चात्य आर्यबंधूंत किती अंतर आहे, हें लक्षांत आणलें असतां आमच्या वाचकांची बहुतकरून खात्री होईल कीं, नुसत्या वरकांती अनुकरणापेक्षां अंतर्गत सद्गुणांचा कित्ता वळवणें, हेंच

आपणांस सांप्रत फार श्रेयस्कर आहे. ही गोष्ट त्यांच्या लक्षांत भरवून देण्याकरितां प्रस्तुत विषय आम्हीं बुद्धया उचलला आहे. या आमच्या लेखानें जर वाचकांच्या मनांत वरील तत्त्व थोडें तरी बिंबलें, तर आमच्या कलमास विनाकारण शीण झाला नाहीं, असें होईल; नाहीं तर आमच्या शूद्र कवीचा 'सुवर्णकारनलिका–' न्याय अनुभवसिद्धच आहे:—

नळी फुंकली सोनारें । इकडून तिकडे गेलें वारें ॥

**विष्णुशास्त्री चिपळूणकर**

( केसरींतील निवडक निबंध )

---

## प्रश्न

( १ ) "मनुष्य हा अनुकरणशील प्राणी आहे" हें उदाहरणें देऊन सिद्ध करा. पाश्चात्यांच्या सहवासानें आमच्या पोशाकांत काय फरक झाला आहे ?

( २ ) पाश्चात्यांपासून आपल्या लोकांनीं शिकण्यासारखे गुण कोणते ?

( ३ ) जात्यभिमान म्हणजे काय ? हा गुण बरा कीं वाईट ? ह्याचे कित्येक वेळां वाईट परिणाम दिसतात ते कां ? ते कसे टाळतां येतील ?

( ४ ) मानसिक धैर्य व शारीरिक धैर्य यांत फरक काय ? पहिल्या प्रकाराचीं उदाहरणें द्या. "आमचें ग्रहण अद्यापि सुटलें नाहीं" या लेखांत कै. आगरकरांनीं कोणत्या प्रकारच्या धैर्याचा उल्लेख केला आहे ?

( ५ ) नीतिधैर्याचीं कांहीं ठळक उदाहरणें द्या.

# १४

# किल्ल्यांचा बंदोबस्त कसा करावा ?

[ हा उतारा मराठेशाहींतील एक मोठा मुत्सद्दी व कार्यकर्ता पुरुष रामचंद्रपंत अमात्य बावडेकर याच्या "आज्ञापत्र" नामक ग्रंथांतून घेतला आहे. थोरले राजाराम महाराज यांच्या कारकीर्दीत मराठी राज्यावर जें मोठें संकट गुदरलें होतें, त्यावेळीं जीं स्वामिनिष्ठ व धोरणी माणसें त्यांस उपयोगी पडलीं त्यांत रामचंद्रपंतास अग्रस्थान दिलें पाहिजे. हा मुत्सद्दी पुढें कोल्हापूरच्या गादीचा पक्षपाती होऊन राहिला, व छत्रपति संभाजी ( राजारामाचा दुसरा मुलगा ) याच्या आज्ञेवरून रामचंद्रपंतानें हें आज्ञापत्र लिहिलें. राज्य चालविणारांस जे कांहीं नियम, धोरणें व बारीक बारीक तपशील नेहमीं ध्यानांत ठेवावे लागतात ते सर्व या अनुभविक मुत्सद्यानें यांत गोवून दिले आहेत. व यावरून शिवकालीन राजनीतीची आपल्यास बरीच अटकळ होते. प्रकरण लहानच असलें तरी तें सर्वांगसुंदर आहे ]

संपूर्ण राज्याचें सार तें दुर्ग. दुर्ग नसतां मोकळा देश परचक्र येतांच निराश्रय, प्रजा भग्न होऊन देश उद्वस[1] होतो. देश उद्वस झाल्यावरी राज्य असें कोणास म्हणावें ? याकरितां पूर्वीं जे जे राजे झाले त्यांणीं आधीं देशामध्यें दुर्ग बांधून तो तो देश शाश्वत करून घेतला, आणि आलें परचक्रसंकट दुर्गाश्रयीं परिहार केलें. हें राज्य तर तीर्थरूप थोरले कैलासवासी स्वामींनीं[2] गडांवरूनच निर्माण केलें. जो जो देश स्वशासनवश न होय त्या त्या देशीं स्थलविशेष पाहून गड बांधिले, तसेंच जलदुर्ग बांधिले; त्यावरून आक्रम करीत करीत सालेरी अहिवंतापासून कावेरीतीरपर्यंत निष्कंटक राज्य संपादिलें.

१ ओस, शून्य. २ श्री शिवाजी महाराज.

औरंगजेबासारखा महाशत्रु चालून येऊन विजापूर भागानगरासारखीं[1] महासंस्थानें आक्रमिलीं, संपूर्ण तीस बत्तीस वर्षेपर्यंत या राज्यांशीं अतिक्रम केला, त्याचे यत्नास असाध्य काय होतें ? परंतु राज्यांत किल्ले होते म्हणून अवशिष्ट तरी राज्य राहिलें. पुढें पूर्ववत् करावयास अवकाश जाहला. या उपरही ज्यापेक्षां राज्य संरक्षण करणें आहे, त्यापेक्षां अधिकोत्तर साधनीं स्वतां गडकिल्ल्यांची उपेक्षा न करितां, परम सावधपणें असतील त्या गडकिल्ल्यांची यथोक्त मजबुदी करावी. नूतन देश साधणें त्या देशांत जीं स्थळें असतील तीं महत्प्रयत्नें हस्तवश करावीं. ज्या देशांत गडकोट नसतील त्या देशांत आपले राज्याचे सरहद्दीपासून पुढें जबरदस्तीनें नूतन स्थळें बांधीत बांधीत तो देश आक्रमावा. त्या स्थळांचे आश्रयीं सेना ठेवून पुढील देश स्वशासनें वश करावा. असें करीत करीत राज्य वाढवावें. गडकोटाचा आश्रय नसतां फौजेच्यानें परमुलखीं टिकाव धरून राहवत नाहीं. फौजेविरहित परमुलखीं प्रवेश होणेंच नाहीं. इतक्याचें कारण तें गडकोटविरहित जें राज्य त्या राज्याची स्थिति म्हणजे अभ्रपटलन्याय आहे. याकरितां ज्यांस राज्य पाहिजे त्यांणीं गडकोट हेंच राज्य, गडकोट म्हणजे राज्याचें मूळ, गडकोट म्हणजे खजीना, गडकोट म्हणजे सैन्याचें बल, गडकोट म्हणजे राज्यलक्ष्मी, गडकोट म्हणजे आपलीं वसतिस्थळें, गडकोट म्हणजे सुखनिद्रागार, किंबहुना गडकोट म्हणजे आपलें प्राणसंरक्षण, असें पूर्ण चित्तांत आणून कोणाचे भरंवशावर न राहतां आहे त्याचें संरक्षण करणें; व नूतन बांधण्याचा हव्यास स्वतांच करावा, कोणाचा विश्वास मानूं नये. गडकोट संरक्षणाचें कार्य फार

---

१ गोंवळकोंड्याचें राज्य.

नाजूक. परम नाजूक स्थळास एखादा मामलेदारादि जे लोक ठेवणें, त्यांणीं भेद[1] केलियामुळें, अथवा शत्रु चालोन आला असतां नामर्दी केल्यामुळें, अथवा त्यांचे गाफिलीमुळें स्थळास दगा जाहला तर स्थळसहित तितकें राष्ट्र हातींचें गेलेंच. उरल्या स्थळास व राष्ट्रास उपसर्ग लागला, शत्रु प्रबळ होऊन पावला असतां जो गेला किल्ला, त्या किल्लेकराचें वारें इतर राहिले किल्लेकरांस लागोन तेही स्थळास अपाय योजितात. म्हणजे एक एक राज्यासच धक्का बसतो. या कारणें किल्लेकोट जतन करणें ही गोष्ट सामान्य आहे असें न समजतां, तेथील उस्तवारी व शासन यांस तिळतुल्य अंतर पडों न द्यावें. त्यास आधीं किल्ल्याचा जीव तो किल्ल्याचा हवालदार; तसाच सरनोबत[2] म्हणजे निस्पृह, कोणाचे निसपतीचे[3] अथवा एकाचे आर्जवामुळें ठेवावे असें नाहीं. जे कुलवंत मराठे आणि शिपाई, जे शरम धरीत असतील, कबीलेदार[4], विश्वासु, उद्योगी, अलालुची, अनिद्रिस्त[5], सकल लोकांचें समाधान रक्षून यथोचित सर्वांपासून स्वामिकार्य घेत, हें स्थळ म्हणजे धन्यानें ही परमप्रिय ठेवी दिली आहे, आपले प्राणान्त यास दगा होऊं नये, असें पूर्ण चित्तांत आणून, जे धन्यांनीं लावून दिली मर्यादा तीस तिळांश अंतर पडों न देतां, दिवसाचा उद्योग दिवसा, रात्रीचा उद्योग रात्रीं, निरालस्यपणें करून सर्व प्रयत्नें स्थळ जतन करीत, असे ठेवावे. किल्ल्यास दहा टक्क्यांचा[6] रजपूत ठेवणें तोही हुजूरचे सनदे[7]खेरीज न ठेवावा. किल्ल्यामध्यें मनुष्यें ठेवणें तीं चाळक[8], चोरटे, खुनी, तऱ्हेवाईक, शराबी,

---

१ भेद, फितूर. २ सेनापति. ३ संबंधाचे, नात्याचे, शिफारशीचे. ४ कुटुंबवत्सल. ५ सावध, हुशार. ६ दहा रुपये पगाराचा. ७ आज्ञापत्र. ८ कारस्थानी.

कैफी[१], भंगी[२], फितवखोर; असे सर्वथाही न ठेवावे. जे ठेवणें ते परीक्षा करून ठेवीत जावे. त्यांतही तीन वर्षांनीं हवालदार काढावा, चार वर्षांनीं सरनोबत काढावा, पांच वर्षांनीं सबनीस[३], कारखाननीस[४] काढावे; आणि त्या मामलेवर[५] त्या त्या मामलेयोग्य आणखी तशा गुणसंपत्तीचे मामलेदार पाठवावे. त्यांचेंही त्यांचे स्वरूपानुरूप समाधान करून कांहीं एखादे दिवसीं समागमें वागवून स्वामिसेवकभावाची त्यांची बुद्धि कांहीं मलीन जाहली असली तर सहवासामुळें पुन: सोज्वळ करून, श्रमी[६] होऊं न देतां, त्यांचे त्यांचे आटोपा[७]नुरूप आणखी मामले सांगावे. तसेंच तटसरनोबत, बारगीर[८] हेही जुने नवे करीत असावे. नाईकवाडी[९], रजपूत, अन्यायी अथवा कार्यकर्ता असल्यासही त्यास काढून ज्यास जें शासन अथवा सरफराजी[१०] करणें ती करीतच जावी. किल्ल्याचा हवालदार सरनोबती करीत असतां तो मृत्यु पावला असतां तो मामला त्याचे पुत्रास अथवा भाऊबंदास न सांगावा. त्याचे पुत्र अथवा भाऊबंद असतील त्यांचें समाधान करून त्यांचे स्वरूपानुरूप आणखी उद्योग सांगून चालवावें. लश्करचे सरदारचे भाऊबंदांना अथवा त्याचे निसपत लोक त्यांस परिच्छिन्न[११] किल्ल्याचा मामला सांगूं नये. तसेंच एका घराचे भाऊबंद एक, दोन, तीन आहेत, आणि इतकेही गडवई तर त्यांस किल्लेचे मामले अवश्यमेव सांगावेच लागतात. काय निमित्य कीं, किल्ल्याचे

१ मादक पदार्थाचें सेवन करणारा. २ भांग पिणारा. ३ सैन्यास पगार वांटणारा अधिकारी. ४ हिशेबी कारकून. ५ अधिकाराची जागा. ६ दुःखी, नाराज. ७ शक्ति. ८ ज्याला सरकारी घोडा दिलेला असतो असा स्वार. ९ पायदळांतील नाईक. १० बढती. ११ अगदीं, बिलकुल.

कामास माणूस मिळणें परम कठीण आहे, परंतु त्यांस समीप समीप किल्ल्यावर न ठेवावे. दूर दूर किल्ले, एकाचा हात एकास न पावे, मध्यें आणखी किल्ले असतील, अशा किल्ल्यांचे मामले सांगून सेवा घ्यावी. किल्लेखालील मुलुखांतील देशमुख, देशपांडे, पाटील, कुळकर्णी, चौगुले आदिकरून मिरास[1] वतनदारी यांस त्या समीपच्या किल्ल्यावर सेवा न सांगावी. त्यांचे वतनापासून दहा पांच गावें दूर किल्ले असतील तशा किल्ल्यांस ठेवावे. तेच वतन आणि समीपतेची सेवा जाहलीयावरी चाकरीवर दुरुस्त न राहतां क्षणक्षणा घरास जाणार, किंबहुना समयविशेषीं वतनाचे आशेनें स्थळास भेद करून दगाही करणार, याकरितां किल्ल्याजवळील लोक किल्ल्यावर न ठेवावे. किल्ल्याचे मामले करीत असतां चोरीमारी, लांच, कलागत, सुस्ती या[2] कौहिली[3] इत्यादि अन्याय असतां, शिरस्त्याप्रमाणें मुदतीचा मार्ग न पाहतां मुदत न भरतांही त्यांस काढून आणावे. अन्याय पाहून शासन करावें. त्या मामल्यावर त्या मामल्यायोग्य दुसरे मनुष्य मर्दाने[4] पाहून ठेवावे. गडकोटचे मामलेदारानें अथवा हरएकानें स्थळास दगा होई अशी दुर्बुद्धी धरली आहे असें वर्तमान आलें, तरी आधीं खरें खोटें न पाहतां, प्रलापावरी[5] न घालितां, त्यास सावध होऊं न देतां, तत्क्षणीं काम हातींचें न जाय असा उपाय योजून, कोणासही कळों न देतां त्यास काढून आपणाजवळ आणावें. हुजूर आलियावर रास्ती न्याय करून अन्याय खरा जाहला, तर तात्काळ बेमुलाहिजा[6] त्याचा शिरच्छेद करावा. आणि तें मस्तक गडोगडीं

---

१ वंशपरंपरेचे वतनदार अधिकारी. २ अथवा. ३ आळस, दिरंगाई. ४ शूर. ५ वायफळ चर्चा न करतां. ६ उपेक्षा न करतां.

फिरवावें. असें जो करील त्यास हा नतीजा[1] म्हणोन दांडोरा पिटवावा. वाजवी न्याय करितां निरपराध झाला तर त्याचें आपणास काढून आणिलेला डाग चित्तांतून जाय असें बहुतां रीतीनें समाधान करावें. परंतु फिरोन त्याचे मामलियावर न पाठवावें, रोजमुरा चालवून सहा चार मास हुजूर ठेवून त्यायोग्य आणखी मामला असेल त्यावर पाठवावा.

## प्रश्न

( १ ) हें प्रकरण कोणीं लिहिलें आहे? कोणासाठीं लिहिलें आहे? लिहिणारास या बाबतीत कांही विशेष अनुभव होता काय ?

( २ ) किल्ल्यांना थोरले शिवाजी महाराज इतके महत्व कां देत ? आजकाल हें महत्व राहिलें आहे काय ? नसल्यास कां ?

( ३ ) किल्ल्यावरील अधिकाऱ्यांत मुख्यत्वें कोणते गुण पाहिजेत ? वतनदार माणसांना वतनाचे आसपासच्या किल्ल्यावर नेमूं नये असा नियम कां केला होता ?

( ४ ) फितुरीचा संशय आल्यास किल्लेदारास कसें वागवावे ? संशय खोटा ठरल्यास काय करावें ? या विषयींचें धोरण तुम्हांस कसें वाटतें ?

---

१ फळ, परिणाम.

## १५

# सृष्टिप्रेम

[ पुढील उतारा विख्यात इंग्रज ग्रंथकार लॉर्ड **लबक** यांच्या एका ग्रंथाच्या आधारें श्रीयुत महादेव हरि मोडक यांनीं लिहिलेल्या "सुख व शांति" या ग्रंथांतून संक्षेपरूपानें घेतला आहे. उत्कृष्ट भाषांतराचा हा ग्रंथ एक नमुना आहे. खार व साप यांचीं शब्दचित्रें तर अत्यंत मोहक गद्यकाव्येंच आहेत, व तीं मुलांनीं मुखोद्गत करण्याच्या योग्यतेचीं आहेत ]

वसंत ऋतु जर आयुष्यांत एक वारच येता, दिनमणीचा उदय-अस्त नित्य न होतां वर्षाकाठीं एक वेळच होता, बहुरंगी इंद्रधनुष्य शतवर्षांनीं एकदांच दिसतें, सुंदर पुष्पें जर माणकांइतकीं दुर्मिळ असतीं, आणि हिमबिंदु हिरकण्यांइतके दुष्प्राप्य असते, तर या गोष्टी किती तरी आश्चर्यकारक वाटल्या असत्या; आणि त्यांच्या दर्शनानें आपणांस आनंदही किती तरी अनिर्वाच्य झाला असता !

दयाळू परमेश्वरानें या गोष्टी विपुल ठेवल्यामुळें आपले हातून त्यांची अवगणना होते. कारण, म्हणच आहे, 'अति परिचयादवज्ञा' ("फाजील परिचयानें वस्तूची किंमत कमी होते"). गेटी[1] म्हणतो, "इंद्रधनुष्य हें इतकें चित्ताकर्षक आहे ना? तथापि तें सारखें घटकाभर राहूं द्या, म्हणजे त्याजकडे कोणीही पाहाणार नाहीं." जनांची चालच ही. मनुष्य म्हणतें, 'अंः! त्यांत काय पहावयाचें आहे? तें नित्याचेंच आहे!' पण खरें पाहतां या ज्या गोष्टी, त्याच

---

१ एक विख्यात जर्मन कवि व ग्रंथकार.

अत्यंत मनोहर व अत्यंत आवश्यकही आहेत. आकाशांतील ताऱ्यांकडे रुचिहीन लोक वर मान करून नीट पहातही नाहींत; पण ज्योतिषी दुर्बीण लावून रात्रीच्या रात्री डोळेफोड करीत असतो, आणि त्याला आनंदही नित्य नवा होत असतो. पुष्पांचे अनंत नेत्रानंदकर वर्ण व आकृति यांकडे लक्ष जाऊन ज्याचें मन द्रवणार नाहीं तो मनुष्यच नव्हे. विशाल व उत्तुंग पर्वतांचें गंभीरोदात्त स्वरूप दृष्टीस पडतांच कोणाही मनुष्यास करमणूक झाल्याशिवाय राहाणार नाहीं. सेंट बॅसिल म्हणतो, "तुम्ही जर एखाद्या निरभ्र रात्रीं आकाशांतील तारागणाच्या सौंदर्याकडे कांहीं वेळ सारखी टक लावून, मग आपल्या या कधीं न कोमेजणाऱ्या तारकारूपी पुष्पांनीं या भव्य विश्वमंदिराचें विस्तीर्ण छत ज्यानें चितारलें असेल, त्या चतुर कारागिराविषयीं विचार करूं लागाल तर तुम्हांला या कुशल जगत्कर्त्याविषयीं प्रेमानें गहिंवर आल्याशिवाय राहाणार नाहीं."

शास्त्रीय प्रगतीनें तर सृष्टीचें अगाधपण प्रतिक्षणीं प्रतीयमान होत आहे. साध्या डोळ्यांना तळहाता येवढें दिसणारें सूर्याचें बिंब आपल्या चतुःखंड पृथ्वीच्या लक्षावधि पटीनें मोठें आहे; आणि त्याचे भोंवतीं सप्तग्रह फिरत आहेत. तथापि असल्या ह्या अवाढव्य सूर्यमालेचा मध्यमणि जो सूर्य तो अनंत अंतरिक्षांत असणाऱ्या अमर्याद तेजोगोलांच्या मानानें केवळ राई येवढा ठिपका आहे! हें सत्य ज्योतिःशास्त्रानें प्रतीत होतें. भूगर्भशास्त्रही आपल्या परीनें कालाचें अनंतत्व दाखवितें. शिवाय शास्त्रांचे साह्यानें एवढेंही अफाट विश्व आज असंख्य युगें सुतांत ओंवल्यासारखें नियमबद्ध व सुयंत्र चाललें आहे, असें आढळून येतें. असें झालें म्हणजे या अखिल नाटकाचा

चतुर सूत्रधार कोण असेल तो शोधावा म्हणून मनास सहजच वेड भरतें; व

(आर्या)

"ही अद्भुत सृष्टि तुवां देवा! केव्हां कधीं कशी केली?
या विषयींची आम्हा जीवांची कल्पना विरुन गेली॥
रविशशिनक्षत्रांहीं कैसें आकाशसदन शोभविलें?
सौंदर्य हें पहाया जीवाचें नयनवृंद लोभविलें"॥

—परशुरामपंत तात्या गोडबोले

असे प्रेमोद्गार तोंडावाटे सहजच बाहेर पडतात. शोधक बुद्धीनें सृष्टीचें सप्रेम अवलोकन केल्यानें केवळ आनंद व करमणूकच होत नसून मनुष्याला अनेक उपयुक्त गोष्टींचें ज्ञानही होतें. असें असतां मनुष्यें संसारांतील व शारीरिक दुःखांचा विसर पडावा म्हणून पत्ते, सोंगट्या किंवा जुगार खेळत बसतात, अथवा मादक पेयांचे प्याले झोंकीत राहातात याला काय म्हणावें?

× × ×

रमणीयतेची एका रसज्ञानें व्याख्या दिली आहे कीं "प्रतिक्षणीं नवी नवी मोहक झांक दाखविणें हें रमणीयतेचें रूप समजावें." हें लक्षण सृष्टीला किती तरी पूर्णत्वानें लागू पडतें. प्रति ऋतूला पुष्पें वेगळीं, फुलें वेगळीं, हवामान वेगळें, देखावे वेगळे! बरें, प्रत्येकाची बहारही वेगळीच. एक कवि म्हणतो, 'अहो दर वेळीं नवी नवलाई करून दाखविण्याचें या सृष्टिकर्त्याला वेडच दिसतें!'

× × ×

नित्यांतल्या गोष्टी, पण त्या लक्षांत घेणारे थोडे. रस्किन्नें* खारीचें वर्णन दिलें आहे, तें वाचलें म्हणजे मग आपले डोळे उघडतात व वाटतें कीं हा लिहितो तें सर्व खरें आहे, पण आपण लक्षांत घेतलें नव्हतें. रस्किन् म्हणतो:

"या खारीसारखा सुबक, आनंदी व गमतीचा दुसरा प्राणीच नसेल. अति हूड असून अत्यंत निरुपद्रवी. खाण्यापिण्यांतही कोणा जीवाची प्राणहानि नाहीं. मांजराचे पिलासारखी खेळकर, परंतु निर्दय नाहीं; वानराहूनही अधिक चलाख, पांखरापेक्षां मनोहर आणि तजेलदार, आणि वनदेवतेचें आवडतें खेळणेंच. असली ही लुकलुक डोळ्यांची गोजिरवाणी मूर्ति एका वृक्षशाखेवरून दुसरीवर जाते, तेव्हां विजेची चपळाई कमी असा भास होतो! तिच्या गति तरी किती विचित्र! क्षणांत टुणकन् उडी मारील, क्षणांत तीरासारखी धांवत जाईल, क्षणांत मध्येंच मुरडेल. त्याचा कांहीं नेमच नाहीं; सारी लहर आहे! हरिणाहून चपळ, वाघाहून अधिक टिपण झोंकणार. देहांत सरळपणा पहाल तर मुळींच नाहीं; पण जिनगरी बाहुलीपेक्षां अधिक मोहक, आणि सावरीचे कापसापेक्षां अधिक गुलगुलीत. अंगीं ऐट किती, मुरड किती, नखरा किती, आणि वात्रटपणा तरी किती! पळांत तुमचेमागें धावेल, पळांत दृष्टीआड लपेल, पळांत वर डुकली उचलून तुम्हांला हेरील. क्षणांत प्रियसखीप्रमाणें कान देऊन चोरून ऐकत बसेल. कोण खेळाडू, कोण धूर्त, कोण दिमाखदार, किती रंगाढंगाची! छे, छे, मला वाटतें स्वर्गींची अप्सराच

---

* विख्यात इंग्रज लेखक व कलाभिज्ञ.

हें मुरकेदार छोटें छबेलें रूप घेऊन बाळगोपाळांच्या मौजेकरितां भूलोकीं अवतीर्ण झाली आहे."

विषमूर्ति भुजंगाचेंही याच लेखकानें असेंच मौजेचें वर्णन केलें आहे:—

"ओहो! तो पहा वितळलेल्या रुप्याचा छोटासा ओघळ जमिनीवरून चालला आहे. चालला आहे कसचा? वाहतो आहे. कारण या चालण्यांत यत्न किंवा कष्ट कसे ते नाहींत. गति किती गमतीची? चपळ असून शांत. पाण्याची लाट, कीं वाऱ्याची झुळूक? पुन: लाट म्हणावी तर गर्जत नाहीं; ओघ म्हणावा तर धबधबा नाहीं, गोंगाट नाहीं, बोभाट नाहीं. टिकल्यांच्या चंद्रहाराचा सर घसरतो आहे, कीं सुबक बुंदक्यांचा गळपट्टा पडला आहे, कांहीं ओळखत नाहीं! रेशमाहून मृदु, कदलीगर्भाहून शीतळ, पुष्पहाराहून सुखतर स्पर्श! पण या सौम्यपणाला फसूं नका. दाढेंत जिवंत मृत्यु उभा आहे. थोडें वाटेस जा म्हणजे समजेल चंद्रहार कीं कट्यार, आणि गळपट्टा कीं गळा उतरणारा पट्टा तो! रुपेरी पाण्याचा ओघळ आतां नव्हे. आतां झाली विषाची लाट. पुष्पाचें मृदुत्व जाऊन पाषाणाचें कठोरपण आलें आहे. अखिल ब्रह्मांडांतील क्रूरता, दुष्टपणा, हिंस्रता एकवटून तुमचे पुढें स्वारी खडी आहे. तिचे आटोक्यांत या, कीं स्वर्गद्वाराचीच भेट! अशाला माझा दुरून नमस्कार असो!"

वरील वर्णनांतील प्रत्येक शब्द खरा आहे असें आपणांस वाटतें; परंतु हें रस्किन्नें पुढें मांडल्यावर! मार्मिकाला या सृष्टींत पदोपदीं मौजा आहेत; मूढांना कांहीं नाहीं! सृष्टि सुंदर आहे खरी, पण

दृष्टि असेल त्याला. बहुतेक लोक डोळे असून आंधळे असतात, व म्हणूनच आनंदाचा अखंड ठेवा भोंवतालीं असूनही ते दुःखी असतात. लबक म्हणतो, 'ही दृष्टि जर असेल तर माणसाला या जगांत दुःख विरळाच भेटेल. आकाशाचे नीलवर्णाकडे, किंवा तद्गत तारकापुंजाकडे, किंवा तरंगमाली सागराकडे किंवा एखाद्या अद्रिशृंगाकडे जर तो क्षणभर दृष्टि करील तर सर्व सांसारिक दुःखाची त्याला तत्काल विस्मृतिच पडेल; इतका या वस्तूंत प्रभाव आहे!'

---

## प्रश्न

( १ ) "फाजील सहवासानें वस्तूंची किंमत कळेनाशी होते," हें सृष्टिसौंदर्याचे बाबतींत कसें लागू पडतें तें दाखवा.

( २ ) सृष्टीच्या अवलोकनानें मनाला कोणते लाभ होतात? शास्त्रीय ज्ञानाच्या वाढीनें या आनंदांत कांहीं भर टाकली आहे काय?

( ३ ) "प्रतिक्षणिं नवीन दे रुचि" (मोरोपंत) अशी सौंदर्याची व्याख्या देतात ती कां? ही कल्पना उदाहरणें देऊन स्पष्ट करा.

( ४ ) "साध्याही विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे। नित्याच्या अवलोकनें परि किती होती जगीं आंधळे." (केशवसुत). या ओळींतील अनुभव खरा आहे काय? डोळे असून आंधळे असें कोणाला म्हणतां येईल?

# १६

# अच्छोद सरोवर

[ खालील उतारा विख्यात कवि **श्री बाणभट्ट** याच्या " कादंबरी " या ग्रंथाच्या मराठी भाषांतरांतून संक्षेपरूपानें घेतला आहे. या अद्भुतरम्य कथानकाचा नायक राजकुमार चंद्रापीड हा दिग्विजयार्थ निघाला असतां एके दिवशी त्यानें एक किन्नरांचें जोडपें पाहिलें. हें विचित्र जोडपें पकडावें अशी इच्छा उत्पन्न होऊन त्यानें त्यांचा पाठलाग केला. पण तें हां हां म्हणतां एका पर्वताच्या शिखरावर चढून नाहींसें झालें. या किन्नरमिथुनाच्या नादानें आपण विनाकारण आडरानांत शिरलों असा चंद्रापीडास पश्चात्ताप झाला. शिवाय प्राण तहानेनें कासावीस होऊं लागले. पाण्याच्या शोधार्थ इकडे तिकडे फिरत असतां नुकत्याच गेलेल्या वनगजांच्या पायांचा चिखल, व इतस्ततः विखुरलेले शेवाळें व कमळांचे दांडे या चिन्हांवरून या बाजूस जवळच कोठें तरी सरोवर असावें, असा त्यानें तर्क केला, व तो तर्क खराही ठरला. हिमालयाच्या पायथ्याशीं असलेल्या या रमणीय सरोवराचें पुढील वर्णन प्राचीन काव्यमय वर्णनाचा एक नमुना म्हणून पुढें दिलें आहे, ते आमच्या वाचकांस आवडेल अशी आशा आहे ]

त्या झाडीच्या मध्यभागीं त्याला एक तलाव दृष्टीस पडला. तो पाहून हा त्रैलोक्य-लक्ष्मीचा रत्नमय आरसाच आहे कीं काय, किंवा समुद्राचा हा उगमच आहे कीं काय, किंवा हा द्रवलेला हिमालयच आहे कीं काय, किंवा हा रसरूप झालेला चंद्रप्रकाशच आहे कीं काय, असा त्यास भास झाला. खरोखर हा जलसंचय मुनींच्या निर्मल मनांनीं, सज्जनांच्या गुणांनीं, हरिणांच्या नेत्रकांतींनीं किंवा मोत्यांच्या पाण्यानेंच निर्माण केला आहे काय, असें त्याला वाटलें. तो पाण्यानें

तुडुंब भरलेला होता, तरी सर्व पदार्थांचीं प्रतिबिंबें त्यांत स्वच्छ दिसत असल्यानें तो अनेक पदार्थांनीं भरलेला आहेसा वाटत होता. वायूनें त्या सरोवरांतील पाण्याचे जेव्हां तुषार उडत तेव्हां त्यांतून इंद्रधनुष्याचे चित्रविचित्र रंगांची झांक दिसे. जणुं कांहीं त्या सरोवराच्या संरक्षणासाठीं इंद्रानेंच आपलीं धनुष्यें पाठविलीं आहेत. सरोवरांतील कांहीं भाग नील कमलांनीं इतके भरगच्च भरले होते कीं, भरदिवसा तेथें अंधकाराचा भास होई. व त्यामुळें चक्रवाक पक्ष्यांचीं जोडपीं परस्परांच्या विरहानें व्याकुळ होत. त्या ठिकाणीं देव व ऋषि स्नान करण्यासाठीं येत असत. तशाच गंधर्वादिकांच्या स्त्रिया जलक्रीडा करण्यास येत असत. कोठें वरुणाचा हंस कमळावर बसून क्रीडा करीत आहेसें दिसे. कोठें दिग्गजांनीं आपल्या सोंडांनीं कमळांचे दांडे मोडून टाकले होते. कोठें शिवाच्या नंदीनें आपल्या शिंगांच्या टोंकांनीं सरोवराच्या तीराची माती उकरून टाकली होती. कोठें यमाच्या महिषानें आपल्या शिंगांनीं सरोवरांतील पाणी फेंसमय करून टाकलें होतें. कोठें इंद्राच्या ऐरावतानें आपल्या सोंडेनें कमळें उपटून टाकलीं होतीं. अनेक प्रकारचे पक्षी त्यांत विहार करीत होते. तीरावर मयूरपक्षी तटस्थ बसून उदक प्राशन करीत होते. श्रीकृष्णाच्या बाल संवगड्यांप्रमाणें वानर तटावरील कदंबवृक्षांवरून पाण्यांत धडाधड उड्या टाकीत होते. हजारों शतपत्रकमलें त्यांत प्रफुल्लित झालीं होतीं, व त्यांच्यावर भ्रमर गुंजारव करीत फिरत होते.

असें तें रमणीय सरोवर दृष्टीस पडतांच चंद्रापीडाचे सर्व श्रम नाहींसे झाले. मग तो आपल्या मनांत म्हणालाः—“ किन्नरांचें जोडपें जरी मला हस्तगत झालें नाहीं, तरी त्यामुळें हें सरोवर तरी माझ्या

दृष्टीस पडलें. खरोखर माझ्या नेत्रांचें साफल्य झालें! रमणीय व मनोहर पदार्थांची ही परमावधिच होय. असलें नितांत मधुर जल निर्माण केल्यावर ब्रह्मदेवानें फिरून अमृत कशासाठीं निर्माण केलें कोण जाणे? अहाहा! याचा शीतस्पर्श शरीरास सौख्य देत आहे; स्वच्छतेमुळें हें दृष्टीस आनंदवीत आहे; कमळांच्या सुगंधामुळें हें घ्राणेंद्रियास तृप्त करीत आहे; हंसादि पक्ष्यांच्या मधुर शब्दांनीं कर्णेंद्रियास सुखवीत आहे; व माधुर्यानें जिव्हेला संतोष देत आहे. खरोखर या सरोवराच्या लोभानेंच भगवान् शंकर याच्या समीप कैलासपर्वतावर राहात असावा. सर्वेंद्रियांस आल्हादकारक असें या सरोवराचें उदक सोडून क्षीरसागरांत श्रीविष्णु वास करीत आहे हें कांहीं तो बरें करीत नाहीं. अहाहा! केवढा हा विस्तीर्ण व अथांग जलसंचय! प्रलयकालीं मेघ सर्व पृथ्वी बुडवून टाकण्यासाठीं याच सरोवरांतील उदक घेत असतील."

असा विचार करीत तो त्या सरोवराच्या दक्षिणेकडील तीरावर गेला. तो प्रदेश वालुकामय होता. तेथें घोड्यावरून उतरून त्यानें त्यावरचें खोगीर काढलें. मग थोडेंसें जमिनीवर लोळून तो घोडा सरोवरांत उतरला. त्याला यथेच्छ पाणी पाजून व स्नान घालून चंद्रापीडानें एका झाडाच्या मुळाशीं बांधून टाकलें, व तीरावरची कोंवळी हरळी कापून त्याजपुढें टाकली. नंतर तो स्वतः त्या सरोवरांत उतरला. व स्वच्छ हातपाय धुऊन त्यानें तें मधुर जल प्राशन केलें. मग एका लतामंडपांत एका शिलातलावर कमलपत्रांची शय्या करून व आपल्या शेल्याची गुंडाळी उशाशीं घेऊन थोडी विश्रांति घेण्यासाठीं तो स्वस्थ पडला. पण तो पडून फार वेळ झाला नाहीं तोंच उत्तरेच्या बाजूकडून

वीण्याच्या नादानें मिश्रित असा गायनाचा मधुर स्वर त्याच्या कानीं पडला.

**पां. गो. शास्त्री पारखी** यांच्या "कादंबरीसार" या पुस्तकावरून थोडा फेरफार करून.

---

**प्रश्न**

( १ ) चंद्रापीड अच्छोद सरोवराच्या बाजूस कसा गेला ? सरोवर पाहून त्यास काय वाटलें ?

( २ ) या गोष्टींतील सृष्टिवर्णन व आजकालचें सृष्टिवर्णन यांत तुम्हांस कांहीं फरक दिसतो काय ? असल्यास कोणता ?

---

( पद्यविभाग )

१

# मराठी भागवत



[ पुढील उतारा विख्यात साधुवर्य एकनाथ यांच्या "एकनाथी भागवत" या नांवानें प्रसिद्ध असलेल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंतून घेतला आहे. हा ग्रंथ म्हणजे श्रीमद्भागवत या प्रसिद्ध पुराणग्रंथाच्या एकादश स्कंधावरील मराठी टीका होय. एकनाथाच्या काळीं विद्वान् शास्त्री पंडित मराठी भाषेंत ग्रंथ लिहिण्याचा तिटकारा करीत, व तसे लिहिणाराची कुचेष्टा करीत. अशा टीकाकारांस पुढील उताऱ्यांत खरमरीत उत्तर आलें आहे ]

( ओंव्या )

वंदूं प्राकृत कवीश्वर, निवृत्तिप्रमुख ज्ञानेश्वर;
नामदेव चांगदेव वटेश्वर, ज्यांचें भाग्य थोर गुरुकृपा.

जयांचे ग्रंथ पाहतां, ज्ञान होय प्राकृतां;
तयांचे चरणीं माथा, निजात्मता निजभावें.

संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी, मा प्राकृतीं काय उणीवी?
नवीं जुनीं म्हणावीं, कैसेनि केवीं सुवर्णसुमनें.

कपिलेचें म्हणावें क्षीर, मा इतरांचें तें काय नीर?
वर्णस्वादें एकचि मधुर, दिसे साचार सारिखें.

जें पाविजे संस्कृत अर्थें, तेंचि लाभे प्राकृतें;
तरी न मनावया येथें, विषमचि तें कायी?

कां निरंजनीं वसला रावो, तरी तोचि सेवकां पावन ठावो;
तेथें सेवेसि न वचतां पाहो, दंडी रावो निजभृत्यां.

कां दुबळी आणि समर्थ, दोहींस रायें घातले हात,
तरी दोघींसिही तेथ, सहजें होत समसाम्य.

देशभाषावैभवें, प्रपंचपदार्थीं पालटलीं नांवें;
परी रामकृष्णादिनामां नव्हे, भाषावैभवें पालटू.

संस्कृत वाणी देवें केली, प्राकृत तरी चोरापासोनि जाली ?
असोतु या अभिमानभुली, वृथा बोलीं काय काज.

आतां संस्कृता किंवा प्राकृता, भाषा जाली जे हरिकथा,
ते पावनचि तत्त्वता, सत्य सर्वथा मानली.

साखरेचा बोळू केला, परी कडूपणा नाहीं आला;
तैसा ग्रंथू प्राकृतभाषा जाला, असे संचला स्वानंदू.

जरी सोन्याचें पेंडुकें केलें, परी तें दगडामोला नाहीं आलें;
तैसें भागवत प्राकृत जालें, परी नाहीं चुकलें निजज्ञाना.

मुक्ताफळालागीं सागरीं, बुड्या देती नानापरी;
तें सांपडलिया घरींच्या विहिरीं, जो अव्हेरी तो मूर्ख.

तैशी संस्कृत व्याख्यानअटाटी, अति कष्टें परमार्थीं भेटी;
तें जोडल्या मराठीसाठीं, उपेक्षादृष्टी न करावी.

धनवंतु रत्नपारखी पुरा, तेणें धुळीमाजी देखिल्या हिरा;
गांठी बांधोनि आणी घरा, पारखी खरा निजज्ञानें.

तैसें ज्ञाते विद्वज्जन, ग्रंथु मराठी देखोन;
उपेक्षा न करितां करावा यत्न, पारखोनि चिद्रत्न साधावया.

क्षुद्रदृष्टीं पाहणें पाहतां, बोलू लागेल व्यासाचे ग्रंथा;
मा हे तरी मराठी कविता, सांडूनि कुटिळता पाहावी.
ज्यांसी निजसुखाची आवडी, ते प्राकृतीं न काढिती खोडी;
घेतील ज्ञानगर्भाची गोडी, अवस्था गाढी परमार्थी.
जे साचार परमार्थी, ते अधिकारी ये ग्रंथीं;
ज्यांसी भागवतीं भक्ती, ते पावती निजसुख.
कालचाचि आजि उगवला, तो सूर्य काय म्हणावा शिळा;
कीं आजिचा अग्नि सोंवळा, कालिचा काय वोंवळा म्हणों ये.
तेवीं सनकादिकांचें जें ज्ञान, तेंचि मराठीभाषेमाजी जाण;
येथें ठेवूं जातां दूषण, दोषी आपण होइजे.
कां सुवर्णाचें केलें सुणें, परी तें मोलें नव्हेचि उणें;
तेवीं सनकादिकांचीं ज्ञानें, देशभाषा हीनें नव्हतीच.
जेवीं कां गुळाचें कारलें केलें, परि तें कडूपणा नाहीं आलें;
तेवीं हंसगीत मराठें झालें, नाहीं पालटलें चिन्मात्र.
जें मोल मुकुटींच्या हेमासी, तेंचि मोल सुवर्णश्वानासी;
जो कां ग्राहिक सुवर्णासी, दोघे दोघांसी समत्वें.
तैसें आत्मानुभवी जे येथें, ते मानितील या ग्रंथातें;
येर ते हेळसितील यातें, निजभावार्थें न घेती.
जे वंदिती कां निंदिती, ते दोघे आम्हां ब्रह्ममूर्ती;
हे निजात्मभावाची प्रतीती, केली निश्चितीं जनार्दनें.
जनार्दनकृपादृष्टीं, माझ्या मराठ्या आरिखा गोष्टी;
रिघाल्या एकादशाचे पोटीं, स्वानंदतुष्टीं निजबोधें.

संस्कृतप्राकृतपरवडी, सज्ञान सेविती स्वानंदगोडी;
गाय काळी आणि तांबडी, परी दुधीं वांकुडी चवी नाहीं.
तेवीं संस्कृतप्राकृतभाखा, ब्रह्मासी पालट नाहीं देखा;
उभय अभेदें वदला एका, साह्य निजसखा जनार्दन.

**एकनाथ**

---

२

# समर्थांचें संभाजी राजास पत्र

[ शिवछत्रपतींच्या मृत्यूनंतर संभाजी महाराज गादीवर बसले. थोड्याच दिवसांत त्यांच्या अत्याचारांचा व दुर्वर्तनाचा बोभाटा रामदासस्वामींच्या कानीं पडला. तेव्हां त्यांना उपदेशाच्या दोन गोष्टी सांगण्यासाठीं समर्थांनीं पुढील ओंवीबद्ध पत्र लिहिलें. त्यांत समर्थांच्या राजकारणनिपुणतेचा उत्कृष्ट नमुना पहावयास मिळतो. उग्रता सोडून द्यावी; मागील अपराधांची क्षमा करून कारभारी व प्रजाजन राजी राखावे; अखंड सावधानवृत्ति ठेवून शत्रूंची रग जिरवावी; व महाराष्ट्र-राज्याची जोपासना करावी—सारांश शिवाजी महाराजांच्या कीर्तीला अनुरूप असें वर्तन करावें, असा या पत्राचा इत्यर्थ आहे ]

अखंड सावधान असावें । दुश्चित कदापि नसावें ।
तजवीज करीत बसावें । एकांत स्थळीं ॥ १ ॥

कांहीं उग्र स्थिति सोडावी । कांहीं सौम्यता धरावी ।
चिंता पराची लागावी । अंतर्यामीं ॥ २ ॥

मागील अपराध क्षमा करावे । कारभारी हातीं धरावे ।
सुखी करून सोडावे । कामाकडे ॥ ३ ॥

पाणवठी तुंब निघेना । तरी मग पाणी चालेना ।
तैसें जनाच्या मना । कळलें पाहिजे ॥ ४ ॥
जनाचा प्रवाह चालिला । म्हणजे कार्यभाग आटोपला ।
जन ठाईं ठाईं तुंबला । म्हणजे तें खोटें ॥ ५ ॥
श्रेष्ठीं जें जें मेळविलें । त्यासाठीं भांडत बैसलें ।
तरी मग जाणावें फावलें । गलीमासी ॥ ६ ॥
ऐसें सहसा करूं नये । दोघे भांडितां तिसऱ्यासी जाये ।
धीर धरुनि महत्कार्ये । समजूनि करावें ॥ ७ ॥
आधींच पडली धास्ती । मग कार्यभाग होय नास्ती ।
या कारणें समस्तीं । बुद्धि शोधावी ॥ ८ ॥
राजी राखतां जग । मग कार्यभागाची लगबग ।
ऐसें जाणोनियां सांग । समाधान राखावें ॥ ९ ॥
सकळ लोक एक करावे । गलीम निवटूनि काढावे ।
येणें करितां कीर्ति धांवे । दिगंतरीं ॥ १० ॥
आधीं गाजवावे तडाके । तरी मग भूमंडळ धाके ।
ऐसें न करितां धक्के । राज्यास होती ॥ ११ ॥
समय प्रसंग ओळखावा । राग निपटूनि काढावा ।
आला तरी कळों न द्यावा । जगामाजीं ॥ १२ ॥
राज्यामध्यें सकळ लोक । सलगी देऊनि करावे सेवक ।
लोकांचे मनामध्यें धाक । उपजोंचि नये ॥ १३ ॥
बहुत लोक मेळवावे । एकविचारें भरावे ।
कष्ट करोनि घसरावें । म्लेंच्छावरी ॥ १४ ॥

आहे तितुकें जतन करावें । पुढें आधीक मेळवावें ।
महाराष्ट्र राज्य करावें । जिकडे तिकडे ॥ १५ ॥
लोकीं हिंमत धरावी । शर्तीची तरवार करावी ।
चढती वाढती पदवी । पावाल येणें ॥ १६ ॥
शिवराजास आठवावें । जीवित तृणवत् मानावें ।
इहलोकीं परलोकीं रहावें । कीर्तिरूपें ॥ १७ ॥
शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा साक्षेप ।
शिवरायाचा आठवावा प्रताप । भूमंडळीं ॥ १८ ॥
शिवरायाचें कैसें बोलणें । शिवरायाचें कैसें चालणें ।
शिवरायाची सलगी देणें । कैसी असे ॥ १९ ॥
सकळ सुखाचा केला त्याग । करूनि साधिजे तो योग ।
राज्यसाधनाची लगबग । कैसी केली ॥ २० ॥
त्याहुनि करावें विशेष । तरीच म्हणवावें पुरुष ।
याउपरी आतां विशेष । काय लिहावें ॥ २१ ॥

**रामदास**

---

३

# मरणोन्मुख दुर्योधनाचा बाणेदारपणा

[ भारतीय युद्धाचा शेवट दुर्योधनाच्या मरणाने झाला. गदायुद्धांत दुर्योधन खरोखर भीमालाही जड़च होता. परंतु श्रीकृष्णानें युक्तीनें केलेल्या सूचनेप्रमाणें जेव्हा भीमानें दुर्योधनाच्या मांडीवर प्रहार केला, तेव्हां तो मरणोन्मुख होऊन पडला. त्या वेळी मागील दुष्कृत्यांचा सूड घेण्याच्या बुद्धीनें भीमानें

अशा विकल स्थितींतही त्याला लाथ मारून त्यावर वाटेल तसें तोंडसुख घेतलें. त्या वेळीं श्रीकृष्ण म्हणाला, "भीमा, जाऊं दे आतां त्याला ! मेलेल्याला फिरून मारण्यांत काय अर्थ आहे ?" या टोमण्यानें मरणाच्या दारीं पडलेल्या दुर्योधनाला अधिकच संताप आला, व त्यानें आपल्या बाणेदार स्वभावास साजेसें खरमरीत उत्तर दिलें. हा प्रसंग पुढील उताऱ्यांत वर्णन केला आहे. खोंचदार संवादप्रसंगीं कविवर्य मोरोपंताची लेखणी कशी सफाईनें चालते हें या उताऱ्यांत चांगलें नजरेस येईल ]

केशव म्हणे, 'सुभट हो ! मृतमारण हें तुम्हां नव्हे युक्त ।
मेला तैंच, गुरूंचें जेव्हां याणें विलंघिलें उक्त ॥ १ ॥

मित्र नव्हे, शत्रु नव्हे, आतां बोलोनि काय या खोडा ? ।
सोडा मृतपापकथा; शीघ्र चला, दिवस राहिला थोडा ॥ २ ॥

मेला दुर्जन, झालें बहु बरवें, सर्व वारली पीडा ।
खळ साधुपदा भोगित होता, बक जेविं हंसखगनीडा ' ॥ ३ ॥

या स्वाधिक्षेपें तो नृप उठला धरुनियां मनीं राग ।
आगस्करघातार्थी पुच्छच्छेदार्तधी जसा नाग ॥ ४ ॥

कोपें कृष्णासि म्हणे, "आइक रे कंसदासदायादा ! ।
निर्लज्जा ! कपटा तव हृदया तासि गांठि जसि नदा यादा ॥ ५ ॥

या फाल्गुनासि सांगुनि कपट, हळुच खूण दाखवुनि भीमा ।
त्वां मोडविल्या माझ्या मांड्या, त्वत्कैतवा नसे सीमा ॥ ६ ॥

कपटोपायें मारुनि ऋजुसंगर बहु सहस्त्र कवि राजे ।
लज्जा, दया नसे तुज; सुभटांत त्वत्पटुत्व न विराजे ॥ ७ ॥

जो धर्मयुद्धदुर्जय वरुणा, धनदा, द्युपा, यमा, रविला ।
त्वां स्त्रीपूर्व शिखंडी करुनि पुढें आपगेय मारविला ॥ ८ ॥

शिकवुनि धर्मा 'अश्वत्थामा मेला' असें अलीक रणीं ।
गुरुघातार्थ वदविलें त्वां स्पष्ट; तुझी नव्हे बरी करणी ॥ ९ ॥
प्रियसुतशोकीं बुडवुनि, करवुनि समरांत आयुधन्यास ।
त्वां मरणोन्मुख केलें, असतां सामर्थ्य आयु धन्यास ॥ १० ॥
द्रुपदसुत प्रायगतब्राह्मणशिर तुजसमक्ष जो कापी ।
ब्रह्मण्य कसा रे ! तूं ? कैसा तो त्वां न वारिला पापी ? ॥ ११ ॥
कर्णे स्वकवचकुंडलधनदानें शक्ति संग्रहीं केली ।
जी अर्जुनीं पडावी, ती त्वां तुच्छीं घटोत्कचीं नेली ॥ १२ ॥
तैसाचि अश्वसेनव्याळशर छद्म करुनि चुकवीला ।
मारविलें त्वां चक्रव्यसनीं कर्णा अशाहि सुकवीला ॥ १३ ॥
भीष्मासीं, कर्णासीं, गुरुसीं, मजसीं न कपट करितास ।
हरितास क्षितिस न तूं, वाढविसि कुटिलपणेंचि चरितास ॥ १४ ॥
आम्हां असे बुडविले त्वां बहु निजधर्मनिरत कपटानें ।
झांकिल कसें अनार्या ! स्ववदन यदु सुरसभेंत न पटानें ?" ॥ १५ ॥
देव म्हणे "गांधारे ! मेलासि सपुत्रबंधु तूं दुरितें ।
सच्छळकर्म, सुदारुण वज्र तसें, बहु दृढासही चुरितें ॥ १६ ॥
भीष्म द्रोण सुदुर्जय, परि मेले हे तुझ्याचि पापानें ।
ज्यां प्रबळां जोडावे हात जयंताच्चियाहि बापानें ॥ १७ ॥
होता सुरासुरनरोरगदुर्जय कर्णही जसा रुद्र ।
व्यसनीं पडोनि मेला; कीं, तवशीलानुवर्तक क्षुद्र ॥ १८ ॥
म्यां विनविलें परोपरि परि भाग खळा ! न देववे, नाकीं ।
तुजहुनि भला शतगुणें वदले शक्रादि देव वेना कीं ॥ १९ ॥

त्वां भीमासि विष दिलें, तुज योग्य न काय पतन गरदा हें ।
मेळविलें अघ पांडवदाहें बहु जेविं शतनगरदाहें ॥ २० ॥
दुःशासन केश धरुनि कृष्णेसि जधीं सुयोधना ! कर्षी ।
म्यां तेव्हांचि वधुनि तुज हृष्ट करावे सुयोध नाकर्षी ॥ २१ ॥
कितव शकुनि करुनि पुढें धर्मात्मा धर्मराज नागविला ।
जागविला चिंतेनें, तेरा वर्षें सदैव भागविला ॥ २२ ॥
कृष्णा जयद्रथानें हरिली, जसि रावणें अनादि सती ।
जी साक्षाज्जगदंबा शुद्धा अप्राकृता जना दिसती ॥ २३ ॥
बहुतांनीं विरथ करुनि वधिला अभिमन्यु एकला बाळ ।
तें अघ करिल तुझी, जसि वृद्धाची निर्धनत्व, आबाळ ॥ २४ ॥
'केला घात अधर्में,' असि मजवरि घालितोस कां आळ ।
व्याळसम पोपिला जो तो त्वद्धर्मचि खळा ! तुझा काळ ॥ २५ ॥
वृद्ध न उपासिले, गुरुशुक्रांचे ऐकले न उपदेश ।
तृष्णांध मूढ लोभी खळ तूं होसील केविं सुपदेश ?" ॥ २६ ॥
राजा म्हणे, "विसरलों मी, सांगा करुनि पाठ वेदा, न ।
पात्रीं न दिलें ऐसें एकहि मजला न आठवे दान ॥ २७ ॥
अखिलाहि भोगिली म्यां पृथ्वी, परमस्तकीं दिला पाय ।
स्वंततर कवण मजहुनि ? आतां कर्तव्य राहिलें काय ? ॥ २८ ॥
अभिमुखशस्त्राघातें समरमखामाजिं वेंचिला काय ।
स्वंततर कवण मजहुनि ? आतां कर्तव्य राहिलें काय ? ॥ २९ ॥
मद्भोग मदैश्वर्य प्रेक्षुनि वदले समस्त अरि 'हाय' ।
स्वंततर कवण मजहुनि ? आतां कर्तव्य राहिलें काय ? ॥ ३० ॥

सत्कारील सुरांचा ससुहृत्सुतसोदरा मला राय ।
स्वंततर कवण मजहुनि ? आतां कर्तव्य राहिलें काय ? ॥ ३१ ॥
ज्या वीरसू तयांला झाली मान्या जगत्रयीं माय ।
स्वंततर कवण मजहुनि ? आतां कर्तव्य राहिलें काय ? ॥ ३२ ॥
प्रविहतसंकल्प तुम्ही झालां, सर्वहि बुडाल शोकांत ।
सकळ सहायांसह मी प्रमुदित होईन वीरलोकांत ! " ॥ ३३ ॥

**मोरोपंत**

---

४

# श्रीकृष्णाच्या बालपणांतील एक आठवण

[ श्रीकृष्णाच्या विद्यार्थिदशेंतील त्याचा जिवलग मित्र सुदामा हा दुर्दैवानें दारिद्र्यांत दिवस काढीत होता. आपल्या मित्राकडे गेल्यास कांहीं मदत मिळेल असा त्याच्या पत्नीनें सल्ला दिला. त्याप्रमाणें तो श्रीकृष्णाच्या भेटीस गेला. सुदाम्यानें प्रेमानें आणलेल्या पोह्यांचा श्रीकृष्णानें अत्यंत आवडीनें स्वीकार केला व आपल्या बालमित्रास उज्जयिनी नगराचा राजा केला. ह्या सर्व सत्काराची हकीकत पुढें सुदामा आपल्या पत्नीस सांगत आहे असें या काव्यांत कवीनें वर्णिलें आहे. श्रीकृष्ण व सुदामा द्वारकेमध्यें प्रेमानें बालपणींच्या आठवणी काढीत असतां कृष्णानें पुढील प्रसंगाचें वर्णन केलें ]

विद्याभ्यासार्थ होतों निजगुरुसदनीं तेधवां एकदा जें ।
झालें वृत्त प्रिये ! तें कथुनि यदुवरें मोहिलें चित्त माझें ।
तें मीही तूज आतां जलरुहनयने ! सांगतों ऐक जाये ।
प्रेमानें वर्णितां हें घडि घडि हरिच्या नीर नेत्रांबुजां ये ॥ १ ॥

बंधो ! तें नित्य केव्हां तरि कुतुक तुझ्या आठवे कीं मनाला ।
आणाया इंधनाला स्वगुरुयुवतिनें धाडिलें जैं वनाला ।
कालावांचून आला जलधर, सुटला वात, अंधार झाला ।
भ्याला आत्मा करालाहिकुटिलतरलांला सशब्दां विजांला ॥ २ ॥

भास्वान् मावळला, पयोद वळला, स्थूलांबुवाहोत्पल— ।
व्रातांहीं बहु पीडलों, स्थिर वनीं दीलें न राहों पल ।
वर्षे कांकडलों, जळांत पडलों, झाला क्षणें दिग्भ्रम ।
सारे बाळ, कराल काळ; शिरला चित्तीं महा संभ्रम ॥ ३ ॥

तो निम्नोन्नतभूविभाग न कळे सर्वत्र झालें वन ।
आम्हां काळमुखासमान गमलें सर्वांसही तें वन ।
अंधारीं धरुनी परस्पर करीं स्वाध्वभ्रमा पावुनी ।
प्रत्यूषावधि हिंडलों, मग परामर्षीसि आला मुनी ॥ ४ ॥

झालों होतों श्रमानें विकळ सकळही काननीं वृष्टिवातें ।
आचार्यें धावुनीयां स्वहृदयिं धरिलें जेविं आत्मोद्भवातें ।
केलें आघ्राण माथां, सकरुण गुरु तो वर्षला प्रेमतोया ।
मच्चित्ता आठवे श्रीगुरुचरणदयाप्राप्तसत्कार तो या ॥ ५ ॥

" केले हे क्लेशपात्र प्रियतमहि तुम्हीं अस्मदर्थ स्वकाय ।
या कर्माहूनि लोकीं गुरुसि समुचिता दक्षिणा येथ काय ।
पावा माझ्या प्रसादें सकलहि सकला शुद्ध संपूर्ण विद्या ।
शिष्याच्या हृत्तमाचा प्रशमकर करीं ज्ञाननामा रवि द्या " ॥ ६ ॥

एवं श्रीगुरुनें प्रसाद सदयें केला मला तो स्मरे ।
बंधो ! देशिकपादपद्मभजनें संसार हा ओसरे ।

झालीं यापरि जीं अनेक कुतुकें तीं या मनीं जागती ।
भार्ये ! देव असा उदंड वदला लोकेश माझा गती ॥ ७ ॥

भार्ये ! ही कथिली कथा निजमुखें जेव्हां जगन्नायकें ।
तेव्हां उत्तर मीं दिलें हरिस जें तें तूं बरें आयकें ।
' लोकेशा ! जनसंग्रहार्थ गुरुच्या गेहीं तुझें राहणें ।
अस्मद्भाग्यहि थोर कीं श्रुतिनुता ! लीला तुझ्या पाहणें ॥ ८ ॥

ज्याचा वेदमय स्वदेह, कुशलाधार, त्रिलोकीपिता ।
जो वर्णाश्रमधर्मकल्पक, कवि, श्रुत्यध्वसंस्थापिता ।
विश्वाचा गुरु, तो स्वयें गुरुकुळीं विद्यार्थिभावें वसे ।
हें तों लोकविडंबन; प्रभुवरा अन्यार्थ येथें नसे ' ॥ ९ ॥

**मोरोपंत**

---

५

# दमयंती व हंस

[ खालील उतारा रघुनाथपंडितकृत नलदमयंतीस्वयंवराख्यानांतून घेतला आहे. निषध देशचा राजा नल यानें विदर्भ देशची राजकन्या दमयंती इच्या रूपगुणांची कीर्ति ऐकिली होती, व तिचें पाणिग्रहण कसें करतां येईल या चिंतेंत तो होता. एके दिवशीं मृगया करीत असतां एका तळ्याचे कांठीं निजलेल्या एका राजहंस पक्ष्यास त्यानें पकडलें, पण त्याची करुणा येऊन सोडूनही दिलें. या उपकाराची फेड करण्यासाठीं दमयंती मी तुला मिळवून देतों असें हंसानें नलाला आश्वासन दिलें. नलाचा निरोप घेऊन हंस जो उडाला तो विदर्भ देशाची राजधानी कुंडिनपुर येथें खालीं उतरला, व राजकन्या ज्या उद्यानांत सखीजनांसह विहार करीत होती तेथें पोंचला. या पुढील थोडीशी हकीकत या उताऱ्यांत आहे ]

तो मंडळाकृति फिरे उतरावयाला,
भैमीमुखेंदुपरिवेष म्हणों तयाला. ।
तेथें महीवर असा खग बैसताहे
कीं सुंदरी निज कुतूहल जेविं पाहे. ॥ १ ॥

जो बैसतां चपळ पक्षपुटीं धरेला
हाणीतसे फडफडां ध्वनि हा उदेला; ।
पाहे तया खगवरासि वरानना हे
मानी मनीं नवलही, मग बोलताहे ॥ २ ॥

असा पक्षी लक्षी बहु-विहग-लक्षीं न मिळता
सुवर्णी जो वर्णी, वद कवण वर्णी कवयिता ? ।
अगाई ! हा बाई त्वरित वरि जाईल पळुनी,
धरूं जातें हातें हळुहळु तयातें न कळुनी. ॥ ३ ॥

ऐसें वदे मग तयास धरावया हे
तैं होय हंसगमना, पहिलीच आहे. ।
वाजेचना वलय, नूपुरनाद नोहे,
तो तद्गतीस निरखूनि कसा न मोहे ? ॥ ४ ॥

हे मंद-मंद-पद सुंदर कुंददंती,
चाले जसा मदधुरंधर इंद्रदंती; ।
हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते
निष्कंपकंकण करासि पुढें करीते. ॥ ५ ॥

गवसलाच असा खग भासला,
तंव तदीय सखीजन हांसला. ।

मग सर्वेचि बुझावुन हांकिला,
उडविलाचि पिटाळुनि लाविला. ।। ६ ।।

कांहीं उडोनि गगनीं मग नीट येतो,
नाहींच दूर न समीप बसे तसा तो; ।
पाहे सुधाकरमुखी कलहंसराया,
लाहे मनोरथ तयास पुन्हा धराया. ।। ७ ।।

आणीकही पद न वाजत मंद चाले,
जो चालतां पदर सांवरिला न हाले. ।
हेही करी निजकरीं खग सांपडेसा,
तोही हळूहळुच होय पलीकडेसा. ।। ८ ।।

मदगजगमनेनें मागुती चाल केली,
विनततनुलता हे तत्समीपास गेली. ।
पुनरपि फडके तो फारसा दूर नाहीं,
जवळि जवळि ऐसा भासला हंस कांहीं. ।। ९ ।।

हंसें तदा चतुरसंमत युक्ति केली,
ते चालवीत सुतनू बहु दूर नेली; ।
छाया तियेशि दुसरी, तिसरी वनाळी,
जे सांवळी युवतितुल्य दिसे निराळी. ।। १० ।।

तया वनांत एकली । विलासिनी विलोकिली ।
मदें भरोनि डोलतो । तियेस हंस बोलतो ।। ११ ।।

**रघुनाथपंडित**

---

६

# महाराष्ट्राची भूपाळी

प्रभावशाली परममंगला महाराष्ट्रदेशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ! ॥ ध्रु० ॥
सह्याद्रीच्या सहस्र शिखरीं उन्नत झालेला
गोदा कृष्णा भीमा ह्यांनीं पुनीत केलेला. ।
पश्चिम सिंधु बंधु पाठीशीं पूर्वोदधि जामात
विंध्याद्रीची उंची लक्षी सातपुडा प्रांत. ।
(चाल) अलंकार जयाचे पैठण पंढरपुर,
आळंदी चाफळ देहू तुळजापुर,
कीं पुणें रायगड शिवनेरी सुंदर,
रज:कणाला लावुनि भाळीं महाराष्ट्र देशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ॥ १ ॥

वरी नाचणी भात पिकवितो कोंकणचा प्रांत,
गहूं बाजरी कापुस शाळू देशावर होत ।
कांबळ खांदी वहाण पायीं डोइस मुंडासें
श्यामलवर्णी सान रूप तव सोज्वळ मज भासे ।
(चाल) ते विळे कोयते शस्त्रें हीं हातिचीं,
तीं बटें ठेंगणीं भीमेच्या कांठिचीं,
मिळविती धुळीला कीर्ति बादशाहिची,

वीरांना त्या वंदन अमुचें महाराष्ट्र देशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ॥ २ ॥

वीर प्रतापी राय शिवाजी छत्रपती आमुचा
धर्म रक्षण्या एकचि केला घोष स्वराज्याचा. ।
भगवा झेंडा धन्य करी हें आनंद-वन-भुवन
स्वातंत्र्याच्या जरिपटक्याला लक्ष वेळ नमन.।

(चाल) पुण्याई पुरली शिवभूपाची पुढें,
पेशवे पुण्याचे वळले अटकेकडे,
साम्राज्य मराठी पसरे चोहोंकडे,
स्मरणें स्फुरतें हृदय वांकतें महाराष्ट्र देशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ॥ ३ ॥

भीमा वाही तिच्या सुरावर गाई जी गीत
तीच मराठी भाषा अमुची ठसली हृदयांत ।
ज्ञानेशाची ओंवी अभंगवाणी तुकयाची
श्लोक वामनी जिला भूषवी आर्या मयुराची ।

(चाल) एकनाथ चोखा गोरा ज्ञानेश्वर,
रामदास तुकया नामा मुक्तेश्वर,
नच जात पाहातो भक्तांची ईश्वर,
संतमंडळा लववूं माथा महाराष्ट्र देशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ॥ ४ ॥

मुक्ताबाई तशी जनाई आळविते देवा
सद्भावाला सहज लाभतो मोक्षाचा ठेवा ।

गतवीरांचीं पुण्यचरित्रें गाउनि अंगाई
बाळा करिते महाराष्ट्रिची भगिनी वा आई ।
(चाल) शोभवी अहल्या होळकराची पुरी,
ती सती रमा भटवंशाला उद्धरी
स्वातंत्र्यलक्ष्मी प्रचंड संगर करी,
प्रणिपात असो ह्या देवींना महाराष्ट्र देशा
तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा ॥ ५ ॥

("माझें रामायण" या पुस्तकांतून
संपादकांच्या परवानगीनें)

---

७

# वीरमती

[ हिंदुस्तानच्या इतिहासांत रजपूत वीरांच्या अलौकिक शौर्याचीं अनेक उदाहरणें आहेत. या शौर्याला रजपूत वीरांगनांचें तेज व निःसीम पातिव्रत्य हीं पुष्कळ वेळां उत्तेजक होत असत. समरांगणावर पराक्रम गाजवून विजयी होऊन आलेल्या पतीस त्या पंचारती घेऊन सामोऱ्या जात. पण लढाईतून पळ काढून आलेल्या भ्याडाचा मात्र त्या तीव्र शब्दांनीं धिक्कार करीत. अशाच एका प्रसंगाचें वर्णन पुढील काव्यांत आहे. जोधपूरचा राणा जसवंतसिंग एकदा रणांत पराभूत होऊन माघारा फिरला. त्या वेळीं राणी वीरमतीनें त्याला जो निरोप पाठविला तो पुढें दिला आहे ]

पतिरणविन्मुखतेची दुर्वार्ता आयकून वीरमती ।
रागेजे; त्याविषयीं होय तिची तेधवां विषण्ण मती ॥ १ ॥

मान्य न वीरमतीला अयशाचें मळमळीत सौभाग्य ।
येतें वैधव्य यशें, तिज गमतें साच उघडिलें भाग्य ॥ २ ॥
करिती गजर तयाचा, जर नाथ तिचा रणीं लढत मरता ।
परि तापद होय तिला वार्ता जीवंत तो फिरे परता ॥ ३ ॥
समरास पुरुष भ्याला सत्य तयें स्वयश मळविलें धवल ।
मुख झालें तें काळें दूर बरें; अशुभ मज नको जवळ ॥ ४ ॥
चिंतून मनीं ऐसें शीघ्र तिनें बंद करविली वेस ।
पाठविला जसवंता दूताकरवीं सखेद संदेश ॥ ५ ॥
" नृपवंश उदेपुरचा सूर्योद्भव गाजते जगीं ख्याती ।
ध्याती तयास सारे तद्यश कवनीं घरोघरीं गाती ॥ ६ ॥
वीर पराक्रमशाली किती उदेले तयांत आजवरी ।
गणती करवे कोणा? कवण तयांचा रणांत हात धरी ॥ ७ ॥
समरव्रत जागविलें घेऊन शिरें करांत आमरण ।
कर्तव्य वाटलें त्या वीरां कुलकीर्तिरक्षणीं मरण ॥ ८ ॥
गोष्ट असो पुरुषांची, समराचें सहज त्यांजला कृत्य ।
त्यासाठीं त्यां घडिलें, दिधलें तैसेंच त्यांस सामर्थ्य ॥ ९ ॥
परि तनु कोमल ज्यांची जातिलतेवर जसें हसे सुमन ।
सुमन प्रेमल ज्यांचें लव ताप सहावया असे क्षम न ॥ १० ॥
शौर्य रणीं गाजविलें ऐशा सकुमार सदय अबलांनीं ।
पुरुषां स्फुरण चढविलें स्वकुलाची राखिली जगीं बाणी ॥ ११ ॥
त्या वीरकुलीं वीरोत्पन्ना मी नम्र आपली दासी ।
प्रेमें वीरांबेनें मज वाढविलें धरून हृदयाशीं ॥ १२ ॥

खेळ धनुर्बाणाचे शिकवी मज वीरबंधुची जोडी ।
साहसपराक्रमाची बालपणीं लागली मला गोडी ॥ १३ ॥
वीरपती मिळवावा होता निर्धार हा मनीं केला ।
प्रेमें तुम्हांस वरितां तो पण सिद्धीस वाटलें गेला ॥ १४ ॥
हर ! हर ! परि मी फसल्यें, ढांसळलें सर्व मम मनोराज्य ।
धरिला गुलाबभावें निज हृदयीं कर्णिकार मीं त्याज्य ॥ १५ ॥
वीर म्हणून जयाच्या अंकीं निर्धास्त झोंप मीं घ्यावी ।
वीर नव्हे, पुरुष नव्हे, जो दुर्बल भीरुता रणीं दावी ॥१६॥
अबलाच ती म्हणावी; पुरुषाचा मात्र घेतला साज ।
ओष्ठीं कां मिरवावी मिशी तिची राखवे न जर लाज ॥ १७ ॥
जन्मून वृथा जगतीं धरणीला मात्र जाहलां भार ।
स्वकरीं धरून निष्फळ विटाळिली विजयपात्र तलवार ॥ १८ ॥
काय जिणें, जर न घडे करणी, तुकवी जियेस जग मान ।
तो वांचला म्हणावा ज्या देती सान थोर जन मान ॥ १९ ॥
अपमानाचें जीवित ! मरण बरें फार फार त्याहून ।
मान नव्हे, प्राण तुम्ही आलां समरांत आज वाहून ॥ २० ॥
प्राण प्राणास रुचे; दिसतें बाह्यस्वरूप आवडतें ।
जातां प्राण नकोसें होय न का रम्य रूप आवडतें ? ॥ २१ ॥
विगतप्राणशरीर प्रेतच ! कां आणितां घरा सांगा ।
प्रियकरशवही अशुभच गृहीं; स्मशानींच त्याजला जागा ॥ २२ ॥
नव्हतें तुम्हांस, परि मीं तुमच्या क्षत्रियव्रतासही वरिलें ।
जगलां तुम्ही, परि मम सौभाग्य तया व्रतासवें सरलें ॥ २३ ॥

झाल्यें विगतधवा मी, सहगमनच योग्य जी सती तिजला ।
त्या दुर्लभ पुण्याची करावया जोड जीव हा सजला ॥ २४ ॥
नेलें शव स्मशानीं जीवंत उठे कधीं कधीं म्हणती ।
गणती पिशाच्च परि तें, त्याचे जिवलगहि त्यास अवगणती ॥२५॥
विगत-क्षात्रव्रत-तनु तुमची निर्जीव त्यापरी उठली ।
डोळांही न पहावी; तिज मग सहगमनपात्रता कुठली ॥ २६ ॥
पतिशव न मिळे तेव्हां स्वपतीची करविती सती प्रतिमा ।
सेव्य धनुर्बाण मला जी साची क्षत्रियव्रतप्रतिमा" ॥ २७ ॥

**विनायक**

---

८

# (१) वीरमरणाला शोभण्याजोगें गाणें

[प. वा. राम गणेश गडकरी (गोविंदाग्रज) यांच्या "पुण्यप्रभाव" नाटकांतून पुढील दोन करुणरसपर पद्यें उद्धृत केलीं आहेत. एका पतिव्रतेचा छळ करून तिच्या लहान अर्भकास ठार मारण्यास प्रवृत्त झालेल्या आपल्या पतीच्या हातून असलें दुष्कृत्य होऊं नये म्हणून कालिंदी आपल्या स्वतःच्या मुलाचा बळी देते; व नंतर अंधेऱ्या रात्रीं स्मशानांत जाऊन त्यास मूठमाती देते. पतिव्रतेचें पातिव्रत्य रक्षण करण्याचे कामीं आपल्या अपत्यास जणुं वीराचें मरण आलें अशा भावनेनें तिनें पुढील गाणें गायिलें आहे. दुसऱ्या पद्यांत आपल्या बाळास तिनें शेवटचा निरोप दिला आहे]

निज बाळारे गाणें गाते आई । करिं आतां जो जो गाई ॥ धृ ॥
तुज जन्म दिला बाळा त्यांची स्वारी । लाखांत शिपाई भारी ॥

बघ गरदीही बुरुजांची तुजभवतीं । दगडांची त्यांची छाती ॥
काळिकाळाशीं झगडणार खंबीर । हे तुझेच हिरवे वीर ॥
जीवांच्या जळल्या ज्योती ।
आकाशीं तारा होती ।
मोलांचीं माणिकमोतीं ।
त्या डोळ्यांनीं देवराय तुज पाही । करिं आतां जो जो गाई ॥ १ ॥
दों दिवसांची ही दुनियेची वसती । सारखीच असती नसती ॥
तुज ऐसा हा बाळ नऊ नवसांचा । हातचा किं रे जायाचा ॥
ऋणानुबंधाच्या तुटल्या आतां गांठी । मग कुठल्या भेटी गांठी ॥
हें देवा—घरचें लेणें
नशिबानें देणें घेणें ।
कुणितरी कुणास्तव रडणें ।
तीं रडणारीं रडतिल धाई धाई । करिं आतां जो जो गाई ॥ २ ॥

---

## (२) निरोप द्यावा आतां

निरोप द्यावा आतां । बाळा । टाकुनि जाते माता ॥ ध्रु० ॥
माझें माझें म्हणुनि आजवर जें लेणें ल्यालें ।
बाळ गुणाचें, हाय ! कुणाचें आज परी तें झालें ? ॥ १ ॥
हे तारांनो, उचंबळूं द्या करुणारसरंगा ।
अखंड वाहो नवतेजाच्या पुण्याईची गंगा ॥ २ ॥



श्री. राम गणेश गडकरी

घटकेचा संसार संपला, लटका ठाव ठिकाणा; ।
वनदेवींनो. पदरीं घ्या हा माझा राजस राणा ॥ ३ ॥
अनाथ दुबळा देह पडे हा आई नाहीं त्याला ।
फुलत्या फुलवंतीची यावर मायापांखर घाला ॥ ४ ॥
भुतें जागतां उठतां दचकुनि हृदयींचा हा ठेवा ।
काळ्या राती जित्या फुलांचा खडा पहारा ठेवा ॥ ५ ॥
कळतें तुम्हां सारें कांहीं, आहा फुलांच्या माता ।
लोभ असूं द्या इथून पुढतीं, नाहीं बोलत आतां ॥ ६ ॥

**गोविंदाग्रज**

( रा. ग. गडकरी )

---

९

# सारीं फुलेंच फुलें !

[ आधुनिक मराठी कवींमध्यें प. वा. रेव्हरेंड् नारायण वामन टिळक यांचा दर्जा फारच मोठा आहे. मराठी काव्याला नवीन वळण लावून इंग्रजी कवितेंतील उत्कृष्ट प्रकार मराठींत आणण्याचा प्रयत्न प्रथम केशवसुत ( कृ. के. दामले ) व टिळक यांनींच केला ]

## श्लोक

आकाशांत फुलें, धरेवर फुलें, वाऱ्यावरीही फुलें,
माझ्या गेहिं फुलें, धरेवर फुलें, भूगर्भि सारीं फुलें !

माझें चित्त भुले, सुगंध सुटले ! हें विश्व आनंदलें !
कोणीं आकळिलें ? कुणास कळलें उद्यान विस्तारलें ? ॥ १ ॥
नक्षत्रें, सुमनें, विहंगम, मुलें, काव्यें, मणी हीं जरी
नावें भिन्न; खरोखरी मज फुलें हीं रम्य सारीं तरी !
घेतों ह्यांतुन थोडका रस ! पुन्हा त्याच्याकडे धांवतों,
धांवाधांव म्हणा, परी हिजमधें कैवल्य मी पावतों ॥ २ ॥
जातीच्या भ्रमरास " सोडुन फुलें ये, फोड हीं लांकडें "
ऐसें कोण म्हणेल ? कोण भलतें घालील हो सांकडें ?
देवानेंच जयास पुष्पहृदयीं खेळावया निर्मिलें,
त्याला वृत्ति दुजी रुचेल कुठुनी ? प्राणा जरी घेतलें ! ॥ ३ ॥
बोला ' चंचल हा, क्षणांत गगनीं धांवे, क्षणीं भूवरी,
हा वाऱ्यावर ! हा गृहीं ! निजमनीं ! हा भूमिच्या भीतरीं !'
हांसा मानुनियां निरर्थ मम हो ह्या गोड गुंजारवा,
माझें जन्मचि हें फुलां निरविलें ! भीतों न मी मानवा ! ॥ ४ ॥

मज गमे मजसाठिं जगत्पती,
फुलवितो अवघ्या जगताप्रती !
भ्रमर मी रस सांठविं चाखुनी,
मजसमान रसज्ञ न हो जनीं ॥ ५ ॥
जाइन सोडुन ह्या जगताला,
ठेवुन हा मधुकोश तुम्हांला;
तोंवर आड नका मज होऊं !
पाप नका शिरिं हें कुणि घेऊं ! ॥ ६ ॥

---

१०

# ब्राह्मण किंवा महार मी !

[ प्रस्तुत कविता, व केशवसुतांचा " नव्या मनूंतील नवा शिपाई, " व वसंतकवि ( पटवर्धन ) यांचें " मनुष्य तितका एकच आहे " हें काव्य या सर्वांचा मतलब जवळ जवळ एकच आहे. मनुष्यपण हें सर्वत्र एकच आहे. उच्चनीचभाव, जातिभेद यांनीं माणसांत निष्कारण भेदभाव वाढून रणें माजतात. त्या भेदभावांना मी मानीत नाहीं; माझ्या हिंदभूमीच्या कुशीत जन्माला आले ते सर्व माझे बंधुच होत, असे या कवितेचें सार आहे ]

मी ब्राह्मण वा महार मी, गणीं न कवणालाच मी.
या सृष्टींतिल दिव्यपण; तेंच तेंच हें मनुजपण;
मांगल्याची ही ठेव, हीस्तव देइन मी जीव;
हिच्याहि मोला
गणी न त्याला,
महाखलाला
नीच, नीचतर गणीन मी, जन्मभूमिसेवाधर्मी. ॥ १ ॥

हिंदभूमि माझी जननी, आले हीच्या कुशींतुनी
हिरेच अवघे माझे ते, मन्मन त्यां मोहुनि जातें;
मलांत पडले,
खनींत दडले,
मुकुटीं जडले,
अवघे उचलुन घेइन मी, जन्मभूमिसेवाधर्मी. ॥ २ ॥

विपन्नता ज्यांच्यासाठीं, जीव कळवळे त्यासाठीं;
अज्ञपणा ग्रासी ज्यांतें, प्रियतर दुर्बल मज ते ते !

त्यजुनी सकलां,
रुग्णदुर्बला.
उचली बाला
जननी; तीसम वेडा मी, जन्मभूमिसेवाधर्मी. ॥ ३ ॥
मानामानाचें गोवें, कसें असे कवणा ठावें !
खाइन अवघ्यांच्या लाथा, देइन सेवेला माथा;
निजभूचें ऋण;
अवघें फेडिन,
मरून जाईन !
रक्षिन गुरुपद माझें मी, जन्मभूमिसेवाधर्मी. ॥ ४ ॥
होइन नीचाहुन नीच, करीन अवघ्यांना उंच;
ते ब्राह्मण मग महार मी, कोण गणी मग मला कमी !
कमी गणीना
काहिं म्हणेना
कुणी, तयांना
विचारतों मग कसला मी, जन्मभूमिसेवाधर्मी. ॥ ५ ॥
पांच कशाचे, हे जितुके, हिंदभूमिबालक तितुके.
मम देहाचे प्राण खरे, कसेहि असले तरि सारे !
जें वाटे तें
सांगायातें
शब्द न पुरते,
धरितों मौना यास्तव मी, जन्मभूमिसेवाधर्मी. ॥ ६ ॥

**ना. वा. टिळक**

---

११

# निशाण

( दोहा )

तुज जरि करिती काठीला लावुनियां पटखंड,
तरि तुजमध्यें वसत असे बा सामर्थ्य उदंड ॥ १ ॥

कोण नेतसे समरास सांग बरें रणधीर ?
माराया कीं मरावया कृतनिश्चय ते वीर ! ॥ २ ॥

शूरशिरांवरि धीटपणें युद्धाच्या गर्दींत,
कोण नाचतें फडकत रे स्फुरण त्यांस आणीत ? ॥ ३ ॥

तारूं पसरुनि अवजारें भेदित सिंधू जाय,
तच्छिखरीं तत्साहस तूं मूर्त न दिससी काय ? ॥ ४ ॥

उंच उंच देवायतनें भव्य राजवाडे,
तुंग दुर्गही शिरीं तुला धरितातीं कोडें ! ॥ ५ ॥

भक्ति जिथें दिव्यत्व जिथें, उत्सव जेथें फार,
तेथें तेथें दिसे तुझा प्रोत्साहक आकार ॥ ६ ॥

वीर्य जिथें ऐश्वर्य जिथें, जेथें जयजयकार,
उंचावर तेथें तेथें दिसे तुझा आकार ! ॥ ७ ॥

म्हणूनि मानवचित्ताची उंचावर जी धांव,
तीचें चिन्हच तूं—तुजला निशाण सार्थच नांव ! ॥ ८ ॥

मिळमिळीत ज्याची कविता न असे रंडागीत,
खचित जडेलचि त्या कविची तुझ्यावरी रे प्रीत ॥ ९ ॥
संसारा मी समर गणीं, उचलुनि म्हणुनि निशाण,
साद घालितों "योद्धे हो ! झटुनि मोडुनि द्या प्राण !"॥१०॥

केशवसुत
( कृष्णाजी केशव दामले )

---

१२

# नवा शिपाई

( **फटका** )

नव्या मनूंतिल नव्या दमाचा शूर शिपाई आहें,
कोण मला वठणीला आणूं शकतो तें मी पाहें !
ब्राह्मण नाहीं, हिंदुहि नाहीं, न मी एक पंथाचा,
तेच पतित कीं जे आखडिती प्रदेश साकल्याचा !

( चाल ) खादाड असे माझी भूक,
चतकोराने मला न सूख;
कूपांतिल मी नच मंडूक;

मळ्यास माझ्या कुंपण पडणें अगदीं न मला साहे !
कोण मला वठणीला आणूं शकतो तें मी पाहें ! ॥ १ ॥

जिकडे जावें तिकडे माझीं भावंडें आहेत,
सर्वत्र खुणा माझ्या घरच्या मजला दिसताहेत;
कोठेंही जा—पायांखालीं तृणावृता भू दिसते,
कोठेही जा—डोईवरतें दिसतें नीलांबर तें;

(चाल) सांवलींत गोजिरीं मुलें,
उन्हांत दिसती गोड फुलें,
बघतां मन हर्षून डुले;

तीं माझीं, मी त्यांचा,—एकच ओघ अम्हांतुनि वाहे !
नव्या मनूंतिल नव्या दमाचा शूर शिपाई आहें ! ॥ २ ॥

**केशवसुत**

---

१३

# मनुष्य तितका एकच आहे

( **अंजनीगीत** )

मनुष्य तितका एकच आहे । सत्—चित्—सरिता एकच वाहे ।
राहो नाना देशीं राहे । मूळ कसे सुटतें ? ॥ १ ॥

हिमालयाच्या तुंग शिरावरि । गंगोत्रीच्या हिममय पात्रीं ।
प्रयाग काशी या क्षेत्रांतरीं । गंगा कां बदले ? ॥ २ ॥

अमेरिकेच्या फिरे भोंवतीं । स्थिर ध्रुवाच्या बर्फप्रांतीं ।
अथवा खरतर विषुवावरती । समुद्र कां बदले ? ॥ ३ ॥

ह्याणी, जुळवी, विखरुनि टाकी । घन मेघांना क्षणें वितळवी ।
सळसळ पानांची आयकवी । तो कां वायु नव्हे ? ॥ ४ ॥
जलराशींचे तुषार उडवी । तरंग चंचल नाचूं लावी ।
लाटांचा कल्लोळ उसळवी । तो कां वायु नव्हे ? ॥ ५ ॥
वेणूंतुन मंजुल रव उठवी । लतांमधें भ्रमरास गुंगवी ।
गिरिकुहरांस घुमाया लावी । तो कां वायु नव्हे ? ॥ ६ ॥
नरकंठांतिल तारा नादवि । हंशा रड्यांचे शब्द वाजवी ।
रागरागिणी गाऊं लावी । तो कां वायु नव्हे ? ॥ ७ ॥
म्हातारीला जगभर फिरवी । पाचोळा गगनांत भिरकवी ।
तरुवर धरणीवरती नमवी । तो कां वायु नव्हे ? ॥ ८ ॥
सुसाट अथवा संतत वाहो । स्तिमित शांत वा गुंगत राहो ।
भरो दुमदुमो गगनकटाहो । वारा तो वारा ! ॥ ९ ॥
जाती अथवा धर्म मिळेना । रागद्वेषीं सख्य जुळेना ।
परि अंतरिंचा तंतु गळेना । मानवधर्माचा ॥ १० ॥
संसारांतिल पंथ जमेना । हिताहिताचा मेळ बसेना ।
परि हृदयींचा सूर बुजेना । मानवधर्माचा ॥ ११ ॥
वेशांचें वैचित्र्य सुटेना । वर्णांचेंही वैर मिटेना ।
परि अंतरिंचा रव थांबेना । मानवधर्माचा ॥ १२ ॥
बळाबळाचा झगडा चाले । जयापजय ते कलहीं रमले ।
परि अंतरिंचे वेग न विरले । मानवधर्माचे ॥ १३ ॥
जलराशींचे डोंगर उठले । परस्परांवर अपटुन फुटले ।
जलकण परि ते लेश न मुकले । आर्द्रगुणा अपुल्या ॥ १४ ॥

नाना देशीं भटकत फिरले । मनुवंशाचे रोपे तुटले ।
मूळभाव परि नाहीं सुटले । मानवधर्मीचे ॥ १५ ॥

**कवि वसंत**

( वा. ब. पटवर्धन )

---

## १४
# तो दिन

[ पुढील पद्य मध्यप्रांताचे विख्यात कवि श्री. आनंदराव टेकाडे यांच्या " आनंदगीत " नांवाच्या पद्यसंग्रहांतून उद्धृत केलें आहे. तो दिन, म्हणजे ज्या वेळीं हिंदभूमि ऐश्वर्याच्या, उन्नतीच्या शिखरास पोंचली असेल, ज्या वेळीं तिला सर्व जगभर मान्यता मिळाली असेल, असा भावी दिवस; त्या दिवसाकडे माझे डोळे सारखे लागले आहेत असें कवि म्हणतो ]

[ घेइ कडेवरती० या चालीवर ]

तो दिन ये नयनीं
घडीघडि । तो दिन ये नयनीं. ॥ ध्रु० ॥

वसति कुठेंही राहो भुवनीं,
कृति कसलीही येतां घडुनी,
अशनीं, शयनीं, भोजनिं, पानीं
तो दिन ये नयनीं. ॥ १ ॥

तूंहि भारता ! त्याच दिनावर
दृष्टी लावीं अचल, निरंतर,

व्याध जेंवि दे निज लक्ष्यावर,
कधिं न ढळे तिथुनी. ॥ २ ॥

त्या दिवसाच्या उदयासाठीं
झिजवावें मन, शरीरयष्टि,
खूण बांधुनी ही निज गांठीं
टाकिं पदा जपुनी. ॥ ३ ॥

म्यानामधली चपल भवानी
चमकुनि समरीं चपलेवाणी,
मद जगताचा नमवी चरणीं
श्री भारतजननी. ॥ ४ ॥

ग्रहमंडलिं रवि जैसा शोभे,
देहीं अथवा प्राण विराजे,
भारत माझें तैसें साजें
जगतीं मुकुटमणी. ॥ ५ ॥

भारत जें जें वच उच्चारी,
भुवन धरी तें भावें स्वशिरीं,
जलदवारिकण जेंवी स्वीकारि
निमुटपणें धरणी. ॥ ६ ॥

छत्रचामरें ढाळित अवनी,
गुंग सदाचें भारत—भजनीं,
जेंवि भक्त नित ईशस्मरणीं
जीवित अर्पोनी. ॥ ७ ॥

भरतभूमिच्या जयजयकारें
विश्व राहि दुमदुमुनी सारें,
अणुअणुमधिं हें एकच वारें
राही खेळोनी. ॥ ८ ॥

विश्वप्रेम, नय, नीती, समता,
स्वर्गसुखाचें चिन्ह तत्वतां,
भारत–शासनिं अनुभव जगता
रामराज्य भुवनीं. ॥ ९ ॥

तरी भारता ! त्याच दिनास्तव
कृति करिं हरघडि अशीच अभिनव,
मिळवीं वैभव, यश, गुण, गौरव
विनती हरिचरणीं. ॥ १० ॥

आनंदराव टेकाडे

# कविपरिचय



( १ ) **एकनाथः**—( जन्म इ. स. १५२८, मृत्यु–१५९९ ) ज्ञानदेवानंतर सुमारें तीनशें वर्षांनंतर हा विख्यात साधु पैठण येथें होऊन गेला. याचे गुरु जनार्दनस्वामी हे त्या वेळच्या मुसलमान ( बहामनी ) राज्यांतील एक अधिकारी होते. अत्यंत निगर्वी व सरळ स्वभाव व निःसीम भूतदया हे नाथांचे विशेष गुण होते. विरक्त असूनही यांनीं प्रपंच व्यवस्थित केला, व अंत्यजांना प्रेमानें भोजन घालून समाजसुधारणेचें अत्यंत उत्कृष्ट उदाहरण त्यांनीं त्या वेळच्या लोकांस घालून दिलें. मराठी भाषेंत ग्रंथरचना करण्याचा प्रघात त्या वेळच्या पंडितांच्या टीकेस खरमरीत उत्तर देऊन त्यांनीं पाडला. मध्यंतरीं लुप्तप्राय झालेल्या ज्ञानेश्वरी ग्रंथाचें त्यांनीं काळजीपूर्वक पुनः प्रकाशन केलें, हे तर त्यांचे मराठी भाषेवर फार मोठे उपकार आहेत. श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधावरील विस्तृत ओंवीबद्ध टीका ( एकनाथी भागवत ) व इतर अनेक लहान मोठे ग्रंथ, व स्फुट अभंग, पद्यें वगैरे त्यांनीं लिहिलीं आहेत.

( २ ) **रामदासः**—(जन्म इ. स. १६०८, मृत्यु–१६८१) छत्रपति शिवाजी महाराजांचे गुरु व प्रख्यात कर्तृत्वशाली साधुपुरुष. यांचा 'दासबोध' हा प्रपंच व परमार्थ या दोहोंची सांगड घालून देणारा एक अपूर्व ग्रंथ आहे. राजकारणाची स्फूर्ति शिवाजीमहाराजांना रामदासांपासून झाली असो अगर नसो; त्या काळच्या जनतेंत स्वाभिमानाचें व स्वातंत्र्यलालसेचें वारें खेळूं लागण्यास रामदासस्वामींची तेजस्वी व स्फूर्तिजनक वाणी कारण झाली हें खास. त्यांच्या वाणींत सामर्थ्य आहे, व म्हणून रामदासांना ' समर्थ ' ही पदवी देण्यांत येते.

( ३ ) **मोरोपंतः**—(जन्म इ. स. १७२९, मृत्यु–१७९४ ) यांचें उपनांव पराडकर. बारामतीचे जाहागीरदार बाबूजी नाईक यांचे आश्रित पुराणिक म्हणून ते पुष्कळ दिवस राहिले होते. यांचें लाडकें वृत्त गीति ( इलाच ते 'आर्या' असें म्हणतात ) हें होय. व याच वृत्तांत रामायण, महाभारत, भागवत व इतर पुराणें यांवर त्यांनीं अनेक ग्रंथ लिहिले. शिवाय निरनिराळ्या वृत्तांत एकशें आठ

रामायणें, व अनेक स्फुट काव्यें त्यांनीं लिहिलीं आहेत. व्याकरणशुद्ध, प्रौढ, व झोंकदार भाषा लिहिण्यांत मोरोपंताच्या योग्यतेचा दुसरा कवि मराठींत झाला नाहीं. मराठी भाषेला तो वाटेल तशी वांकवितो, व तींत शब्दांचे व अर्थांचे वाटेल ते चमत्कार करून दाखवितो. रसाळ व चटकदार गोष्ट सांगण्यांत त्याचा हातखंडा आहे. त्याच्या आख्यानांतील संवादप्रसंग तर फारच बहारीचे असतात. त्याच्या भक्तिरसपूर्ण काव्यांत 'केकावलि' फार सरस आहे.

( ४ ) **रघुनाथ पंडितः**—( सतराव्या शतकाच्या अखेरीस ) याचें नलदमयंतीस्वयंवराख्यान हें एकच काव्य प्रसिद्ध आहे. पण या एकाच काव्यानें त्याला मराठी भाषेंत कायमचें स्थान मिळालेले आहे, इतकें तें सरस आहे. संस्कृत भाषेंतील प्रख्यात महाकाव्यांच्या धर्तीवर मराठींत रचलेलें काव्यही प्रायः हें एकच समजलें जातें.

( ५ ) **विनायकः**—विनायक जनार्दन करंदीकर ( जन्म इ. स. १८७२, मृत्यु–१९०९ ) हे आधुनिक कवींत एक चांगल्यापैकीं कवि होऊन गेले. देशभक्तिपर, पोवाड्याच्या धर्तीवर पद्यें लिहिण्याची सुरवात यांनीच केली असें म्हटलें तरी चालेल.

( ६ ) **गोविंदाग्रजः**—राम गणेश गडकरी ( जन्म इ. स. १८८५, मृत्यु–१९१९ ) हेही आधुनिक कवींपैकीं एक प्रतिभासंपन्न कवि, उत्कृष्ट नाटककार व विनोदी लेखक होऊन गेले. अंतःकरणाला चटका लावून सोडणारे प्रसंग कल्पिण्यांत व ते योग्य शब्दांनीं रंगविण्यांत त्यांचा हातखंडा होता. केशवसुत ( पुढे नं. ८ पहा ) यांच्या काव्यांनीं गडकऱ्यांना स्फूर्ति दिली यांत संशय नाहीं. पण शिष्यानें कांहीं बाबतींत गुरूवर ताण केली आहे. हे फार अल्प वयांत वारले, यामुळें मराठी वाङ्मयाची फार हानि झाली आहे.

( ७ ) **रेव्हरेंड ना. वा. टिळकः**—( जन्म इ. स. १८६५, मृत्यु–१९१९ ) आधुनिक मराठी कवितेला नवीन वळण लावणाऱ्या कवींत हे फार श्रेष्ठ प्रतीचे कवि होऊन गेले. यांनीं ख्रिस्ती धर्म स्वीकारला होता, पण त्यांचा हिंदू धर्म, चालीरीति यांवरील लोभ कायम होता. यांचा स्वदेशाभिमान तर फारच जाज्वल्य होता. यांचें "ख्रिस्तायन" हें ख्रिस्ती धर्मपर काव्य प्रसिद्ध आहे; पण त्यांची खरी कीर्ति त्यांच्या अनेक विषयांवरील स्फुट काव्यांवर अवलंबून

आहे. सोपी पण मनोहर भाषा, व उदात्त, स्फूर्तिदायक विचार यांचा मधुर संगम यांच्या काव्यांत पदोपदीं दिसून येतो.

( ८ ) **केशवसुतः**—कृष्णाजी केशव दामले ( जन्म इ. स. १८६५, मृत्यु–१९०५ ) इंग्रजी भाषेंतील उच्च दर्जाच्या कवितांचें वळण मराठी कवितेस प्रथम लावण्याचा प्रयत्न या धाडसी कवीनें केला. प्रगमनशील व समाजसुधारणेस उत्तेजनपर विचारांची 'तुतारी' प्रथम जोरानें फुंकणारा कवि हाच. यांचेंच अनुकरण पुढें रा. गडकरी, ठोमरे वगैरे कवींनीं केलें. केशवसुतांनीं एक नवाच संप्रदाय घालून दिला असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांची भाषा मात्र कांहींशी ओबडधोबड असते.

( ९ ) **वसंतः**—प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन (जन्म इ. स. १८६१, मृत्यु–१९२२ ) हे पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजचे प्रोफेसर, व शेवटीं प्रिन्सिपाल होते. हे उत्कृष्ट मराठी लेखक व कवि असून केशवसुतांचे परममित्र व चाहाते होते. केशवसुतांच्या मतांशीं यांचीं मतें पूर्णपणें जमत हें त्यांच्या काव्यांवरून चटकन दिसून येतें.

( १० ) **आनंदराव टेकाडेः**—( जन्म–१८८८ ) हे नागपूरचे राहिवाशी असून एक प्रतिभाशाली व गानकुशल कवि म्हणून फार प्रसिद्ध आहेत. स्वतःची कविता जोरदार व स्फूर्तिदायक हावभावांनिशीं गाऊन दाखविण्याची चाल प्रथम यांनीं पाडली. यांची बहुतेक कविता स्फुट व गानोपयोगी पद्यमय अशी आहे, व 'आनंदगीत' या नांवानें तीन भागांत ती प्रसिद्ध झाली आहे. यांचें " हा हिंददेश माझा " हें राष्ट्रगीत तर आतां आबालवृद्धांच्या परिचयाचें झालें आहे. यांची कविता पोवाड्याच्या धर्तीवर असून शब्दयोजना जोरदार पण साधी असते.

---

# कवितापाठांवरील टीपा

## १

## मराठी भागवत



**ओंवी** (१) निवृत्ति–प्रख्यात ज्ञानेश्वरी ग्रंथाचा कर्ता ज्ञानदेव याचा वडील भाऊ व गुरु. चांगदेव वटेश्वर–चांगावटेश्वर—एक ज्ञानेश्वर-समकालीन कवि.

,, (२) प्राकृत–साधारण प्रतीचे लोक; अज्ञजन. निजात्मता निजभावें–अत्यंत भक्तिपूर्वक.

,, (३) मा–आणि.

,, (४) कपिला–पिंगट रंगाची गाय. नीर–पाणी. वर्णस्वादें–रंगानें व रुचीनें. साचार–खरोखर.

,, (५) विषमचि तें कायी ?–कां वांकडें ( चमत्कारिक ) वाटावें ?

,, (६) निरंजन–एकांत. रावो–राजा. ठावो–ठिकाण. वचतां–जातां. भृत्य–चाकर.

,, (७) कां......हात–एका गरीब, व श्रीमंत कुलांतील स्त्रीशीं राजानें विवाह केला.

,, (८) प्रपंचपदार्थ–व्यवहारोपयोगी वस्तु.

,, (९) असोतु–राहूं द्या; सोडून द्या. अभिमानभुली–दुराग्रहानें उत्पन्न झालेले गैरसमज.

,, (११) बोळ–एक कडू औषधि.

,, (१२) पेंडुकें–लहानसें बोचकें, ओझें. निजज्ञान–परमार्थज्ञान.

ओवी (१४) अटाटी–खटपट. मराठीसाठीं–मराठी भाषेच्या द्वारें.

,, (१६) चिद्रत्न–ज्ञानरूपी रत्न.

,, (१७) बोल्‍ल–दोष, कमीपणा. कुटिलता–वांकडी दृष्टि.

,, (१८) ज्ञानगर्भाची–आंतील ज्ञानाची. गाढी–खोल, गूढ.

,, (१९) साचार परमार्थी—ज्यांना परमार्थाची खरी आस्था आहे असे. अधिकारी—ग्रंथ समजण्यास योग्य. भागवत—श्रीमद्भागवत ग्रंथ. हा पुराणग्रंथांत फार श्रेष्ठ मानला जातो.

,, (२१) सनक–एक प्राचीन महर्षि.

,, (२२) सुणें–श्वान, कुत्रें.

,, (२३) हंसगीत—श्रीमद्भागवतांतील एक वेदांतपर प्रकरण. चिन्मात्र–ज्ञान.

,, (२४) हेम–सोनें.

,, (२६) ब्रह्ममूर्ति–ईश्वरासमान पूज्य. निजात्मभाव–मीच परमेश्वररूपी आहें ही भावना. जनार्दनें–जनार्दनस्वामी हे एकनाथ महाराजांचे गुरु होते. हे जसे साधु तसेच मुत्सद्दी व योद्धे होते. यांची समाधि दौलताबादचे किल्ल्यावर आहे.

,, (२७) आरिखा–नीरस. रिघाल्या–शिरल्या. एकादशाचे पोटीं–एकनाथी भागवत हा ग्रंथ श्रीमद्भागवताच्या एकादश ( अकराव्या ) स्कंधावरील टीका होय.

,, (२८) वांकुडी–विपरीत.

,, (२९) भाखा–भाषा.

२

# समर्थांचें संभाजी राजास पत्र

**ओंवी** ( १ ) दुश्चित्त–काय करावें व काय न करावें हें न सुचतां निष्कारण काळ घालविणें यास रामदासांनीं दुश्चित्तपणा असें म्हटलें आहे. तजवीज–पुढील राजकारणाची योजना.

,, ( २ ) उग्रस्थिति–स्वभावाचा कडकपणा.

,, ( ३ ) मागील......करावे–संभाजीविरुद्ध कांहीं मुत्सद्यांनीं कारस्थान रचले होतें; त्यांना अगर त्यांच्या नातलगांना संभाजीनें फार कठोरपणानें वागविलें, या गोष्टीचा येथें उल्लेख आहे.

,, (४–५) लोकांची अवस्था तुंबलेल्या पाण्यासारखी झाली आहे; ही अवस्था घालवून त्यांना कांहीं तरी योग्य कामास लावावें असा अर्थ.

,, ( ६ ) श्रेष्ठीं–थोरल्या शिवाजीमहाराजांनीं. गलीम–गनीम, शत्रु.

,, ( ८ ) या कारणें......बुद्धि शोधावी—आपलें मन शुद्ध करावें; 'आपलें कांहीं चुकत आहे काय ?' असें पहावें.

,, ( ९ ) लगबग–त्वरा. समाधान राखावें–अर्थात् लोकांच्या मनाचें.

,, (११) तडाके–पराक्रम. धके–धोके.

,, (१३) सलगी–प्रेम, दाट ओळख.

,, (१४) म्लेच्छ–हिंदू नसलेल्या सर्व लोकांस हा शब्द लागत असे; पण येथें "मुसलमान" असा अर्थ.

,, (१८) साक्षेप–काळजीपूर्वक काम करण्याची पद्धति.

,, (१९) सलगी देणें–लोकांशीं मिळून मिसळून वागणें.

,, (२०) तो योग–राज्यसाधन.

## ३

# मरणोन्मुख दुर्योधनाचा बाणेदारपणा

**आर्या** ( १ ) सुभट–चांगला योद्धा; वीर. मृतमारण–मेलेल्याला मारणें. गुरूंचें–वडील माणसांचें. उक्त–भाषण.

,, ( २ ) मृतपापकथा–मेलेल्या माणसाविषयीं वाईट बोलणें.

,, ( ३ ) खग–पक्षी. नीड–घरटें.

,, ( ४ ) स्वाधिक्षेप–स्वतःची निंदा. तो नृप—दुर्योधन. आगस्–अपराध. आगस्करघातार्थी–आपल्या वाटेस जाणाऱ्याचा घात करूं इच्छिणारा. पुच्छ+छेद+आर्त+धी–शेपूट कापल्यामुळें ज्याच्या मनाला खेद झाला आहे असा–'नाग' याचें विशेषण.

,, ( ५ ) दायाद–वारसाहक्क ज्यास मिळतो असा नातलग. कंसाचा गुलाम बनलेल्या वसुदेवाच्या मुला! हा अर्थात् कृष्णाला टोमणा आहे. कपटा......यादा—नदी व याद ( जलचर प्राणी ) यांची जशी नेहमीच गांठ ( संबंध ) असते, तशी तुझ्या हृदयाची ( मनाची ) व कपटाची नेहमीचीच गट्टी आहे, असा भाव.

,, ( ६ ) फाल्गुन–अर्जुन. दुर्योधनाच्या मांडीवर गदेचा प्रहार कर अशी कृष्णानेंच भीमास खूण केली होती.

,, ( ७ ) ऋजुसंगर–( ऋजु, सरळ ) सरळ, धर्मानें लढणारे. कवि–श्रेष्ठ, विद्वान्. सुभटांत...विराजे–खऱ्या वीरांना ही तुझी कारवाई खचित आवडणार नाहीं.

,, ( ८ ) धर्मयुद्धानें दुर्जय–जिंकण्यास कठिण. धनद–कुबेर. द्युप—इंद्र. स्त्रीपूर्व—पूर्वी स्त्री असलेला. या कारणानें भीष्मानें शिखंडीवर बाण टाकण्याचें नाकारलें. आपगा–नदी. आपगेय–गंगानदीचा पुत्र–भीष्म.

आर्या (९) अलीक–असत्य. गुरुघातार्थ–गुरु द्रोणाचार्य यांचा घात करण्यासाठीं अश्वत्थामा मेला अशी खोटीच बातमी उठवून धर्मराजाला कृष्णानें खोटें भाषण करावयास लावल.

,, (१०) आयुधन्यास–शस्त्रत्याग. धन्यास–परम पूज्य अशा द्रोणाचार्याला.

,, (११) द्रुपदसुत–धृष्टद्युम्न. प्रायगत–इच्छापूर्वक मरणाची वाट पहात बसलेला. या ठिकाणी "ध्यानस्थ बसलेला" इतकाच अर्थ आहे. ब्रह्मण्य–ब्राह्मणांना पूज्य मानणारा.

,, (१२) स्वकवचकुंडलधनदानें–इंद्रानें अर्जुनास मदत करण्यासाठीं कर्णाचें सहज (अंगाबरोबर उत्पन्न झालेलें) सुवर्णकवच आणि कुंडले मागितलीं, व उदार कर्णानें तीं दिलीं. या उदारपणानें इंद्र चकित होऊन त्यानें शत्रूस निःसंशय ठार करणारी अशी एक शक्ति (एक प्रकारचे अस्त्र) कर्णास दिली. घटोत्कच–अर्जुनास हिडिंबी नांवाच्या राक्षसीपासून झालेला मुलगा. यानें युद्धांत एवढा धुमाकूळ केला कीं, अर्जुनावर सोडण्यासाठीं राखून ठेवलेली शक्ति कर्णाला अखेर घटोत्कचावर सोडावी लागली.

,, (१३) अश्वसेनव्याळशर–व्याल–साप. अश्वसेन या नांवाचा सापाचें विष लावलेला बाण. छद्म–कपट; कृष्णानें युक्तीनें घोडे खालीं दाबून रथ अमळ वांकविला; त्यामुळें तो विषारी बाण अर्जुनाच्या मुकुटास चाटून गेला, व अर्जुन बचावला. चक्रव्यसनीं–कर्णाच्या रथाचें चाक जमिनींत घुसलें ह्या संकटांत तो असतांना. सुकवि–योग्य पुरुष.

,, (१४) गुरुसीं–द्रोणाशीं. हरितास.... तूं,—तुला माझें राज्य काढून घेणें शक्य झालें नसतें. कुटिलपणा–कपटाचरण. चरित–कीर्ति (उपरोधिक अर्थानें).

,, (१५) आह्मां असे–आमच्यासारखे. निजधर्मनिरत—स्वधर्मतत्पर. अनार्या!—नीचा. यदु—यादवांचा (कृष्णाचा) पूर्वज. पटानें–वस्त्रानें. तुझे पूर्वज लाजेनें तोंड झाकून घेतील असा अर्थ.

**आर्या** (१६) दुरित–पाप. चुरितें–चुराडा करतें.

,, (१७) जयंताचिया बापानें–इंद्रानें.

,, (१८) सुर+असुर+नर+उरग ( सरपटणारे प्राणी )+दुर्जय. रुद्र–शंकर. तवशीलानुवर्तक—तुझ्या छंदानें वागणारा.

,, (१९) भाग–पांडवांचा राज्याचा वांटा. नाकीं–स्वर्गांत (देव वदले, इकडे संबंध) शक्र–इंद्र. वेन–एक प्राचीन राजा. हा स्वभावानें अति दुष्ट असून ब्राह्मणांचा फार छळ करी असें म्हणतात.

,, (२०) गरद्–विष देणारा. भीमास विष देणें, पांडवांना लाखेच्या घरांत जाळून मारण्याचा यत्न करणें, द्रौपदीची विटंबना करणे, इत्यादि दुर्योधनाच्या दुष्कृत्यांचा पाढा कृष्ण या वेळीं वाचीत आहे. दाह–जाळणें.

,, (२१) कर्षी–ओढी. हृष्ट–आनंदित. नाकर्षि–देवर्षि.

,, (२२) कितव–ढोंगी, लबाड. भागविला–कष्टी केला.

,, (२३) कृष्णा–द्रौपदी. अनादि सती–सीता. अप्राकृता जना–असामान्य विद्वान् अशा लोकांना. जगदंबा–जगन्माता देवी.

,, (२४) विरथ–रथहीन. आबाळ–हेळसांड. वृद्धाची...आबाळ–एखाद्या दरिद्री म्हाताऱ्याची जशी प्रपंचांत हेळसांड होते, तद्वत् तुझ्या पापांनीं तुझी होईल.

,, (२५) व्याळसम–सापासारखा.

,, (२६) उपासिले–सेवा केली. गुरुशुक्रांचे–गुरु ( बृहस्पति ) हा देवांचा गुरु व शुक्र हा दैत्यांचा गुरु. यावरून गुरुशुक्र म्हणजे गुरुतुल्य पूज्य माणसें. सु + पद + ईश–उच्च पदाचा अधिपति.

,, (२७) राजा–दुर्योधन. सांगा वेदा–वेदाचीं सहा अंगें ( उपग्रंथ ) आहेत, त्यांसकट वेद. मीं वेदाध्ययन केलें, व तें विसरलों नाहीं. पात्र–योग्य पुरुष.

,, (२८) अखिल–सर्व. परमस्तकीं–शत्रूच्या डोक्यावर. सु + अंत+तर–माझ्याहून ज्याचें मरण अधिक चांगलें आहे असा !

आर्या (२९) अभिमुख–समोरून. क्षत्रियानें शस्त्रांचे घाव पुढून घ्यावे, मागून नाहीं, असा धर्म आहे. समरमख–युद्धरूपी यज्ञ. वेंचिला–खर्च केला. काय–शरीर.

,, (३०) शत्रूंना माझ्या ऐश्वर्याचा नेहमी हेवाच वाटला.

,, (३१) सुरांचा राय–देवांचा राजा ( इंद्र ). स + सुहृत् (मित्र)+ सुत + सोदर (भाऊ)–सर्व नातलगांसह.

,, (३२) वीरसू–वीरपुत्रांची माता. माय–माझी आई.

,, (३३) प्रविहतसंकल्प–ज्यांच्या मनांतील इच्छा तशाच अपूर्ण राहिल्या. सहाय–मदतगार.

---

## ४

# श्रीकृष्णाच्या बालपणची एक आठवण

श्लोक ( १ ) कृष्णाचा गुरु जो सांदीपनि ऋषि, त्याच्या आश्रमांत कृष्ण व सुदामा विद्याभ्यासार्थ होते, त्या वेळची ही गोष्ट आहे. यदुवर–यादववंशांत श्रेष्ठ–कृष्ण. जलरुह–कमल. जाया–पत्नी. नेत्रांबुज–कमळासारखे नेत्र.

,, ( २ ) बंधो–हे श्रीकृष्णाचे शब्द आहेत. कुतुक–मौजेची गोष्ट. इंधन–जळाऊ लाकडें. स्वगुरुयुवतिनें–गुरूच्या पत्नीनें. कालावांचून–पावसाळा नसतांना. जलधर–मेघ. आत्मा–मन. कराल + अहि + कुटिल + तरल–भयंकर सर्पाप्रमाणें वेड्या-वांकड्या व चंचल; सशब्द–मोठा कडकडाट करणाऱ्या. हीं दोन्ही विजेचीं विशेषणें आहेत.

,, ( ३ ) भास्वान्—सूर्य. पयोद–ढग. स्थूल + अंबुवाह ( मेघ ) + उत्पल (दगड) + व्रात (समूह)–मोठ्या गारांच्या माऱ्यानें.

श्लोक ( ३ ) दिग्भ्रम-दिशाभूल. सारे बाळ, कराल काळ-आम्ही सारीं मुलेंच होतों; व प्रसंग तर भयंकर ! संभ्रम-घोंटाळा; कांहीं सुचेनासें झालें, हा अर्थ.

,, ( ४ ) निम्न-खोल; उन्नत-उंच. वन-पाणी. दुसऱ्या ओळींत, वन-अरण्य. स्व + अध्व ( रस्ता ) + भ्रम-रस्ता चुकणें. प्रत्यूष + अवधि-सकाळ होई पावेतों. परामर्श-समाचार.

,, ( ५ ) विकळ-व्याकूळ. आचार्य-गुरु. आत्मोद्भव-स्वतःचें मूल. आघ्राण माथां-मस्तक हुंगणें हें पूर्वी प्रेमाचें एक चिन्ह समजत. प्रेमतोय-प्रेमाचे अश्रु. गुरुचरण...तो-गुरूंनीं प्रेमानें केलेला तो सत्कार मला अद्यापि स्मरतो.

,, ( ६ ) हे गुरुजींच्या तोंडचे शब्द आहेत. हे स्वकाय-हीं आपलीं शरीरें. क्लेशपात्र-कष्टी. अस्मदर्थ-आमच्यासाठीं. समुचित-योग्य. हृत्तम-हृदयांतील अज्ञानरूपी अंधकार. प्रशमकर-नाश करणारा. शिष्याच्या......द्या—हृदयांतील अज्ञानरूपी अंधकार नाहींसा करणारा ज्ञानरूपी सूर्य तुम्ही शिष्यांच्या हातीं द्या, असा अर्थ.

,, ( ७ ) देशिक-गुरु. गुरुभक्तीनें संसारयात्रा सुलभ होते. उदंड-पुष्कळ. माझा गती—माझें आश्रयस्थान.

,, ( ८ ) जनसंग्रहार्थ-लोकांना उदाहरण घालून देण्यासाठीं. श्रुति + नुत-वेदांनीं स्तुति केलेला.

,, ( ९ ) वेदमय स्वदेह-ज्या परमेश्वराचा देह वेदमय-ज्ञानमय-आहे. कुशलाधार-सर्व कल्याणकारक वस्तूंचा आधार. त्रिलोकी-तीन लोक-स्वर्ग, मृत्यु व पाताल. वर्ण-ब्राह्मणादि जातिभेद आश्रम-ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम इत्यादि अवस्थाभेद. कल्पक-योजना करणारा. श्रुत्यध्व-वेदांनी घालून दिलेला आचारमार्ग. विडंबन-अनुकरण. तुमचें गुरुगृहीं राहणें हें केवळ लोकांना धडा घालून देण्यासाठीं होतें.

---

५

# दमयंती व हंस



श्लोक (१) तो-हंस. मंडलाकृति-वाटोळ्या गिरक्या घेत. भैमी-भीम राजाची मुलगी दमयंती. परिवेष-चंद्राभोंवतीं पडणारें खळें. तो सुवर्णमय देहाचा हंस दमयंतीच्या मुखाभोंवतीं फिरूं लागला त्या वेळीं चंद्राभोंवतालच्या तेजोवलयासारखा शोभला असा अर्थ.

,, (२) पक्षपुटीं-पंखांनीं. धरा-जमीन. वरानना-सुंदर स्त्री. बोलताहे-बोलूं लागली.

,, (३) लक्षी-पहा. विहगलक्षीं-लक्षावधि पक्ष्यांमध्यें. कवयिता-कवि.

,, (४) हे-ही, दमयंती. हंसगमना...आहे—अगोदरच हंसाप्रमाणें जिची गति होती, ती हंस पकडण्यासाठीं विशेषच मंदगतीनें चालूं लागली. वलय-कांकण. नूपुर-पैजण. तो-हंस.

,, (५) कुंददंती-कुंदाच्या कळ्यासारखे जिचे दांत आहेत अशी. मदधुरंधर-मस्त झालेला. इंद्रदंती-इंद्राचा ऐरावत नांवाचा हत्ती. कृशोदरी-जिचें पोट सडपातळ आहे अशी. निष्कंपकंकण-ज्यांतील बांगड्या हालून वाजत नाहींत असा ( हात ).

,, (६) सर्वेचि-लागलाच.

,, (७) सुधाकर-चंद्र. लाहे मनोरथ-तिला इच्छा झाली.

,, (८) मदगजगमन-मस्त हत्तीसारखी मंद चालणारी. विनत-वांकलेली. तनुलता-लतेप्रमाणें सडपातळ शरीर.

,, (९) चतुरसंमत-शाहण्या लोकांस मान्य असलेली. वनाळी-रानांतल्या झाडांची रांग. छाया...वनाळी-त्या वेळीं तिच्या

बरोबर तिची छाया, व भोंवतालचीं झाडें या खेरीज कोणी नव्हतें हा मतलब. जे—छाया, अथवा वनाळी. सांवळी—काळी.

श्लोक (१०) विलासिनी—ऐश्वर्याचा उपभोग घेणारी. मर्दे—गर्वानें—आपण दमयंतीला कसें झुलवीत आणलें अशा गर्वानें.

---

६

# महाराष्ट्राची भूपाळी

कडवें (१) उन्नत—उंच, श्रेष्ठ पदास पोंचलेला. पुनीत—पवित्र. पश्चिमसिंधु—अरबी समुद्र. पूर्वोदधि—बंगालचा उपसागर. जामात—जावई ? विंध्याद्रीची...प्रांत—विंध्यपर्वताच्या उंचवट्यावरून सातपुड्याचा प्रदेश नजरेंत भरतो. पैठण ......तुळजापुर—हीं महाराष्ट्रांतील प्रसिद्ध क्षेत्रें व तीर्थस्थानें आहेत. पुणें, रायगड, शिवनेरी—हीं स्थलें शिवाजी महाराजांच्या नांवाशीं संबद्ध असल्यानें प्रसिद्ध आहेत. रजःकणाला...... भाळीं—एखाद्याच्या पायाची धूळ कपाळाला लावणें हा त्या व्यक्तीविषयीं पूज्यबुद्धि व्यक्त करण्याचा एक प्रकार आहे.

,, (२) कांबळ......मासे—साधारणतः महाराष्ट्रीयांचा वर्ण सांवळा, शरीराची ठेवण खुजी व पोषाक साधा असा असतो हा ध्वन्यर्थ. अशा साध्या व दिसण्यांत किरकोळ माणसांच्या साह्यानें मराठ्यांनीं आपलें वैभव संपादन केलें असें ह्या कडव्यांत सुचविलें आहे. बटें—तट्टें. भीमथडीचीं तट्टें फार चपळ व काटक असतात अशी प्रसिद्धि आहे.

मिळविती......बादशाहिची–यांत औरंगजेब बादशहाला मराठ्यांनीं कसें जेरीस आणलें ह्याचा उल्लेख आहे.

**कडवें** ( ३ ) आनंदवनभुवन–साधुवर्य रामदास यांनीं महाराष्ट्र देशाला हें नांव दिलें होतें.

,, ( ४ ) भीमा......गीत–भीमेच्या कांठचें प्रसिद्ध क्षेत्र जें पंढरपूर त्यानेंच अनेक महाराष्ट्रीय संतकवींना स्फूर्ति दिली असा आशय. या कडव्यांत ठळक संत व कवि यांचीं नावें आलीं आहेत. चोखा–प्रसिद्ध महार साधु चोखामेळा. गोरा–गोरा कुंभार.

,, ( ५ ) मुक्ताबाई–ज्ञानदेवाची बहीण; जनाई–नामदेवाच्या घरची दासी; ह्या दोघीही संतमालिकेंत फार विख्यात आहेत. अहल्या–होळकरांच्या वंशांतील विख्यात साध्वी व राज्यकर्त्री. सती रमा–थोरले माधवराव पेशवे यांची पत्नी. ही पति-मरणोत्तर सती गेली हें प्रसिद्ध आहे. भटवंशाला–पेशव्यांचें उपनाम भट असें होतें. स्वातंत्र्यलक्ष्मी–स्वातंत्र्यासाठीं लढणारी झांशीवाली लक्ष्मीबाई.

---

## ७

# वीरमती

**आर्या** ( १ ) पतिरणविन्मुखतेची–पति रणांतून पाठ फिरवून माघारा आल्याची. ‘ विन्मुख ’ हा शब्द ‘ विमुख ’ असा पाहिजे. याचा अर्थ तोंड फिरविलेला असा आहे. विषण्ण–खिन्न.

,, ( २ ) अयशाचें–पराजयानें मिळालेलें. मळमळीत सौभाग्य–या बाबतींत म्हण अशी आहे:–“ मळमळीत सौभाग्यापेक्षां झळझळीत वैधव्य बरें ! ”

आर्या (५) वेस–शहराच्या तटाचा दरवाजा.

,, (६) उदेपूरचें राजघराणें सूर्यकुलोत्पन्न आहे असें मानतात. रजपूत कुलांचे पावित्र्य व स्वातंत्र्य राखण्याचे कामीं महाराणा प्रतापसिंह वगैरे वीरांनीं या कुलांत कसे परिश्रम केले हें वीरमती–ही स्वतः या कुलांतच जन्म पावली होती–आपल्या पतीच्या नजरेस आणीत आहे.

,, (८) शिरें करांत घेऊन–जिवावर उदार होऊन.

,, (१०) जातिलता–जाईची वेल. सुमन–(१) फूल; (२) चांगलें मन. क्षम–समर्थ.

,, (११) बाणी–अब्रू.

,, (१२) वीरांबा–शूर माता.

,, (१४) पण–प्रतिज्ञा.

,, (१५) कर्णिकार–एक सामान्य प्रतीचें फूल.

,, (१७) साज–पोषाक, अलंकार.

,, (१९) तुकवी-डोलवी.

,, (२१) केवळ शरीरावर कोणी प्रेम करीत नाहीं. त्यांतील प्राणावर–आत्म्यावर–आपण प्रेम करतों. तो गेला कीं शरीर निरुपयोगी व त्याज्य ठरतें.

,, (२२) मान हाच रजपूतांना प्राण होय; तो गेला, म्हणजे तुम्ही प्रेतासमान अवस्थेंत परत आलां; प्रेताची जागा घर नसून स्मशान होय.

,, (२३) मी केवळ तुम्हांला वरलें होतें असें नव्हे; तर मी तुमच्या क्षत्रियाच्या बाण्यासही माळ घातली होती. तें क्षत्रियव्रत जर भंगलें असेल, तर माझें सौभाग्यही त्याच्याबरोबरच गेलें असें मी मानतें.

,, (२४) सहगमन–सती जाणें.

,, (२५) अवगणती–तिरस्कार करतात.

आर्या (२६) विगतक्षात्रव्रत–ज्यांतून क्षात्रव्रतरूपी प्राण गेला आहे असें ( तुमचें शरीर ). डोळांहीं...कुठली–तुमच्या शरीराबरोबर सती जाण्याच्या लायकीचेंही तें नाहीं.

,, (२७) पतीचें शव मिळालें नाहीं तर त्याची एक प्रतिमा करवून त्याबरोबर स्त्रिया सहगमन करीत. आपल्या घराण्याच्या क्षत्रियव्रताची जणुं मूर्तिच असे जे धनुष्यबाण त्यांजबरोबरच मी सहगमन करीन, असा आशय.

---

८

# (१) वीरमरणाला शोभण्याजोगें गाणें

गाई कर–नीज; हा शब्द लहान मुलांना निजवितांना माता योजीत असतात.

दगडाची छाती–यांत श्लेष आहे. दगडांचे बुरुज बांधले होते; व दगडाची छाती—म्हणजे निधडी छाती, असामान्य धैर्य.

कळिकाळ–सर्वनाश करणारा काळपुरुष.

हिरवे–आडदांड, शूर. बुरुजांचे खंबीर दगड म्हणजेच तुझ्या भोंवतालचे शूर शिपाई अशी येथें कल्पना आहे.

जीवांच्या जळत्या ज्योती...पाही–आपल्या शरीरांतील तेजःपुंज आत्मे हेच आकाशांतील चमकणारीं नक्षत्रें बनतात, व ह्या रत्नतुल्य नेत्रांनीं ईश्वर तुझ्याकडे पहात आहे.

सारखीच असती नसती–असली काय व नसली काय, सारखीच, इतकी ती अशाश्वत आहे.

ऋणानुबंध–ऋण=पूर्वजन्मींचें देणें घेणें; याचा अनुबंध=संबंध, नातें. या जन्मींचीं नातीं हीं पूर्वजन्मींच्या कांहीं तरी ऋणानुबंधानें निर्माण होतात ही हिंदुधर्मातील एक प्रमुख कल्पना आहे.

लेणें–अलंकार.

कुणितरी कुणास्तव रडणें–मृतांबद्दल शोक करणें ही चूक होय असा भाव. अशीं रडणारीं खुशाल रडोत, मी मात्र तुला गाणें म्हणून निजविणार, असें ती म्हणते.

---

## ( २ ) निरोप द्यावा आतां

करुणारसरंगा–करुणेच्या (मायेच्या) रसानें रंगलेली–हें "गंगा" या शब्दाचें विशेषण समजावें.

अखंड...गंगा–तुमचें पुण्यप्रद तेज या बालकावर अखंड पडूं द्या, हा भावार्थ.

मायापांखर–मायेचें पांघरूण.

हृदयींचा ठेवा–प्रेमाची ठेव.

काळ्या राती–अंधेऱ्या रात्रीं.

जित्या फुलांचा–उमललेल्या जिवंत फुलांचा. मूल भुतांखेतांना भिऊन दचकून उठूं नये म्हणून फुलांना त्यावर पाहारा करण्यास सांगा.

आहा फुलांच्या माता–आईचें दुःख तुम्हांला समजतें, असा आशय.

---

९

# सारीं फुलेंच फुलें

श्लोक (१) फूल हा शब्द या कवितेंत "कोणतीहि मोहक व सुंदर वस्तु" या अर्थी योजला आहे. या श्लोकांत फुलें हा शब्द ज्या वेगवेगळया वस्तूंस लावला आहे, ते पदार्थ त्याच अनुक्रमानें पुढील श्लोकांत आले आहेत. आकळिलें–ओळखलें.

,, (२) हिजमध्यें कैवल्य मी पावतों–यांतच मला मोक्षप्राप्तीचा आनंद मिळतो.

श्लोक (३) सांकडें–संकट. ज्याचें जें काम नव्हे तें त्याला कोण सांगेल ? देवानेंच जर फुलांतील सौंदर्य अनुभविण्यास जन्म दिला, तर मला दुसरें काम कसें साधेल ?

,, (४) निरर्थ–अर्थशून्य. निरविलें–सोंपविलें. भीतों... मानवा–लोकांच्या कुचेष्टेची मी पर्वा करीत नाहीं.

,, (५) रस सांठवी–अर्थात् काव्यरूपी रस.

,, (६) मधुकोश–काव्यरूपी मधाचा खजीना.

---

## १०

# ब्राह्मण किंवा महार मी

गणी...मी–मी कोणालाच श्रेष्ठ समजत नाहीं.

दिव्यपण–दैवी, सात्विक वृत्ति. ही वृत्ति ज्यांत आहे, तींच खरीं माणसें.

मांगल्याची ही ठेव–सर्व जगाच्या कल्याणाचें मर्म यांत सांठून राहिलें आहे.

हिच्याहि मोला...त्याला–इची (या माणुसकीची) किंमत जो ओळखीत नाहीं, त्याला मी अत्यंत नीच समजतों, हा भाव.

मलांत–चिखलांत. खनींत–खाणींत.

विपन्नता ज्यांच्यासाठीं–ज्या लोकांच्या वांट्याला दारिद्र्य, आपत्ति आलीं आहेत.

त्यजुनी...जननी–इतर सर्व मुलांना बाजूस सारून आई अशक्त रोगी मुलालाच उचलून घेते.

मानामानाचें–मान व अपमान यांचें.

गोवें–गुंतागुंत.

गुरुपद–श्रेष्ठपणा; हा जातीनें येत नसून निःस्वार्थी आचरणानें येतो हा भावार्थ.

होइन...उंच-स्वतः नीचपणा पत्करून सर्व लोकांना उच्च पदास चढवीन.

पांच कशाचे ?-प्राण हे पांच आहेत असें म्हणण्याची रूढि आहे. पण मला या हिंदभूमीचा प्रत्येक बालक माझा प्राणच वाटत असल्यानें माझे कोट्यवधि प्राण आहेत !

---

११

# निशाण

पटखंड-कापडाचा तुकडा.

अवजार-जहाजाचें शीड.

तच्छिखरीं...काय ?-त्या जहाजावर फडकणारें निशाण म्हणजे त्या जहाजाच्या साहसाची मूर्तिच होय हा भाव.

देव + आयतन ( घर )-देवालय.

कोडें-कौतुकानें.

दिव्यत्व-पवित्रपणा.

मानवचित्ताची...धांव-मनुष्याचें मन नेहमीं उन्नतिसाठीं-आहे याहून अधिक बरी स्थिति यावयासाठीं-धडपड करीत असतें.

निशाण-याचा शब्दशः अर्थ चिन्ह, खूण, असा आहे; मानवी महत्वाकांक्षेची खूण म्हणूनच निशाणाला निशाण हा शब्द लावूं लागले असा कवीचा आशय.

रंडागीत- बायकी गाणें.

साद घालतों-पुकारतों, हांक मारतों.

---

१२

# नवा शिपाई

नवा मनु–नवीन काळ, नवें युग.

साकल्य–पूर्णता. तेच...साकल्याचा–जे पूर्णतेच्या हद्दीला बांध घालतात–म्हणजे मनुष्याच्या सर्वांगीण उन्नतीला संकुचित करतात, तेच पापी होत.

चतकोरानें...सुख–मी अल्पसंतुष्ट नाहीं; माझी महत्वाकांक्षा फार दांडगी आहे.

कूपांतिल...मंडूक–डबक्यांतील बेडूक; त्याला ज्याप्रमाणें डबकें हेंच सर्व जग असें वाटतें, तद्वत् ज्यांच्या संकुचित दृष्टीला आपल्या भोंवतालच्या जगापलीकडे कांहीं आहे असें वाटतच नाहीं, त्यांस ‘ कूपमंडूक ’ असें म्हणतात.

तृणावृत–गवतानें आच्छादलेली.

नीलांबर–निळें आकाश.

सावलींत–घरांत; उन्हांत–घराबाहेर.

एकच ओघ–अर्थात् मनुष्यपणाचा.

१३

# मनुष्य तितका एकच आहे

**अंजनीगीत** ( १ ) सत् + चित्–अस्तित्व व ज्ञान; साऱ्या मानव जातींत सच्चित् रूपी नदी सारखीच भरून वाहत आहे. वरवर दिसणारे भेद असले तरी मनुष्यपण येथून तेथून एकच आहे.

अंजनीगीत ( ३ ) विषुववृत्त–अथवा भूमध्यरेषा. हा प्रदेश अत्यंत उष्ण म्हणून प्रसिद्ध आहे. खरतर–फार कडक.

,, ( ६ ) वेणु–बासरी. रव–आवाज, ध्वनि. कुहर–गुहा.

,, ( ८ ) म्हातारी–वाऱ्यानें कित्येक फळांतील तंतुमय बिऱ्या भुरु भुरु उडतात, त्यांस मौजनें म्हाताऱ्या म्हणतात.

,, ( ९ ) स्तिमित–स्तब्ध. गगनकटाह–आकाशरूपी कढई–आकाशाची पोकळी.

,, (१०) जाति...मिळेना–जाति व धर्म यांचें नातें जुळेना; रागद्वेष–प्रेम व द्वेष. तंतु–धागा. मानवधर्म–मनुष्य-स्वभाव.

,, (११) हिताहिताचा...बसेना–एकाचें जें हित तेंच दुसऱ्याचें अहित, असें दिसतें.

,, (१२) वर्ण–काळे, गोरे वगैरे वर्णभेदानें उत्पन्न झालेल्या जाति.

,, (१३) वेग–शक्ति, जोर.

,, (१४) मनुवंश–स्वायंभुव मनु याजपासून सर्व मनुष्यांची उत्पत्ति झाली असें पुराणांत वर्णन आहे; मनुष्य, मानव, मनुज हे शब्द याचमुळें प्रचारांत आले आहेत.

---

१४

# तो दिन



तो दिन ये नयनीं–तो भावी दिवस माझ्या डोळ्यासमोर वारंवार येत आहे.

अशनीं–खात असतां.

व्याध–शिकारी. लक्ष्य–ज्यावर नेम धरावयाचा तो प्राणी अथवा पदार्थ.

भवानी–तलवार ( हें शिवाजी महाराजांच्या प्रख्यात तरवारीचें नांव होतें).

मुकुटमणी–श्रेष्ठ, वंद्य.

जलदवारिकण–मेघांनीं वर्षिलेले पाण्याचे कण.

भारतभजन–हिंदभूमीची सेवा.

नित–नित्य.

नय–न्याय.

रामराज्य–न्याय व शांति यांचें अधिष्ठान ज्यांत आहे, असें राज्य.

---

# मॅक्मिलन्चीं शालोपयोगी पुस्तकें

**मॅक्मिलन्चे मराठी किस्से**, नं. १ ते ५ प्रत्येकीं किं. रु. ०–१–६

**महाराष्ट्राच्या इतिहासांतील सोप्या गोष्टी**, गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए., कृत; किं. रु. ०–६–०

**हिंदुस्थानचा इतिहास**, ई. मार्सडेन्, बी. ए., कृत; किं. रु. १–४–०

**हिंदुस्थानच्या इतिहासातील सोप्या गोष्टी**, सचित्र, ई. मार्सडेन्, बी. ए., कृत; किं. रु. ०–१२–०

**इतिहासाचे प्राथमिक पाठ**, सचित्र, ई. मार्सडेन्, बी. ए., कृत; किं. रु. ०–१४–०

**ब्रिटिश साम्राज्याचा संक्षिप्त इतिहास**, जी. ॲन्डरसन्, व ई. मार्सडेन्, बी. ए., कृत; किं. रु. १–०–०

**भूगोलविद्येचे प्राथमिक पाठ**, ई. मार्सडेन्, बी. ए., कृत; किं. रु. १–२–०

**भूगोलवर्णन**, ई. मार्सडेन्, बी. ए., कृत; किं. रु. १–१२–०

**संस्कृत-अभिनवा पाठावलिः**, प्रथमा—प्रो. विनायक पांडुरंग बोकील, एम्. ए., एस्. टी. सी. डी., कृत; किं. ८ आणे.

**संस्कृत-अभिनवा पाठावलिः**, द्वितीया—प्रो. विनायक पांडुरंग बोकील, एम्. ए., एस्. टी. सी. डी., कृत; किं. १२ आणे.

**प्राथमिक शिक्षणाच्या मराठी शाळांतील शिक्षकांचें हस्तपुस्तक**, [illegible] रिर्ड, एम्. ए., कृत; किं. रु. १–८–०

**वाग्विहार**, भाग १, प्रो. गणेश हरि केळकर, एम्. ए., कृत; किं. रु. १–०–०

**वाग्विहार**, भाग २, प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन, बी. ए., कृत; किं. रु. १–४–०

**जगाचें वाङ्मय**, रा. प. सबनीस, एम्. ए. (केंब्रिज्), एफ्. आर्. ई. एस्., कृत; किं. रु. १–४–०

**रसतरंगिणी, प्राचीन व अर्वाचीन कवितांतील निवडक वेंचे**, सीताराम वासुदेव पेंडसे, बी. ए., एम्. एस. सी., कृत; किं. रु. २–८–०

**आरोग्यविज्ञान**, रामचंद्र महादेव जोशी, एम्. ए., एल्एल्. बी., बी. एस् सी. (लंडन), आय्. ई. एस्., कृत; किं. रु. ०–६–०

**आ[illegible] मूलतत्त्वें**, मुलींकरितां, मेजर हचिसन, आय्. एम्. [illegible]; किं. रु. ०–१२–०

**संस्कृत गद्यावली**, पांडुरंग वामन काणे, कृत; किं. रु. १–८–०

**संस्कृत पद्यावली**, पांडुरंग वामन काणे, कृत; किं. रु. १–०–०

**संस्कृत-शिक्षिका**, रा. ब. कमलाशंकर प्राणशंकर त्रिवेदी, बी. ए., कृत; किं. रु. २–०–०

Literary Reader II. Marathi. By G. G. Kanetkar, M.A.
Price One Rupee. 1929